श्री

# संस्थान माणिकप्रभु पद्यमाला



: प्रकाशक :

अप्पासाहेब देशपांडे, बी. ए. (ऑनर्स),
एल्एल्. बी.

श्रीसंस्थान माणिकप्रभु
माणिकनगर



१९३६

मा. श. १२०



॥ श्री ॥

# संस्थान माणिकप्रभु पद्यमाला

## अनुक्रमणिका

॥ श्रीगुरु अवधूत ॥

# सकलमत संप्रदाय

श्री भक्तकार्यकल्पद्रुम गुरुसार्वभौम श्रीमद्राजाधिराज योगीमहाराज त्रिभुवनानंद अद्वैत अभेद निरंजन निर्गुण निरालंब परिपूर्ण सदोदित सकलमतस्थापित श्रीसद्गुरु माणिकप्रभु महाराज की जय

श्रीभक्तकार्यकल्पद्रुमादि बिरुदावलि विराजित सकलमताचार्य चतुर्थ दत्तावतार श्रीमाणिकप्रभु महाराज यांच्या संप्रदायांतील मुख्य तत्त्वें व सांप्रदायिकांनीं आचरण्याचे नियम.

## संप्रदायाचें नांव व त्याचें कारण.

संप्रदायास सकलमति संप्रदाय असें म्हणतात. कारण यामध्यें सर्व संप्रदायांची एकनिष्ठता केलेली आहे. हा संप्रदाय इतर कोणत्याही संप्रदायास विरोधी नसून पोषकच आहे. इतर संप्रदायांमध्यें आपापलीं विशिष्ट मतें व आचार हेंच हितकारक असून इतर मतांचें व आचारांचें अवलंबन करणें, किंबहुना, नुसता विचार करणें, हें सुद्धा दोषास्पद मानलें जातें. पण या संप्रदायाचा सिद्धांत हा आहे कीं, जगांतील सर्व धर्म व संप्रदाय हे त्यांच्या त्यांच्या अनुयायांना, परमेश्वराची प्राप्ति करून देणारे आहेत. या सिद्धांताकडे लक्ष देऊन, आमच्या सांप्रदायिकांनीं, कोणताही इतर संप्रदाय आपणास विरोधी अतएव सर्वथा त्याज्य आहे असें न मानतां, उपकारबुद्धीनें त्यांतील गुणदोषांचा विचार करून, दोषांचा त्याग व गुणांचें ग्रहण करावें.

## सांप्रदायिकांचें उपास्य दैवत.

या संप्रदायाची मुख्य देवता म्हणजे चैतन्यदेव ( आत्मदेव ) ही आहे. हीच देवता उपासकांच्या सौकर्यासाठीं, त्रिविध रूपानें या जगांत

प्रतीतीस येत असल्यानें तिला भिन्न भिन्न नांवें प्राप्त झालीं आहेत. त्यांपैकीं—

आध्यात्मिक

स्वरूपांत असतांना तिला, चैतन्यदेव, आत्मा, सर्वात्मा किंवा परब्रह्म असें म्हणतात.

आधिदैविक

स्वरूपांत तिलाच जगद्गुरु श्रीदत्तात्रेयांचा चतुर्थ अवतार श्रीमाणिकप्रभु अशी संज्ञा प्राप्त झालेली आहे व

आधिभौतिक

स्वरूपांत तिलाच मोंगलाईंत कल्याण प्रांतीं रामतीर्थ क्षेत्रानजीक लाडवंति गांवचे नाईक ( सराफ ) मनोहर महाराज यांचे चिरंजीव, या नात्यानें ओळखतात. यांचें गोत्र श्रीवत्स. यांच्या मातुश्री बयादेवी. यांस दोन बंधु होते. वडील बंधु दादामहाराज व धाकटे नृसिंहमहाराज हे होत. श्रीमाणिकप्रभूंनाच लहानपणीं कांहीं लोक लाडनशा, मदनशा अशा व या प्रकारच्या इतर नांवांनींही संबोधीत असत.

## उपासनेचा त्रिविध मार्ग.

या संप्रदायांतील मुख्य देवतेच्या वर वर्णन केलेल्या त्रिविध स्वरूपाचें आकलन होण्यासाठीं उपासनेचेही तीन प्रकार सांगितलेले आहेत.

### आध्यात्मिक उपासना.

ज्याला आम्हीं आत्मा किंवा चैतन्य असें म्हणतों, तो स्वतंत्र आहे. तो स्वार्थ म्हणजे सर्वाकर्षक किंवा सर्वभोक्ता आहे. जड पदार्थ सर्व परार्थ म्हणजे दुसऱ्यासाठींच आहेत. सर्व विषय, सर्व भोग, कल्पनावृत्ति, मानसप्रत्यय, विकल्प हे सर्व आत्मप्रकाशानेंच भासतात. सर्वांचा भोक्ता आत्माच आहे. त्यावांचून अन्य भोक्ता कोणीच नाहीं. सर्वांचा उपसंहारही आत्म्यांतच होतो. तथापि आत्मा सदासर्वदा असंहत, अलिप्त,

असंग, एक, अद्वितीय, अक्रिय असाच राहतो. यांतही विशेष लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, लोखंड लोहचुंबकाकडे, अभ्र आकाशांत, लाटा आपल्या मुख्य स्थानाकडे, साहजिकच धांवतात. हीच मुख्य आत्म्याची आकर्षणशक्ति होय. म्हणून सर्व जगाचा लय आत्म्यांतच होणार. यावरून आत्मा हा स्वतंत्र आहे हें पूर्णपणें लक्षांत ठेवावें. विशेष विचार "ज्ञान-मार्तंड" ग्रंथांत आहे. सांप्रदायिक वेदांताचें ज्ञान होण्यास त्या ग्रंथांचें नित्य पठण व मनन करीत जावें.

## आधिदैविक उपासना.

श्रीदत्तात्रेयाचा चतुर्थ अवतार श्रीमाणिकप्रभु महाराज, ही या संप्रदायाची मुख्य उपास्य देवता होय, हें यापूर्वी सांगितलें आहेच. विशेषतः श्रीदत्तात्रेयांची आदिशक्ति–जिला श्रीमधुमती म्हणतात–तिचा प्रादुर्भाव व महात्म्य याच संप्रदायांत आढळून येईल. देवीभागवताच्या अष्टम स्कंधाच्या शेवटीं आदिपंचक म्हणून लिहिलें आहे, त्यांत घारेश्वरी, जंबुवादिनी, अरुणिका, मीनाक्षी व मधुमती हीं नांवें आहेत. तसेंच श्रीमधुमतीची उपासनाही सांगितलेली आहे. हिलाच मतंगकन्या असेंही म्हणतात. जो अवस्थात्रयीला किंवा देहत्रयाला सर्वकाल आपलें सामर्थ्य देऊन चालवितो, त्यालाच आधिदैविक स्वरूपांत आम्ही श्रीदत्तात्रेय असें म्हणतों. ही वरील चालकत्वाची क्रिया शक्तिवांचून स्पष्ट होऊं शकणार नाहीं. ती जी शक्ति, तीच देवी मधुमती होय. म्हणून सांप्रदायिकांनीं उपासनेच्या प्रसंगीं, मधुमतीसमवेत श्रीदत्तात्रेय यांचें ध्यान करणें अवश्य आहे.

हा संप्रदाय अद्वैती व सर्वव्यापी असल्यामुळें अमक्याच एका देवतेचा मंत्र घेतला पाहिजे असा आग्रह मुळींच नाहीं. कारण आपले सद्गुरूच नानावेषांनीं या जगांत नटलेले आहेत, सर्व स्वरूपें त्यांचींच आहेत, म्हणून बाह्यतः भेद दिसला, तथापि वस्तुतः सर्व देवता एकरूपच आहेत, असा

निश्चय ठेऊन कोणताही मंत्र घेतल्यास बाधक होणार नाहीं. तथापि सर्वांना सारखा उपयोगी असा—

" भक्तकार्यकल्पद्रुम गुरुसार्वभौम श्रीमद्राजाधिराज योगी महाराज त्रिभुवनानंद अद्वैत अभेद निरंजन निर्गुण निरालंब परिपूर्ण सदोदित सकलमतस्थापित श्रीसद्गुरु माणिकप्रभु महाराजकी जय. "

हा महामंत्र आहे, त्याचा अखंड जप करावा. शिवाय " श्रीमाणिक जय माणिक " या ओव्या प्रातःकाळीं म्हणाव्यात हें सर्वांस क्षेमकारक आहे.

## आर्या

अस्ति भाति प्रिय जग हें सकलमतीं चित्प्रभू, दुजा नाहीं ॥
जाणुनि सकलमती मी स्थापक हें ब्रीद गाजवीं पाहीं ॥ १ ॥

## उपदेश-रत्नमाला

### ओव्या

श्रीमाणिक जय माणिक । हर माणिक हरि माणिक । चिन्माणिक सन्माणिक । जयजय हो सकलमता विजय हो ॥ १ ॥

चैतन्यदेवा हीच प्रार्थना । एकचि तूं दिससी नाना । प्रकटूनि आमुचिया भजना । सिद्धि द्यावी ॥२॥ सकलमतां प्रेरक । चैतन्य एक गुरु माणिक । हा सिद्धांत मोक्षदायक । सत्य सत्य ॥ ३ ॥ मनीं सकलमतीं द्वेष । वरी करूं भजन घोप । तरीं कल्पकोटी नरकवास । घडो आम्हां ॥ ४॥ राम, कृष्ण, संत, सज्जन । शिव, शक्ति, सूर्यनारायण । गुरु उपदेश महावाक्य श्रवण जाण । सकलमता अनुसरती ॥ ५ ॥ सूर्यकिरणीं मेघमंडळ । जल वर्षोनी होती निर्मळ । तैसें जाति, धर्म, विविध मतें सकळ । चिदाकाशीं मावळती ॥ ६ ॥ मतमतांतरीं अनुचित जें जें । निरसोनि सुख साम्राज्य भोगिजे । तरीं काया वाचा मनें सेविजे । सकलमतीं ईश जो ॥ ७ ॥ तूं गा भक्तकार्य कल्पद्रुम । सकलमतां विजय हो स्वस्वधर्म ।

हा राजमार्ग उत्तमोत्तम। साक्षी श्रीशिवदत्त ॥ ८ ॥ अनंत वेद अनंत आचार्य जाण। परा,पश्यंती,वैखरी, स्फुरण। सिद्धवचन भूत भविष्य वर्तमान। अनंतानंत नमितों आम्ही ॥ ९ ॥ धर्मकर्म त्यागाचरण। आचार विचार पाप पुण्य। सर्व कर्मे श्रीमाणिकार्पण। ही आमुची प्रतिज्ञा ॥ १० ॥ जीव शिव शास्त्र षट्प्रमाण। पंचभूत इंद्रिय प्राण। सकल मतस्थ शरीर जाण। विषय भोगिती अभेदपणें ॥ ११ ॥ सकलमतीं हा आत्मा ईश्वरू। आम्हीं सकलमता जाणोनि आदरूं। तोचि हो आमुचा गुरू। जो कां श्री सकलमताचार्य ॥१२॥ जे का वंदिती निंदिती। स्वभाव नास्तिक भेद मत स्थापिति। तेहि आदिरिली सकलमतीं। सर्वांतरी श्रीमाणिक ॥१३॥ धन्य माता धन्य पिता। धन्य उपासन धर्म देवता। जो आदरी सकलमतां। तोचि धन्य ॥ १४ ॥ स्वरूप प्रकाश आनंद चैतन्य। शिष्य गुरू मी तूं पण। सर्वरूपें हा श्री प्रभू जाण। म्हणे ज्ञानमार्तंड ॥ १५ ॥

कोणास विशेष अनुष्ठान करावयाचें असल्यास "माणिक सहस्राक्षरकवचांत" मंत्र आहेत त्यांचा जप करावा. आणि होमहवनांचें विधान व द्रव्य "श्रीदत्तात्रेय कल्पांत" जसें सांगितलें आहे तसेंच समजावें.

याशिवाय आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी या चतुर्विध पुरुषांस, स्त्री, बाल, व वृद्ध यांसही देवतावर प्रीति व्हावी व आमचे गुरु सर्व देवतारूपि असून नाना वेषधारी आहेत हें ठसण्याकरितां "सातवारांचें भजन" करणें, "गुरु संप्रदाय" वाचणें, प्रसादाच्या डब्रीची पूजा करणें, इत्यादि जे नियम आहेत, तेही अवश्य पाळावेत.

## आधिभौतिक उपासना.

दरवर्षी श्रीजयंत्युत्सवासाठीं श्रीमाणिकनगरास यावें, जयंतीच्या कार्यक्रमांत यथाशक्ति भाग घ्यावा, पंक्तींत वाढावें, मंदिराचें आवार झाडून साफ करावें, प्रदक्षिणा घालाव्या, उत्सवाकरितां आलेल्या लोकांच्या उपयोगी पडावें व एकंदरींत जयंत्युत्सव यथासांग पार पाडण्यास शक्य त्या परीनें मदत करावी.

## अभ्यास.

सांप्रदायिकांनीं अभ्यास म्हणून वेदांतसिद्धांताच्या गोष्टी कराव्यात. मुख्य अभ्यास म्हणजे ज्ञानविचारणा करणें व धारणा करणें हा आहे. योगमार्गांतही धारणाच मुख्य आहे. धारणेनें "नरका नारायण होतो" हें म्हणणें तात्काल अनुभवास येतें. ज्ञानाभ्यास करणाऱ्या पुरुषास धारणा सहजसिद्ध होते. थोड्याशा यमनियमानें मनोधारणा पूर्ण झाल्यास अभ्यासी पुरुष सर्व सामर्थ्यवान् होतो, हें अनुभवसिद्ध आहे. या अभ्यासामुळें सांसारिक गोष्टींत कांहीं व्यत्यय येतो असें वाटूं लागल्यास त्याबद्दल उदासीन न होतां सौम्यपणानें वागावें; म्हणजे कामक्रोधादि विषयांचा सर्वथा तिरस्कार करण्याच्या भानगडींत पडूं नये; व तो सर्वथा होणें शक्यही नाहीं.

## ध्येय.

आत्मा स्वतंत्र आहे. त्यावर कोणताच संस्कार होत नाहीं. तो सहजमुक्तच आहे. कोणाचाही आत्मा बिघडत नाहीं किंवा बिघडलेला नाहीं. विदेहमुक्ति किंवा जीवन्मुक्ति हे संस्कार, मायावृत्तीमुळें, आत्म्यासच होतात, असा अपवाद येतो. सर्व व्यवहार गुणस्वभावानुरूप चालत असतांही, मी मुक्त, ब्रह्मस्वरूप आहें, ही भावना ज्याची मुळींच कमी होत नाहीं, त्याचीच योग्यता मोठी आहे. जी गोष्ट सहजसिद्ध व सहजप्राप्त आहे, ती प्रथम दृढ करून घ्यावी, हेंच श्रीशंकराचार्यांच्या सर्व उपदेशाचें गूढ रहस्य आहे. म्हणून या संप्रदायांत, सलोकता, सायुज्यता, समीपता व सरूपता या चतुर्विध मुक्तींचें महत्त्व नसून, सहजमुक्तीचीच, आम्ही विशेष प्रतिष्ठा मानतों. यासंबंधांत, सविस्तर विचार "ज्ञानमार्तंड" पूर्वार्ध कलम २३ मध्यें पहावा. सारांश स्वर्गादि लोकप्राप्ति किंवा अनेक प्रकारच्या सिद्धि हें साध्य न समजतां, आपण भूत, भविष्य, वर्तमानकालीं, एक,अखंड सर्वव्यापक, निर्लेप, आणि सुखरूप आहोंत, असें ज्ञान होणें यालाच सहजमुक्ति म्हणतात. हेंच आपलें ध्येय होय असें समजावें.

## संप्रदायाचें वैशिष्ट्य.

या संप्रदायांतील मुख्य व विशेष गोष्ट ही कीं, चालू जन्मांतच साधन-संपत्ति असावी, तरच ज्ञानप्राप्ति होते, असें मुळींच नाहीं. श्रीअवधूत-गीतेमध्यें—

'ईश्वरानुग्रहादेव पुंसामद्वैतवासना,'

असें जें सांगितलें आहे तोच खरा सिद्धांत होय. यांतील मर्म असें आहे कीं, एकदा उत्पन्न झालेलें शरीर, आकृति किंवा भोग हे नाश पावल्या-वांचून राहत नाहींत. तसेंच भोगाचा क्षय होऊन चर्मदेह आल्यावांचून ज्ञान होत नाहीं. त्यापक्षीं साधनसंपत्तीची विशेष प्रौढी नाहीं, हें स्पष्ट होतें. सिद्धांत पक्ष पाहूं गेलें, तर सर्व जन नित्य मुक्तच आहेत. यासंबंधाचा विशेष विचार 'ज्ञानमार्तंड' पूर्वार्ध कलम ३ मध्यें केलेला आहे, तो जिज्ञासूंनीं पहावा. यावरून साधन संपत्तीशीं या संप्रदायाचा पूर्ण विरोध आहे असें मात्र कोणीं समजू नये. ज्या अर्थी तीव्र जिज्ञासा उत्पन्न झाली आहे व बुद्धि शुद्ध आहे, त्या अर्थी जन्मांतरीं तरी त्याला साधनसंपत्ति प्राप्त झाली असावी हें उघड आहे. तथापि ज्याप्रमाणें "अथातो धर्मजिज्ञासा" हा उपदेश ज्यांना केला जातो ते त्या जिज्ञा-सेचे पूर्ण अधिकारी असे दीक्षित किंवा याज्ञिक असतातच असें नव्हे; कित्येक जन्मानंतर ती त्यांची जिज्ञासा पूर्ण होणारी असते; म्हणून जसें ते त्या उपदेशाला अनधिकारी ठरत नाहींत, त्याचप्रमाणें, साधनसंपत्ति स्पष्ट दिसली नाहीं, तथापि केवळ हिताकरितां, ब्रह्मतेजाच्या प्राप्तीकरितां "अथातो ब्रह्मजिज्ञासा" हा उपदेश करणेंही आवश्यक आहे; त्याला साधनसंपत्तीची वाट पाहणें नको.

यापमाणें थोडक्यांत या संप्रदायाचें दिग्दर्शन केलेलें आहे. जिज्ञा-सूंनीं संप्रदायाचे इतर ग्रंथ व विशेषतः "ज्ञानमार्तंड" ग्रंथाचें मनन केल्यास सर्व खुलासा होणार आहे.

सारांश, सांप्रदायिकांनीं आपण चैतन्याचे उपासक आहोंत असें समजावें. जडाच्या उपासनेंत म्हणजे नामरूपावर अभिमान न बाळगतां, सर्व देवतेंत चैतन्य एकच आहे हें लक्षांत ठेवावें. उदाहरणार्थ—श्री पांडुरंग व्यंकटेश, भवानी, मार्तंडभैरव अशीं निरनिराळीं नांवें असलीं, तरी पण आमच्या सांप्रदायिकांनीं या सर्व देवतांत चैतन्य एकच आहे, हें जाणून कोणत्याही देवतेच्या उपासकाशीं विरोध न करितां पूर्ण प्रेमभाव ठेवून वागावें. या संप्रदायाचे ग्रंथ पाहिल्यास हें कळून येईल कीं, केवळ परस्परांच्या दृष्टिदोषामुळें व विशिष्ट पक्षाच्या अभिनिवेशामुळें निरनिराळ्या संप्रदायाचे सिद्धांत एकमेकाशीं विरोधी आहेत असें भासतें. त्यांचा तो विरोध नाहींसा करून सर्वांचा समन्वय या संप्रदायामध्यें दाखविलेला आहे. तरी सांप्रदायिकांनीं, सर्व कर्में ईश्वरार्पण करीत राहून, आपलें हित साधून घ्यावें.

संप्रदायाची अभिवृद्धि करण्याचा ज्यांचा निश्चय असेल, त्यांनीं श्रींची गादी स्थापन करावी, सटका, पादुका यांची अर्चा सुरू ठेवावी. मात्र हें लक्षांत ठेवावें कीं, गादी व सटका हीं दैवतें ज्यांच्या घरीं असतील, त्यांनीं नित्य भिक्षा मागून त्याचा नैवेद्य यांस दाखविला पाहिजे.

## उपसंहार व प्रार्थना.

शेवटीं, सद्गदित अंतःकरणानें, परमेश्वर ( ...... सकृद्विभातुम् ) सार्वकाल समक्ष उभा आहे, हें ओळखून करुणापूर्वक, सविनय, सर्वांस सुचवितों कीं, मताचा अभिमान, प्रत्येकीं वेगळें आचरण या सर्व गोष्टी गुणमूलक आहेत. ज्यांचा जसा स्वभाव आहे, तसा ते उद्दाम प्रयत्न—अनुष्ठान—करून, आपल्या स्वभावानुरूप बलि, दान, तर्पण, आसन, नेम करून, त्या उपास्य दैवतासच मुख्य मानून, वश करून घेतात. तशीच निर्गुण उपासनाही दृढ धारणेनें करतात. आमच्या सांगण्याचा भाव हा

कीं, परमेश्वरनिर्मित कोणतेही पदार्थ, मग ते वृक्ष, पाषाण असोत, मणिमंत्र असोत, षट् दर्शनें किंवा योग असोत, शाक्त, गाणपत्य वगैरे कोणताही संप्रदाय असो, किंवा इतर कोणताही दृश्य पदार्थ असो, तो कांहीं तरी हेतूवांचून उत्पन्न झालेला नाहीं. सर्व सृष्टि परमेश्वरानें विचारपूर्वकच ( स ईक्षत ) उत्पन्न केलेली आहे. ईश्वरी रूपांत तर अज्ञान किंवा भ्रम मुळींच संभवत नाहीं; म्हणून ईशनिर्मित जे जे पदार्थ आहेत, ते तें सर्व त्यास दाखविणारे, हितकारक असेच आहेत. त्यांत ईश्वरप्राप्तीची शक्ति आहे. म्हणून आम्ही सर्वांचे सेवक बनून, सर्व मतवादी किंवा उपासक यांच्याजवळ हीच मागणी मागतों कीं, चैतन्य ईश्वर, सर्वांतरात्मा, सकलमतीं आहे; त्यावर निश्चय ठेवून, विरोध न करतां प्रेमा वाढवावा. आत्मविलासार्थ हें जग उत्पन्न झालें आहे, त्या पक्षीं, इच्छेनुसार सर्व भोगून अखंड आत्मरूपानें निर्लेप राहावें. सर्व विषय सत्ताविलसित आहेत, जगांत आत्म्यावांचून कोणीही भोक्ता नाहीं. विषयांचें अस्तित्व भासणें, अनुभव, उपलब्धि, अवगति हे सर्व आत्मतेजाचे विलास आहेत; हें ओळखावें व अखंडानंदांत निमग्न राहावें; असो. अग्नीप्रमाणें, सर्व विषय भोगून अलिप्त राहणारे श्रीदत्तात्रेयमहाराज हेच आमचे परमगुरु होत; ते सर्वांचेंही कल्याण करतात. म्हणून अति नम्रतापूर्वक, सर्वांचें कल्याण होवो हीच वारंवार प्रार्थना करून, पुढचे शब्द उच्चारून त्यांच्या चरणीं विराम घेतों.

श्रीमाणिक जय माणिक । हर मणिक हरि माणिक । चिन्माणिक सन्माणिक । जय जय हो सकलमता विजय हो ॥ १ ॥

॥ शुभं भवतु ॥

---



श्री

भक्तकार्यकल्पद्रुमादि-ब्रीदांकित

# सद्गुरु माणिकप्रभु

# महाराज

यांचीं पदें

॥ श्री ॥

# पदांची क्रमवार सूची

——*——

## ॥ श्रीगुरु अवधूत ॥

### पद १

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल )

श्री गुरु माझा दत्त दयाघन रे ॥ धृ० ॥ अंतर चालक त्रिभुवन पालक। सकलांसी जीवन रे ॥ १ ॥ अखंड अगोचर व्यापि चराचर। शाश्वत चिद्धन रे ॥ २ ॥ माणिकदासासि मिळविले स्वरूपासी। देउनि उन्मन रे ॥ ३ ॥

### पद २

( राग—काफी. ताल—दिपचंदी )

ब्रह्म सनातन गा रे गड्यांनों ॥ धृ० ॥ डोळियाचा डोळा डोलत निशिदिनिं। डोळस होऊनि पाहा रे ॥ १ ॥ निर्विकार निरंजन त्याच्या ठायीं ॥ निश्चित होउनि राहा रे ॥ २ ॥ अखंडितांत अनंत भरला। आनंदें माणिक प्रभु ध्या रे गड्यांनों ॥ ३ ॥

### पद ३

( राग—देस. ताल—त्रिताल )

म्हणुनी जग नाहीं जग नाहीं। जग हें ब्रह्मचि पाहीं ॥ धृ० ॥ स्फूर्तिरूप तेचि माया। मायाविण ब्रह्म वाया ॥ १ ॥ माणिक म्हणे अनिर्वाच्य। वाचेविण अनिर्वाच्य कैचें ॥ २ ॥

### पद ४

( राग—जोगिया. ताल—धुमाळी. अभंग )

आम्ही येथींचे तेथींचे। वेद जाणती नेतीचे ॥ धृ० ॥ आम्हां नाहीं येणें जाणें। आम्ही पूर्णातीत पूर्ण ॥ १ ॥ आम्हां गांव ठाव नाहीं। अवा-

तीत सर्वांठायीं ॥ २ ॥ आमचें नाम माणिक नोहे । आम्ही आम्हांतीत होय ॥ ३ ॥

पद ५

( राग—जोगिया. ताल—धुमाळी. अभंग )

आम्ही पायीं येऊं जाऊं । परि पायातीत राहूं ॥ धृ० ॥ डोळ्यानें रूप पाहूं । परि डोळयातीत होऊं ॥ १ ॥ जिव्हेनें गाऊं ध्याऊं । परि जिव्हातीत राहूं ॥ २ ॥ आमचें नांव माणिकभाऊ । परि नामातीत होऊं ॥ ३ ॥

पद ६

( राग—काफी. ताल—दीपचंदी )

इतुकेनें झालें काय रे । परब्रह्म हाता न ये रे ॥ धृ० ॥ मी देह भ्रांति जाय पुन्हां न ये त्या वाटां । अहं ब्रह्मास्मि म्हणूनी मनीं भरलासे ताठा ॥ १ ॥ " ब्रह्म वित् ब्रह्मैव भवति " हेंहि जाणूनी श्रुति । " सर्वं खल्विदं ब्रह्म " याची दृढ प्रतीति ॥ २ ॥ " नेति नेति नेति " वेद बोलोनि राहे । माणिक म्हणे अनिर्वाच्य तेथें बोल न साहे ॥ ३ ॥

पद ७

( राग—देस. ताल—त्रिताल )

तग तेंचि ग बाई तेंचि । निज वस्तु परब्रह्म साची ॥ धृ० ॥ कानानें ऐकत, डोळे भरूनी रूप पाहात । घ्राणानें घेत गंध सुगंध, जिव्हे कडूनि घेत स्वाद ॥ २ ॥ माणिक म्हणे भूतांच्या ठायीं, भूतीं असुनी भूतांत नाहीं ॥ ३ ॥

पद ८

( राग—झिंजोटी. ताल—दीपचंदी )

निर्गुण सगुण मी गाईना ॥ मी म्हणणें मज साहिना ॥ धृ० ॥ कानाविण मज ऐकणें । डोळ्याविण रूप देखणें । जिव्हेविण रस चाखणें । घ्राणाविण परिमळ घेणें ॥ १ ॥ पायाविण नीट चालतों । वाचेविण स्पष्ट

बोलतों । त्वचेविण सुख दुःख सोशितों । इंद्रियाविण भोग भोगितों ॥२॥ नामाविण मज माणिक नाम । कामाविण मज सर्वहि काम । धामाविण मज मंगल धाम । आकाराविण मजला सव्य वाम ॥ ३ ॥

## पद ९

( राग झिंझूटि. ताल—धुमाळी. अभंग )

हें तो ज्याचा तोचि जाणे । येरवीं तें काय बाणे ॥धृ०॥ येथें पाहिजे दैवाचें । इतरासीं लाभ कैचे ॥ १ ॥ दर्दुरी कमल संबंधी । परि भृंगचि घेतो सुगंधी ॥ २ ॥ गोचिडासी काय क्षीर । त्याचें भक्ष्य असे रुधिर ॥३॥ म्हणे माणीक वस्तूची खूण । न कळे सद्गुरूवांचून ॥ ४ ॥

## पद १०

(राग—भूप, जिल्हा. ताल—त्रिताल.)

निःसंग मी झालें ग बाई । कोणा बरें दिसो कोणा वाईट दिसो ॥धृ०॥ चुकल्यें मी होत्यें माझे घरासी । पूर्वस्थळाप्रति आल्यें॥ १॥ लाज नसे मर्यादा कशाची । मीपण माझें विरालें ॥ २ ॥ माणिक म्हणे श्रीगुरुपदीं लागुनी । पूर्ण बोधें मन धालें ॥ ३ ॥

## पद ११

( राग—जोगिया, ताल—धुमाळी )

तोचि परब्रह्म जाण या देहीं रे ॥ जेथें लवलेश शबलचि नाहीं रे ॥धृ०॥जेथें कल्पनेचा झाला नाश रे । द्वैताविण करी उपदेश रे ॥१॥ जेथें बैसे त्या ठायीं बैसे । बोले चाले परी भान नसे ॥ २ ॥ माणिक म्हणे तो योगिराय ॥ आतां जाउनि धरा त्याचे पाय ॥ ३ ॥

## पद १२

( राग—देस. ताल—त्रिताल )

तो योगी विरळा या जगांत ॥ धृ० ॥ सर्वांभूतीं सम सम दृष्टी । द्वैतचि नुपजे मनांत ॥ १ ॥ शुभाशुभ कर्में करित स्वभावें । लिप्तचि नाहीं तयांत ॥ २ ॥ माणिक म्हणे सुरवर मुनिवर । येती शरण तयास ॥३॥

## पद १३

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी )

नव्हे योगी तो जगीं। दांभिकपण जाण मना रे ॥ धृ० ॥ वसे मनिं द्वैत भाव। सर्वात्मक निजाभाव। वरि वरि वरि ज्ञानकळा। दावी जना रे ॥ १ ॥ आसनीं बसुनी झांकी डोळे। दृष्ट घाली कानी बोले। मौन वसे सर्वदा। न बोले कवणा रे ॥ २ ॥ स्तवन करितां बहुत डोले। प्रीति करूनि तया बोले। माणिक म्हणें द्वेष करितां। राग दुणा रे ॥३॥

## पद १४

( राग—झिंझूटी; ताल—धुमाळी. अभंग )

त्याचा देह नव्हे पापराशी। सहज समाधि म्हणती त्यासी ॥ धृ० ॥ जो कां सर्वदा समाधान। अलक्षासी लक्षून ॥ १ ॥ सर्वांभूतीं भगवद्भाव ॥ मीं तूं पण झाला वाव ॥ २ ॥ माणिक म्हणे ऐसा नर ॥ परब्रह्माचा तो अवतार ॥ ३ ॥

## पद १५

( राग—झिंझूटी. ताल—धुमाळी. अभंग )

योगियासी कैचें भय ॥ द्वैताविण झाला सर्व ब्रह्ममय ॥ धृ० ॥ स्वयं चिद्रूप होऊनि ठेले ॥ नेणें पिंड ब्रह्मांड झालें गेलें ॥ १ ॥ जो काळाचाहि काळ। स्वयंप्रकाश न लागे मायामळ ॥ २ ॥ म्हणे माणिक तया ही प्रतीति। देह असो नसो न मोडे ब्रह्मस्थिति ॥ ३ ॥

## पद १६

( राग—झिंझूटी. ताल—धुमाळी )

ते धन्य त्याची माय। आले उदरीं योगीराय ॥ धृ० ॥ मीपण गेलें तूं पण उरलें। आपणाविण तें पूर्णचि भरलें ॥ १ ॥ स्वस्वरूपीं आनंदेंचि डोले। आपणावरतीं आपणचि चाले ॥ २ ॥ जग हें झालें किंवा नाहीं। माणिक म्हणे हें नसे ज्याच्या ठायीं ॥ ३ ॥

## पद १७

( राग झिंझूटी. ताल—धुमाळी )

समान कैसें मानावें । प्रतीतिनें अनुमानावें ॥ धृ० ॥ फुगे मोतीं एकचि जाति । आपापल्या मोलें जाती ॥ १ ॥ माणिक म्हणे जरा हें देहधारी । देहाकृति गोवर्धनधारी ॥ २ ॥

## पद १८

( राग—काफी. ताल—दीपचंदी )

मम माया दुरत्यया त्यया रे । ऐसा बोध करी अर्जुनासी देव रे ॥ धृ० ॥ मजपासुनि मज लोपी, काज करी । दुस्तर बहु निर्दया दया रे ॥ १ ॥ हिनेंचि हें जगडंबर रचिलें । इनेंचि लाविलें लया लया रे ॥ २ ॥ माणिक म्हणे मजमाजिं जो मिळे । स्पर्श नसेचि तया तया रे ॥ ३ ॥

## पद १९

( राग—कानडा. ताल—त्रिताल )

मायेचा पसारा रे हा जग सारा ॥ धृ० ॥ जें जें दिसे तें तें नासे । नासे तें हि पुनरपि भासे ॥ १ ॥ माणिक म्हणे हें सुज्ञचि जाण । जाणे म्हणे तो कांहींच नेणें ॥ २ ॥

## पद २०

( राग—झिंझूटी. ताल—त्रिताल )

आवरणें कठिण या मनासी ॥ होत हानी रततां कामासीं ॥ धृ० ॥ ब्रम्ह्याचा शिरच्छेद झाला । विष्णु स्मशानीं वृंदेपासीं ॥ १ ॥ सदाशिवाचा लिंगचि झडला । भग फुटलें अमर अंगासी ॥ २ ॥ नारदाची नारदी झाली । लागे कलंक त्या चंद्रासी ॥ ३ ॥ माणिक म्हणे तप निर्फळ झालें । होतां लुब्ध मुनि ऊर्वशीसीं ॥ ४ ॥

## पद २१

( राग—जोगिया. ताल—त्रिताल )

आम्हीं केवळ क्रियाभ्रष्ट ॥ धृ० ॥ सख्या मायेशीं गमन करितों ॥

भगिनी रततों स्पष्ट ॥ १ ॥ माणिक म्हणे भक्तियेनें चालूं । परी जगासीं श्रेष्ठ ॥ २ ॥

## पद २२

( राग— झिंझूटी. ताल—दीपचंदी )

कोणी वंदा मला अथवा निंदा । झाल्यें मी परपुरुषावर फिदा ॥धृ०॥ मज माझ्या पतिचा बिघडा बिघडा । नित्य घेऊनि निजल्यें मी धगडा ॥१॥ माझा बंधु मायेचा भ्रतार खरा । माझा बाप असे बहिणीचा नवरा ॥२॥ केलें काका आत्यासंगें फलशोभन । माझा मामा बायकोप्रति माय म्हणे ॥ ३ ॥ मज माझे पतीची संगत सुटली । म्हणे माणीक कुळ घेऊनि उठली ॥ ४ ॥

## पद २३

( राग—काफी. ताल—दीपचंदी )

मनुआ समज धरी रे । लटिका हा संसार रे ॥ धृ० ॥ कन्या पुत्र दारा मोहपसारा । कोण कुणाचें वरदार ॥ १ ॥ शोधूनी पाहतां अशाश्वत देह । करी त्वरित विचार रे ॥ २ ॥ माणीक म्हणे अशाश्वत नरतनु । मायिक हा विस्तार रे ॥ ३ ॥

## पद २४

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल )

या समयासी शाश्वत माटे । आणि निमिषार्धीं कसें कीं काय । जल बुद्बुदवत् हा देह बापा । यासी शाश्वत मानुनि काय ॥ धृ० ॥ पहा गंधर्व नगरीचे घोडे । उडे कल्पित बहु वाटे । पाहूनि आणखी पाहूं जातां । जेथींचे तेथेंचि आटे ॥ १ ॥ आकाशाहूनी वर्षत मेघधारा । गारा परिच दिसे । अभिलाषित मन घ्यावें म्हणूनी ऐसें । विघरुनि जाय येतां सरिसें ॥२॥ माणिक म्हणे स्वप्नीं भासत भासा । पाहूनि मन मोहे । जागृति होतां कांहीं दिसेना । त्यापरि देहादि जग हें ॥ ३ ॥

## पद २५

( राग—काफी. ताल—त्रिताल )

सख्या तुझी काया दो दिवस राहणार ॥ धृ० ॥ मानुं नको शाश्वत या देहा । एक दिवस जाणार ॥ १ ॥ म्हणशील माझे मातापिता बंधु । अंतसमय पाहाणार ॥ २ ॥ माणिक म्हणे संग धरि त्याचा । जो हरिगुण गाणार ॥ ३ ॥

## पद २६

( राग—झिंझूटी.ताल—दीपचंदी )

आज आहे जीव, आतां आहे मढें । मज पाहुनी येतसे रडें ॥ धृ० ॥ नाक नीट डोळे भुंवई कमानी । रूप सुंदर रोकडें ॥ १ ॥ जोंवरि जीव तोंवरी ममता । जीव गेल्या होतो जड ॥ २ ॥ सुंदर तनु हे नेउनि जाळिती । दिसेना तीं चर्म हाडें ॥ ३ ॥ माणिक म्हणे हरिभजनालागीं । करि सख्या गडबड ॥ ४ ॥

## पद २७

( राग—दुर्गा. ताल—त्रिताल )

देह शाश्वत चित्ता आणूं नये । मृगजळ खरें ऐसें मानूं नये ॥धृ०॥ काय भरवसा गंधर्वनगरीचा । जल बुडूबुडू शाश्वत मानूं नये ॥ १ ॥ माणिक म्हणे शाश्वत प्रभु एकचि । त्याचे गुण वाखाण्तां नये ॥ २ ॥

## पद २८

( राग काफी. ताल-दीपचंदी )

देह शाश्वत नाहीं । करूं नको लटिका व्यवहार ॥ धृ० ॥ तूं म्हणसी मी खटपट करितों । निराळा चालवी संसार ॥ १ ॥ आला सपाटा जाशिल उडुडा । मग जेथींचे तेथेंचि घरदार ॥ २ ॥ माणिक म्हणे अशा-श्वत नरतनु । मायिक हा विस्तार ॥ ३ ॥

## पद २९

( राग—मुलतानी. ताल—दिपचंद )

जगीं देहधारी सुखी कोण आहे । राजारंक बालादि वृद्धांसि पाहे ॥ धृ० ॥ माणिक म्हणे देह पंचभूतांचा । होय जाय नासे स्वभावचि याचा ॥ १ ॥

## पद ३०

( राग—देस. ताल—त्रिताल )

अभागी येथें कोण मरे ॥धृ०॥ मी देह मानुनी मरण मलाचि । मूढ मनांत झुरे ॥ १ ॥ पंचभूतांचा हा जग सारा । भूतांमाजि विरे ॥ २ ॥ माणिक म्हणे येथें मरणचि नाहीं । पूर्णचि पूर्ण बरें ॥ ३ ॥

## पद ३१

( राग—जोगीया. ताल—दिपचंदी )

अमंगल काया किती म्हणुनि धुशी । ते प्रक्षाळितां काय निर्मळ होसी ॥ धृ० ॥ मुळीं देह पहा कशाचा तो आहे । मातेचें रक्त पिता रेत होय ॥ १ ॥ अस्थि मांस नाडी चर्म गुंडाळा ॥ तयामध्यें तापे नरकाग्नि ज्वाळा ॥ २ ॥ म्हणे माणिक तूं नसे तुझ्या ठाया । म्हणुनी धू धू श्रमतोसी वाया ॥ ३ ॥

---

# कानडी पदें.

## पद ३२

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी )

वस्तु अह्लिल्ला इह्लिल्ला । ठाव ठिकाणिने इल्ला ॥ धृ० ॥ तळगे म्याह्लिल्ला नडविल्ला । नोडिदवनु नोडिल्ला ॥ १ ॥ रक्त श्वेतल्ला शामल्ला ।

नीलवर्ण अदुअह्ला ॥ २ ॥ माणिक ह्यसरह्ला कुसरह्ला । ह्यन इह्ला ताने वह्ला ॥ ३ ॥

## पद ३३

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

नी दारु ननगे ना येनु निनगे । नानीनु अंबोद्दु प्रकृति स्वभावा ॥ धृ० ॥ प्रथमह्लि शिवनु अवरिंद जिवनु । शिवनु इह्लदह्ली जिवनु अभावा ॥ १ ॥ यह्लित्तु काया अल्यादो छाया । काया इह्लदह्लि छायानु अभावा ॥ २ ॥ माणिक ह्यसरह्लि नी नानु हुट्टह्लि । द्वैत मार्ग बिट्टु नोड अनुभवा ॥ ३ ॥

## पद ३४

( राग—काफी. ताल—दीपचंदी )

निनवळगे नी निनग नोडो । यलो अनुमानस व्याडो ॥ धृ० ॥ निराकार नी आकारनु अह्ला । ना देह भ्रांति बिडो ॥ १ ॥ देह अशाश्वत वस्तूने शाश्वत । मृत्यु चिंति बिट्ट कुडो ॥ २ ॥ माणिक निनगे ई मात तिळिह्लिक्के । सद्गुरु सेवा नी माडो ॥ ३ ॥

## पद ३५

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी )

व्यापक शिव हिंग अंदवनु ताने । मत वव्व तानेनु तानेनु ताने ॥ धृ० ॥ मूढनु तानेनु चतुरनु ताने अरसनु तानेनु रंकनु ताने ॥१॥ रूपनु तानेनु कुरुपनु ताने । बलवान तानेनु निर्बळिनु ताने ॥ २ ॥ सण्णवनु तानेनु दोड्डवनु ताने । श्रीगुरु तानेनु शिप्यवनु ताने ॥ ३ ॥ पिंडांड तानेनु ब्रह्मांड ताने । माणिक ह्यसर हिंग इट्टवनु ताने ॥ ४ ॥

---

# हिंदी पदें.

## पद ३६

( राग—पिलु. ताल—दिपचंदी )

नयन दिया नयननसे जानो । हम कहते सो बुरा मत मानो ॥धृ०॥ नयन दिया कछु देखन भाई । तुम देखत हो माल लुगाई ॥ १ ॥ नयन रहते अंधे क्यों होते । नजर आयिसो चीज न पाते ॥ २ ॥ मानिक कहे नयन नरराजा । जिन्हें नयनसे साहेब खोजा ॥ ३ ॥

## पद ३७

( राग काफी. ताल—दीपचंदी )

मन समझ लेरे गव्हारा । नहि आवे बार बार मनुख जन्म अवतारा ॥ धृ० ॥ आयाथा मन कहांसे । जाता तू मन किदरसे । इसकी तो राह पछान कर । मायामें मन तू मत मर ॥ १ ॥ माया जो मन होय झूटी । दुनिया जो मन होय खोटी । दो दिन भरा है बजार । वहीमे करले गुजारा ॥ २ ॥ मानिक कहत है मन । ये बात भूल मत सुन बे । एक राम तेरा दाता । तेरेसाथ कोई नहि आता ॥ ३ ॥

## पद ३८

( राग—खमाज. ताल—धुमाळी )

भजन बिना तूं सुन नर मूरख । मुर्दा काहेकु सिंगारा रे ॥ धृ० ॥ जो प्रभुनें तोहे इतना दिनो । सो प्रभु दीनो बिचार रे ॥ १ ॥ आयाथा तब क्या ले आया । जाना अबहि उधारा रे ॥ २ ॥ मानिक के मन सुन नर मूरख । अबहुन चेत गव्हारा रे ॥ ३ ॥

## पद ३९

( राग—काफी. ताल—दीपचंदी )

सब दुनिया मोह पसारा है । एक राम निराकार है । अंदर बाहर सबहि भरा है ॥धृ०॥ व्याप रहा जग सारा । झाडपाड जल पूर भरा है ।

फिर दुनियासे न्यारा है ॥१॥ झूटी काया झूटी माया। झूटा जगत बसाई है। मानिक कहे सब साधु कह गये। क्या मैं जाने गव्हारा रे ॥ २ ॥

## पद ४०

( राग—पिलु. ताल—दिपचंदी )

हर हर घटमो एकहि एक। मुरपदके निगासे देख ॥ धृ ॥ बाबा अदमसे है पैदायष। निकलेगा दम गिर जावे लाष ॥ १ ॥ मानिक कहे आपहि आप। आपहि बेटा आपहि बाप ॥ २ ॥

## पद ४१

( राग झिंझूटी. ताल—त्रिताल )

मन कायका डर है तुझे। अल्ला तेरा रखवाली है ॥ धृ० ॥ मानिक कहे ये जानकर। नबी अलीका ध्यान कर। महबूबकी पैछान कर। सिरपर मदत सब वली है ॥ १ ॥

## पद ४२

( राग पिलु जिल्हा. ताल—दीपचंदी )

साधु होगा सो रंडीकु लग रे ॥ धृ० ॥ उस रंडीका बदन बडा है। तामे निकसत जग रे ॥ १ ॥ मानिक गुरु लागा सो लागा ॥ साडी-कु पूछ गया ठग रे ॥ २ ॥

## पद ४३

( राग—झिंझूटी. ताल—धुमाळी. )

ये तो तूने जाना नहि। बोलता सो कोन है ॥ धृ० ॥ मानिक कहे आपहि आप। आपहि बेटा आपहि बाप। कहां तेरा पुण्य पाप। आंख मूंचे खोलता सो कौन है ॥ १ ॥

## पद ४४

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

तेरी कैसी बनेगी बात रे ॥ धृ० ॥ संत संगत तोहे उपजत त्रास रे। फिरत दुष्ट के साथ रे ॥ १ ॥ जिंदगीमे सब दिन खोया। गिर-

गये तेरे दांत रे ॥ २ ॥ मानिकके मन लख चौऱ्यांशी। फिर फिर गोते खात रे ॥ ३ ॥

पद ४५

( राग—झिंझूटी. ताल—टप्पा. )

जाको लगी हुई सोही जानेगा। दुसरा क्या पैछानेगा ॥ धृ० ॥ नौ दरवाजों बीच दसवेमें है फिरकी। मानिक कहे कोई सुगर होवे। तामे लेवे गिरकी ॥ १ ॥

पद ४६

( राग—भूप जिल्हा. ताल—त्रिताल. )

जब ले जावे क्या रे करेगा ॥ धृ० ॥ मालमता तूं खूब जमाया। साथ न आवे यहीं धरेगा ॥ १ ॥ मानिकके मन जो नर जीवे। आखर वो एक दिन मरेगा ॥ २ ॥

पद ४७

( राग—यमन. ताल—त्रिताल. )

जहां देखे तहां रब तूहि तूहि। मानिक सांई भरपूर भरा है। देखन हारा वोहि वोहि ॥ १ ॥

पद ४८

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

जब मुरषदने कान फुका ॥ खुल गये आंखां मुझे मैं देखा ॥ मानिक कहे गफलत का परदा ॥ लेकर दस्त उठाकर फेका ॥ १ ॥

पद ४९

( राग—यमन, जिल्हा. ताल—त्रिताल. )

मनुवा छांड दियो रे विचार ॥ धृ० ॥ छांड दियो उस राम ध्यानको। पड गयो माया संसार ॥ १ ॥ नहि करियो दृढ साधन सेवा। नहि कहा मुखसे गुरुहार ॥ २ ॥ मानिकके मन बहुत समजको। कठिन जमका मार ॥ ३ ॥

पद ५०

( राग—खमाज. ताल धुमाळी. )

बिना शहरसे आया मुसाफिर। सौदा ले उठ भागा रे ॥ धृ० ॥ ना रहि उसकी नाम निशानी। ना कोई आगा पीछा रे ॥ १ ॥ मूरख होवे सो भटकत फिरे गा। सुगर होय सो जागा रे ॥ २ ॥ मानिकके मन तेरा नाम हंसा। मत हो रहो कागा रे ॥ ३ ॥

पद ५१

( राग—भैरवी. ताल त्रिताल. )

प्रभुविण कोण कुणाचा वाली ॥ धृ० ॥ कोण कुणाचा चाकर मालक। व्यर्थचि भाषण खाली ॥ १ ॥ कर्ता हर्ता तो करवीता। मी मिथ्या जन बोली ॥ २ ॥ माणिक म्हणे मातेच्या उदरीं। नऊ मास रक्षण केली ॥ ३ ॥

पद ५२

( राग—झिंझोटी. ताल–त्रिताल. )

साजणी गुरूनें कौतुक केलें ग ॥ धृ० ॥ बसवुनि सन्मुख सांगुनि गोष्टी। हात धरुनि मंदिरांत नेलें ग ॥ १ ॥ 'तत्त्वमसि' महावाक्य निरूपणीं। द्वैत रहित अद्वैतचि ठेलें ग ॥ २ ॥ माणिक म्हणे सद्गुरु करुणोदयीं। मीपण अंधःकारचि गेलें ग ॥ ३ ॥

पद ५३

( राग—भैरवी ताल—त्रिताल. )

राखीं लाज माझी अवधूता ॥ धृ० ॥ तुझें नाम घेउनि हिंडें जगीं। मी वागवुनि पंचभूतां ॥ १ ॥ माणिकदासाचें विघ्न दूर करीं ॥ दत्ता अत्रियाच्या सुता ॥ २ ॥

पद ५४

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

श्रीपादश्रीवल्लभ मां पाहि॥ यतिवर्या दीन करुणाशब्दें करुनी बाही ॥धृ०॥ नगर पीठपुर पूर्व दिशेसी ॥ राजपिता सुमतिच्या कुसीं ॥ दत्तात्रय

त्वां आपस्तंब वंशीं ॥ अरूप रूप परी देह धरिलासी॥१॥ मुंज लागली सप्तम वर्षीं ॥ लग्न लावितां नलगे म्हणसी ॥ देउनि दोन पुत्र मातेसीं ॥ बद्रिकाश्रमा पाहूं गेलासी ॥ २ ॥ गोकर्णीं तीन वर्षें वास ॥ श्रीगिरी चातुर्मास ॥ निवृत्ति संगमाहुनी कुरवपुरासी ॥ कृष्णा गंगा वाहे ग्रामासी ॥ ३ ॥ अंबिकापुत्र त्या मतिमंदासी ॥ कृपादृष्टीनें पंडित करिसी ॥ पुत्र ज्ञानी होय पुढिल जन्मासी ॥ व्रत दिलें तिसी शनिप्रदोषी ॥ ४ ॥ वर दिधला त्वां रजकालागीं ॥ विदुर नगरिचें राज्यसुख भोगी ॥ नरसिंह सरस्वति होऊन योगी ॥ दर्शन देईन मी तुजलागीं ॥ ५ ॥ गंगेमाजी गुप्तचि झाला ॥ कुरवपुरामधें वासचि केला ॥ वल्लभेशास्तव कैसा धांवला॥ तस्कर मारुनि दीन जिवविला ॥ ६ ॥ पाहि पाहि श्री सद्गुरुनाथा ॥ कृपा करुनि दे दर्शन आतां ॥ तुजविण कोण असे मज दाता ॥ माणिकदासा तारी दिनानाथा ॥ ७ ॥

## पद ५५

(राग—झिंझूटी. ताल—धुमाळी. )

धांव धांव तूं माझ्या दत्ता नरसिंहा ॥ तुझे दर्शनाविण चैन नाहीं जीवा ॥ धृ० ॥ करंज नगर एक उत्तर दिशेसी ॥ माधव नामक पिता वाजसनेय वंशीं ॥ आलासी श्रीपादा तूं अंबिकेच्या कुशीं ॥ मागें व्रत शनिप्रदोष दिधलें होतें तिसी ॥ म्हणुनि राहिला तूं गर्भ नवमासीं ॥ पडतां बाहेर बाळ ॐकार गर्जिसी ॥ १ ॥ नरसिंह म्हणुनी तुज नाम ठेविलें ॥ बाळपणीं स्वामी त्वां आपुली लीला दाखविली ॥ माते स्तनीं दुग्ध बत्तीस धारा सोडविले ॥ लोखंड लागतां हातां सुवर्णचि झालें ॥ मुंज लागली नाहीं म्हणतां यज्ञोपवीत दाखविलें ॥ कोणी बोला येई त्यासवें ॐकारचि बोले ॥ २ ॥ भिक्षा घालीतसे माता मुंजीचे समयीं ॥ भिक्षा घालितांचि वेद बोलिला चारीहि ॥ तीर्थ हिंडावया मातेसी पुससी लवलाही ॥ एक कन्या पुत्र ते तीन होती तुज पाही ॥ दत्तमूर्ति पाहुनि माता पिता लागे पायीं ॥ बद्रिकावना निघुनि राहसी काशीक्षेत्राठायीं ॥ ३ ॥ अष्टांगयोग साधन बहुत साधिलें ॥ कृष्ण सरस्वतीच्या

पाशीं आश्रम घेतले ॥ बद्रिकावनीं उत्तर तीर्थ सर्व न्हायिले ॥ सव्य घालुनि मेरू गंगासागर तटाकीं चाले ॥ प्रयागीं करूनि स्नान माधवा उपदेशिलें ॥ सर्वे घेऊनि शिष्यां सकल करंजनगरा आले ॥ ४ ॥ मातेलागीं म्हणे पुत्र तुझे शतायुषी ॥ तुमचा अंतकाळ होईल पुण्यस्थळ काशी ॥ कन्या एक शरण आली रत्नाबाई नामेंसी ॥ कुष्ट होइल तुज तूं जाई अमरजा संगमासी ॥ निघाला गौतम गंगा नाशिक त्रिंबकासी ॥ मंजरिकामध्यें माधवा नरसिंहरूप दाविसी ॥ ५ ॥ वासर ब्रह्मेश्वरासि गेला गंगातिरीं ॥ मिष्टान्नानें ब्राह्मण उदर व्यथा दूर करी ॥ सायंदेवावरी यवन कोपे ते निवारी ॥ संवत्सर गुप्त तूं राहसी वैजनाथपुरीं ॥ म्हणसि शिष्यांसी तीर्थ हिंडा जा लोकरी ॥ बहुधान्यनाम संवत्सरीं भेटे शैल्यगिरीं ॥ ६ ॥ मुनिसी देउनि ज्ञान गुरुकडे धाडिलें ॥ भिल्लवडी औदुंबरीं गुप्त तत्त्वें राहिले ॥ देवी धाडिली द्विज कुमारासी पंडित त्वां केलें ॥ भिल्लवडीहुनी वरुण संगमासी गेले ॥ पंचगंगेंत द्वादश वर्षें कुरवपुरा आले ॥ अमरपुरीं अमरेश्वरीं राहिले ॥ ७ ॥ वेल उपडितां ब्राह्मणांसी धन जें मिळे ॥ चौसष्टी योगिनी पूजितां पाहे गंगाबाळे ॥ व्याघ्रचर्म धरुनी गंगापुत्रासी तात्काळ ॥ माघपौर्णिमा दिनस्नान प्रयाग प्रातःकाळ ॥ माध्यान्हीं काशीस्नान गयास्नान सायंकाळ ॥ तिन्ही ठाव दाखवुनी आलासी पूर्वस्थळा ॥ ८ ॥ गाणगापुरासी आपण निघां गुरुराया ॥ चौसष्टि मिळे योगिनी लागती पायां ॥ म्हणती स्वामी आम्हालागीं टाकुनि जातां काय ॥ वर तुवां दिधला तया सांगुनि उपाय ॥ अन्नपूर्णा औदुंबरीं ठेवुनि जातां पाहे ॥ पादुका समीप तो सदाचि उभा राहे ॥ ९ ॥ पादुकांचा महिमा मी तो काय सांगूं देवा ॥ शिया बाळग्रामींचा विप्र गंगाधर नांवा ॥ औदुंबरीं त्याची भार्या करितसे सेवा ॥ वारुनि पिशाच्च तिसीं पुत्र दिले तुवां ॥ तीन वर्षें होतां पुत्र मुकला तो जीवा ॥ उठविलें प्रेत तुवां पाहुनि तिचे भावा ॥ १० ॥ ज्याचा जैसा भाव त्यासी तैसा तूं पावसी ॥ इच्छिले पदार्थ देसी तूंच या जगासी ॥ पडतां संकट स्मरतां त्वरित निवारिसी ॥ मज कां रे स्वामी तूं आतां कठोर झालासी ॥ धांव धांव दत्ता नरसिंहा किति अंत पाहासी ॥ माणिक दीनासी तारिसी धरुनी पोटासी ॥ ११ ॥

## पद ५६

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल )

करुणाकर ये कृपाळा। धरि करीं मज अंगीकार रे ॥ धृ ॥ पातक मजला फारचि घडलें। घातक अंत न पार रे ॥ १ ॥ प्रीति नसे तुझीया भजना रे। विषयाची आवड फार रे ॥ २ ॥ माणिक म्हणे प्रभु दर्शन देउनि। करी पातक संहार रे ॥ ३ ॥

## पद ५७

( राग—भैरवी. ताल—त्रिताल )

कनवाळू मूर्ति संताची। योगीराज महंताची ॥ धृ० ॥ आप परावा कांहिंच नेणें। वार्ता नाहीं अहंतेची ॥ १ ॥ माणिक म्हणे जग तारायास्तव। आलि विभूति भगवंताची ॥ २ ॥

## पद ५८

( राग—परज. ताल—त्रिताल )

तुझे नेणवे पाय अनंता रे ॥ धृ० ॥ दुर्बुद्धि असे मी अवगुणी। माझे अपराध मलिन खाणी। कधिं न बोले नामामृत या वाणीं ॥ १ ॥ ऐसा पापी असे महारापरी। पडिलों असे तुझिये पदरीं। माणिक म्हणे अपराध क्षमा करी कृपावंता रे ॥ २ ॥

## पद ५९

( राग—भैरवी. ताल—त्रिताल )

प्रीति या पायीं जडो जडो रे प्रभू ॥धृ०॥ घडो तरी मजला साधूची सेवा। भजन हें कानीं पडो पडो रे ॥ १ ॥ माणिक म्हणे प्रभु अन्यथा। वदतां जिव्हा ही समूळ झडो झडो रे ॥ २ ॥

## पद ६०

( राग—काफी. ताल दीपचंदी )

राखी लाज माझी देवाजी। मी तो पतीत रे ॥ धृ० ॥ दान धर्म हें मी कांहींच नेणें। नाहीं सन्मानिलें अतीत रे ॥ १ ॥ माणिक म्हणे प्रभु ऐसा मी पापी। कुश्चळ वसत मतींत रे ॥ २ ॥

पद ६१

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी )

वेडी पिशी मी जाहल्यें बाई ग। गुरुचरणीं लीन झाल्यें कीं। गृह धंदा मज कांहीं सुचेना। इंद्रिय धामा निमाल्यें कीं ॥ धृ० ॥ कानाचें ऐकणें राहिलें। नेत्र असुनि न दिसे कांहीं। स्पर्श विषयाचा भान उडाला। घ्राणीं ग्रहणत्वचि नाहीं ॥ १ ॥ मलमूत्र होउनियां न होय। पाय असुनि पंगु झाल्यें। जिव्हेचा रसस्वाद उडाला। हात असुनि व्यवहार न चाले ॥ २ ॥ मन हें पांगुळलें बाई ग। वाचा बोबडी वळली कीं। बुद्धीची निर्बुद्धि झाली। अहंकृति हेहि गळाली कीं। माणिक म्हणे गुरुचरणीं लीन झालें कीं ॥ ३ ॥

पद ६२

( राग—झिंझूटी. ताल—त्रिताल )

संतांची मी दासी दासी ॥ धृ० ॥ संतचरण रज तेंचि असें मज। कोटितीर्थ आणि काशी काशी ॥ १ ॥ संतस्मरण मुखीं तेणेंचि मन सुखी। दग्ध झाल अघ राशी राशी ॥ २ ॥ दास माणिक यास संतचरणींच वास। तुटून गेली भव फांशी फांशी ॥ ३ ॥

पद ६३

( राग—पिलु जिल्हा. ताल—त्रिताल )

ऐक आतां मुमुक्षु वा रे। त्वरितचि मोक्ष जीवा रे ॥ धृ० ॥ एक्याभावें तत्पर होउनी करीं कीं सद्गुरु सेवा रे ॥ १ ॥ सद्गुरुनाम तुम्ही जपा निशिदिनीं। पार करील भव भया रे ॥ २ ॥ माणिक म्हणे सद्गुरूच्या दयेनें डोळा भरूनी देव पहा रे ॥ ३ ॥

पद ६४

( राग.—यमन जिल्हा ताल—त्रिताल )

गुरुजी तोरे पैयांपे सीस धरूं ॥ धृ० ॥ मेरे तनका चाम निकासके। चरण पन्हय्यां करूं ॥ १ ॥ तोरे नामका ध्यान धरूं मै। तोरे नामका ध्यान धरूं मै। तोरे काज मरूं ॥ २ ॥ मानिक कहे तोरी मूरत स्वामी। नयनन बीच धरूं ॥ ३ ॥

# श्री शंकरपर पदें

### पद ६५

हर हर शिव शंकर शंभो हरहर ॥ धृ० ॥ पंचवदन विरूपाक्षा, विध्वंसन ऋतुदक्षा ॥ १ ॥ गौरीवर गंगाधर, अहिकुंडल शशिशेखर ॥२॥ पशुपति भस्मोद्धारण, दशकर मदन हुताशन ॥ ३ ॥ नीलग्रीव रूंडमाळ, ग्राहक नर कपाला ॥४॥ गजचर्मवसन विश्वेशा जगतारक व्योमकेशा ॥५॥ विषभक्षक मृत्युंजय ॐनमः शिवाय भवाय ॥६॥ मदनांतक सुख दायक सह पिशाच्च स्मशान स्थायक ॥७॥ गजवदन षडानन ताता, सकल दैवतत्राता ॥८॥ माया विकार विहीना रक्षक माणिकदीना ॥९॥

### पद ६६

(राग—मांड जोगिया ताल—धुमाळी)

या मुखसे हरनाम ले बे मूरख मनुवा ॥ धृ० ॥ या मुखसे हरनाम कहते रहना । कुबुद्धि वासना छोडदे बे मूरख ॥ १ ॥ फिर पछतावेगा हात नहि आवेगा । मनुख जनम अवतार तोहे बे ॥ २ ॥ मानिक कहे समज मन मुरख । फिर पछतावेगा सुन सुन रोवे बे ॥ ३ ॥

# श्रीदेवी

### पद ६७

(राग-भूप, जिल्हा. ताल—त्रिताल)

हर हर हरनी सधर भरनी जंगल वीच तूं मंगल करनी ॥ धृ ॥ दुष्टनको भक्षा कर भक्तनको रक्षाकर मानीक दीन की इच्छा पूर्ण कर जननी॥१॥

# श्री रेवणसिद्ध पंचपदि

### पद ६८

(राग—काफी. ताल—दीपचंदी)

रेवणसिद्धा तूं पाहि मला । जन्म जातो हा वाया ॥ धृ० ॥ त्रिविधताप तापत्रय तापलों । शरण आलों तुझे पाया ॥ १ ॥ भावभक्ति मी

कांहींच नेणें। मति नाहीं तुझे गुण गाया ॥ २ ॥ माणिक म्हणें जन्म मरण निवारी। नेउनि ठेवी निज पाया ॥ ३ ॥

### भजन

रेवणसिद्धा दयाळा ॥ माझे पातकनिर्दाळा ॥ १ ॥

### पद ६९

( राग—भूप जिल्हा. ताल—दीपचंदी )

कंडेना नम् रेवण सिद्धा ॥ धृ० ॥ निर्विकार निरंजन निर्गुण, निरालंब स्वतः सिद्धा ॥ १ ॥ रेवगीपुरी गिरी वास माडिदा, जगदोळगे यल्ला प्रसिद्धा ॥ २ ॥ माणिक गुरु यन्न मायाके अदळू, चित्स्वरूप तोरसिदा ॥ ३ ॥

### भजन

श्रीगुरुमुर्ति त्रिशुल करा ॥ रेवणसिद्धा भवहारा ॥ १ ॥

### पद ७०

( राग—हमीर कल्याण. ताल—त्रिताऊ )

भज मन रेवणसिद्धा अवधूता ॥ धृ० ॥ माथां जट बागांबर ओढे। अंग चढाय बभूत ॥ १ ॥ त्रिशूळ हात धरे विजया चढाये । आरक्त नयन अद्भुत ॥ २ ॥ मानिक कहे वाको सुमरन करते । कंप छुटे जमदूत ॥ ३ ॥

### भजन

सुमरन कर मन रेवणसिद्धा ॥ त्वरित पुनित होय जीवबद्धा ॥१॥

### पद ७१

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी )

रेवणसिद्धा तूं नवलचि दिससी । दिसणें पाहणेंविण स्वतः सिद्ध असती ॥ धृ० ॥ सगुण म्हणों तरी निर्गुण रूप । रूप अरूप हे व्यर्थ आरोप ॥ १ ॥ माणिक म्हणे रेवणसिद्ध नाम । नाम म्हणणे हे तों मुळीं भ्रम ॥ २ ॥

## भजन

सच्चिदानंदघन रेवणसिद्धा ॥ स्मरतां तुज ज्ञान होय मतिमंदा ॥१॥

## पद ७२

( राग—झिंझूटी. ताल—धुमाळी )

धन्य आज दिनिं झालों मी शुद्ध । स्वामी रेवणसिद्ध देखीयेला ।
॥ धृ० ॥ रेवगी ग्राम तेथें असे गिरी । स्वामी तयावरि वास केला
॥ १ ॥ कल्पतरूसम तेथील झाड । फळ बहु गोड पुष्प नाना ॥ २ ॥
पूर्वदिशाभागीं तीर्थ एक असे । स्नानें पाप नासे तात्काळचि ॥ ३ ॥
तेथींचे जळानें अभिषेक करिती । करुणा भाकीती सिद्धालागीं ॥ ४ ॥
सुरवर मुनि वसे तया ठायीं । सप्तऋषी पाही असे तेथें ॥ ५ ॥ माणिक
म्हणे तेथें गादीची पूजा । पूजितां सहजासहज स्वरूपीं पावे ॥ ६ ॥

## भजन

रेवगीपुरि गिरी भूकैलास ॥ रेवणसिद्ध करि तेथें वास ॥ १ ॥

## पद ७३

( आरति. ताल—दादरा )

जयदेव जयदेव जय रेवणसिद्धा ॥ आरती ओवाळूं तुजला स्वतः सिद्धा॥धृ०॥
रेवगी पुरी गिरिवरती रहिवास तूझा ॥ अनेका सिद्धांसहित गुप्त तूं महा-
राजा ॥ निर्विकार निरंजन निर्गुण निज सहजा ॥ अरूप म्हणून तूझ्या
गादीची पूजा ॥१॥ गिरिची शोभा वर्णूं न शके या वाचे ॥ कल्पतरूसम
वृक्षफूल नानापरिचे ॥ सप्त ऋषि आणि तेथें सुरवर स्वर्गींचें ॥ भूकैला-
सचि दूजा निश्चय मनिं साचे ॥२॥पूर्वमुखाच्या तीर्थीं जरि स्नान करिती॥
अनंत जन्म पातक नासुनि त्वरित गती ॥ तेंची जल प्रभुसी अभिषेकीं
प्रीति ॥ निर्मळ पुण्य त्याचें अन्य जल आणिती ॥३॥ रेवणसिद्ध ऐसे पंचाक्षर
नाम ॥ कोणी भाविकजन भजतां सप्रेम ॥ माणिक म्हणे त्या पाहुनि कांपे
यमधर्म ॥ जन्ममरण कैसें सुटला भवभ्रम ॥४॥

# श्री संगमनाथावरील पदें

## पद ७८

( राग झिंझूटि. ताल—धुमाळी. )

यो सखि कंडे नानु स्वामी संगमेशने ॥ धृ० ॥ केतकिप्रिय कमलोद्भव दाता। कल्मषनाशन महेशने ॥ १ ॥ बाणाकृतिसह अंब विराजित। भवभयनाश दिनेशने ॥२॥ सदानंद शाश्वत शिव सर्वात्मक। माणिक प्रभु जगदीशने ॥ ३ ॥

## पद ७९

(राग—झिंझूटी. ताल—धुमाळी.)

न्हाने चलो अमृतकुंडनमो ॥ धृ० ॥ ब्रह्मकमंडलुका जल भयो। सब तीरथफल पाना चलो ॥ १ ॥ अंगरोग सब न्हातेहि जावे । पावे कैलासा ठिकाना चलो ॥ २ ॥ मानिकके मन इच्छित पूरन । संगमेश दर्शन लेना चलो ॥ ३ ॥

## पद ७६

( आरति. ताल—दादरा )

जयदेव जयदेव जय संगमनाथा ॥ केतकिप्रिय तुज आरती ओंवा-ळिन आतां ॥ धृ० ॥ ब्रह्मदेव सृष्टि निर्माण करुन ॥ घ्यावा विसांवा म्हणुनी हुडकितसे स्थान ॥ केतकिवनिं त्या ठायीं केलें अनुष्ठान ॥ यास्तव उद्भवला लिंगाकृति बाण ॥ १ ॥ प्रातःकाल समर्थ लिंग देखियलें ॥ प्रेमे करोनि ब्रह्मा तयासि पूजियलें ॥ कमंडलुचे जलानें अभिषेक केले ॥ अमृतकुंड म्हणुनी तीर्थ तें जाहलें ॥ २ ॥ एक्या भावें कोणी तीर्थीं जे नहाती ॥ नासुनि पातक त्यांचे पावे त्वरित गति ॥ देह समंधी पीडा रोगादिक जाती ॥ पृथ्वीवरील तीर्थें त्या ठायीं वसती ॥३॥ उभय संगम म्हणुनी संगमेश नांव ॥ पृथ्वीवर नाहीं तुजसारखा देव ॥ माणिकदास शरण तुज एक्या भाव ॥ सदानंदा आतां मजलागीं पाव ॥ ४ ॥

# श्रीरामावरील पदें

## पद ७७

( राग--खमाज. ताल--धुमाळी )

नेणें मी स्वामी मला दाविसि ते पाय कधीं । होइन मी धन्य जगीं दृष्टि पडे पाय जधीं ॥ धृ० ॥ होउनियां वामन लहान मागसि दान बळिसि मही । द्वयपदें स्वर्ग मृत्यु तिसरा पाय देई अधीं ॥ १ ॥ शापबळें गौतमअबला होउनि शिळा पडली वनीं । लागतां चरणरज उद्धरली कन्याविधि ॥ २ ॥ म्हणे माणिक नलगे आणीक दुसरें कांहीं मला । लागला ध्यास मनीं रात्रंदिनिं तुझिया पदीं ॥ ३ ॥

## पह ७८

( राग–झिंझूटी. ताल–दादरा )

पाऊल तुझें वर्णिति तें दावि दयाळा । तें पहावें अशी आस निज ध्यास कृपाळा ॥ धृ० ॥ पद अंगुलितुनीं निघत गंगाशिव जटे धरी । ती प्रार्थुनिया प्राप्त झाली असे नृपाळा ॥ १ ॥ जे वर्णितात्ति वेद पुराणादि भारतीं । ज्या चरणरजें उद्धरली अहिल्या–शिळा ॥ २ ॥ माणिक म्हणे पाय मला दावि ते हरी । जे धरी करी चुरी नित्य सागर बाळा ॥ ३ ॥

## पद ७९

( राग–झिंझूटी. ताल–दीपचंदी )

जेथें तेथें राम भरला रे । त्याविण स्थळ नाहीं उरलें रे ॥ धृ० ॥ आसनीं शयनीं भोजनीं गमनीं । स्वप्नीं दिवा वा रजनीं । निज दृष्टीमाजी ठरला रे ॥ १ ॥ जनीं वनीं गगनीं पवनीं । वन्हीं जीवनीं आणि धरणीं । माणिक हृदयीं संचरला रे ॥ २ ॥

## पद ८०

( राग–भैरवी. ताल–त्रिताल. )

पदोपदीं राघव स्मरण करा ॥ धृ० ॥ उठतां बसतां बोलतां चालतां कठिण समय हा बरा ॥ १ ॥ स्वप्नीं जागृतिं सुषुप्तींतहि आठव हृदयीं धरा ॥ २ ॥ माणिक म्हणे ऐसे रामनाम हें पार करीतसे परा ॥ ३ ॥

पद ८१
( राग–झिंझूटी. ताल–दीपचंदी )

राजीवनयना रघूत्तमा रामा। सुखकर सीतावर सुंदर नामा ॥ धृ० ॥ अखिलानंदा अयोध्याधीशा । अगणितनामा हे अविनाशा ॥ १ ॥ कोदंड-धारी खमणि कुळदीपा । कल्मषनाशन कल्याण रूपा ॥ २ ॥ दशरथनंदन दशशिर छेदा । दासमाणिका दायक आनंदा ॥ ३ ॥

पद ८२
( राग—भैरवी. ताल—त्रिताल )

रामरूपीं रंगलें सये मन ॥ राम० ॥ पाहतां पाहतां जग नेणों झालों कायीं । पहाणेविण दंगलें ॥ १ ॥ मी–तूं पणाचा ठाव मोडला । आपणाविण आप गुंगलें ॥ २ ॥ माणिक म्हणे पूर्ण राम मी झाल्यें । मीपण माझें भंगलें ॥ ३ ॥

पद ८३
( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल )

रतुनियां रामा करिसी आरामा । स्मरतां कां न ये रामा ॥ धृ० ॥ रामासी देखोनि न रामासी भजसी । नरा ऐसी रीत न ये कामा ॥ १ ॥ भवसागरिंचा त्रास धरुनियां । आळवी घनश्यामा त्या ॥ २ ॥ माणिक म्हणे प्रभुस्मरण करा रे । तो नेईल निजधामा ॥ ३ ॥

पद ८४
( राग.—कानडा जिल्हा. ताल—त्रिताल. )

राम होउनि राम गा रे । रामासी शरण रिघा रे ॥ धृ० ॥ कोण कैंचा हें विचारा ॥ नका कर्म करूं व्यभिचारा ॥ १ ॥ हा दुस्तर भव हराया । तुम्हि जोडा सखा गुरुराया ॥ २ ॥ म्हणे माणिक निज राम पहावा । तयालागीं हृदयींच जपावा ॥ ३ ॥

पद ८५
(राग–यमन. ताल–त्रिताल)

क्षणभरिंच्या विषयासी लुब्धुनि । सीताराम विसरलों कीं ॥ धृ० ॥ कामधेनुसी बाहेर लोटुनी । कांजिसि मुख मी पसरलों कीं ॥ १ ॥

कल्पतरूसी उपटुनी टाकुनी । कंटक वृक्ष पसरलों कीं ॥ २ ॥ माणिक म्हणे परिसासी फेंकुनी । खापर हात पसरलों कीं ॥ ३ ॥

### पद ८६
(राग–पिलु. ताल–दादरा)

कोदंडधारी राम सखे मज पहावा वाटे ॥ धृ० ॥ नेत्रीं वाहे प्रेमांबुधारा । सद्गदित कंठ दाटे ॥ १ ॥ लागोनी ध्यास पडली मज ॥ भ्रांति रात्रंदिन वाटे ॥ २ ॥ माणिक म्हणे रघुवीर दर्शनाविण ॥ कैसी भ्रांती तुटे ॥ ३ ॥

### पद ८७
(राग–देस. ताल–त्रिताल.)

मग भवभय त्यासी बाधी कैसें ॥ धृं० ॥ अंतरीं राम बाहेरी राम । हेंचि प्रतीति जयासी असे ॥ १ ॥ दृश्य पदार्थ अशाश्वत मानुनी । आत्मारामीं डोलतसे ॥ २ ॥ माणिक म्हणे या रीतीचा योगी । संसारी परि लिप्त नसे ॥ ३ ॥

### पद ८८
(राग–यमन जिल्हा. ताल–त्रिताल.)

तुझिया नामीं बहु तरले ॥ धृ० ॥ वाल्मिक जपे उफराटें नाम ॥ त्याचें अघ हरिलें ॥ १ ॥ घेतां नाम त्यासमयीं शिवाचें गरल ताप सरले माणिक म्हणे किति भक्त अभक्त । स्मरतां उद्धारिलें ॥ २ ॥

### पद ८९
( राग–झिंजूटी ताल–दादरा )

दशरथसुत राम त्यजुनि शरण कुणा जाऊं ॥ धृ ॥ एकवचन एकबाण एकपत्नि ज्याची । ऐसा दीनदयाळ सांडुनि इतर कुणा पाहूं ॥ १ ॥ ज्या चरणरजें उद्धरली गौतमाची भार्या । इच्छितात‍ि सकल देव चरण आम्ही ध्याऊं ॥ २ ॥ नामप्रतापें पाषाण तारुनि बांधियला सेतु । माणिक म्हणे तेंचि नाम निशिदिनीं आम्ही गाऊं ॥३॥

## पद ९०

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

धाकटा राम माझा असे । तया मी वनाप्रति धाडूं कसे ॥ धृ ॥ मुखाची पाहुनी शोभा । लोपते कोटि शशिची प्रभा । कुंडलाची फांकली प्रभा । तया उपमा द्यावया नसे ॥ १ ॥ खडे रुततिल कीं पाया । कैसें चालवेल रघुराया । करील निद्रा कवणे ठायां । कशी भोगवेल अशी दुर्दशा ॥२॥ कधीं हा राम दृष्टि पडे । म्हणूनी माता स्फुंदस्फुंदोनी रडे । माणिक म्हणे दुःखसिंधूंत बुडे । वदावया शोकातें अंत नसे ॥ ३ ॥

## पद ९१

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

राघव माझा रविकुलभूषण । त्यासी वनाप्रति धाडूं नको गे ॥धृ०॥ मागसी काय तें देइन कांते । घालूं नको दुर्घट दुःखातें ॥ १ ॥ कोमल चरण असे राघवाचे । कोटी मदन ओंवाळूं नखातें ॥ २ ॥ लावण्यरूप असें बालकाचें । पाहुनी लज्जित शशी या मुखा गे ॥ ३ ॥ माणिक म्हणतसे दुष्टचि कैकया । धाडी वनाप्रति भक्तसखा गे ॥ ४ ॥

## पद ९२

( राग–मुलतानी. ताल–त्रिताल. )

मी नेणें मला कैसा तारील राम ॥ धृ० ॥ कपटी पापी अन्यायी कुटिल बहु । वसत सदा मम हृदयीं काम ॥ १ ॥ भजन पूजन भक्ति स्वप्नींहि नेणें । प्रेम कैचें वाचेसी नाम ॥२॥ माणिक म्हणे मी अधमाहुनि अधम । पावन करील तरी पावेन विश्राम ॥ ३ ॥

## पद ९३

(राग–झिंझूटी. ताल–दीपचंदी.)

मूर्ति पाहा कुणी या राघवाची । स्थीरचि तो परि थै थै नाचे ॥ धृ० ॥ संपूर्ण सर्व स्थलांमाजीं भरला । त्याविण स्थल किंचित नाहीं

उरला ॥ १ ॥ लहान म्हणों तरी थोरचि होतो । थोर धरूं जातां हातां न येतो ॥ २ ॥ घडि घडि पल क्षण पालटे रंग । माणिक पाहुनी होतसे दंग ॥ ३ ॥

पद ९४

( राग—यमन जिल्हा. ताल—दीपचंदी. )

ऋषींच्या सभे मूर्ति शोभे वरी । तया मी सखे शोभतें नवरी ॥धृ०॥ मुनिवामभागीं असे लहानसा । सखे मी वरीन सव्यचा थोरसा ॥ १ ॥ कधीं घडविशी योग पुरुषोत्तमा । म्हणोनी सखे पूजित्यें मी उमा ॥ २ ॥ म्हणे माणिक पाहुनी विधिपिता । तया लुब्धली आदिमाया सीता ॥ ३ ॥

पद ९५

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

राम धनुष्य तोडिल ऐसें काय करूं । जनकें घातलें सखये पण दुर्धरू ॥ धृ० ॥ पाहुनि रूपातें मन माझें मोहिलें । मज वाटत सखये केव्हांशीं वरूं ॥ १ ॥ धनुष्य कठोर राम अति कोमल । कैसें उचलेल दुखतील कीं द्वय करू ॥२ ॥ माणिक याचा प्रभु धनुष्य तोडिला तेव्हां । झाला सीतेसी हर्ष अति अंतरूं ॥ ३ ॥

पद ९६

( राग—झिंझूटी. ताल—त्रिताल. )

बाई माझ्या मनीं वसे श्रीराम । विसरुनि गेल्यें सर्व घर काम ॥ धृ० ॥ अंतर बाहेर व्यापक तोचि । योगीमन विश्राम ॥ १ ॥ माणिक म्हणे मज प्राप्तचि झालें । माझें जें निजधाम ॥ २ ॥

# हिंदी पदें

## पद ९७

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

या जगनों रघुनाथ तोरे बिन मोरा नहि कोई रे ॥ धृ० ॥ संपत माता पिता कबीला । कुंवर वहेन और भाई रे । अंत समय कोई साथ नहि आवे । जावे अकेला वोही रे ॥ १ ॥ झूटी काया झूटी माया झूटा जगत पसारा रे । मानिकके मन यहि समझकर । स्मरत रहो रघुबीरा रे॥२॥

## पद ९८

( राग—झिंझूटी. ताल—दादरा. )

कौन नाम सुमरूं राम छांडके तुम्हारे ॥ धृ० ॥ सीतल भयो नाहीं दीख चंद्र माथे धारे । होय गयो सीतल गरल नामके पुकारे ॥ १ ॥ सेतु बांध बांध कपी व्याकुल भये सारे । पत्थर पर नाम लिखके सागरपर तारे ॥ २ ॥ नामका प्रताप सबहि पापताप हारे । मानिक प्रभुजीको छांड जाऊं कौन द्वारें ॥ ३ ॥

## पद ९९

( राग—सोहनी. ताल—ख्याल. )

माई मोरे नयन बसे रघुवीर ॥ धृ० ॥ शंख चक्र गदा पद्म बिराजे कोमलगात्र शरीर ॥ १ ॥ उमडत बादल चमकत बिजली । अखंड बरसत नीर ॥ २ ॥ मानिकके प्रभु गिरिधर नागर । चरन कमल मन धीर ॥३॥

## पद १००

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

आज बडो ये कठिन भयो । नीर ढरकत नयन सियां रघुबीरको ॥धृ०॥ लगने बान जद परे लछमन । व्याकुल प्रान भयो धरा धरको ॥ १ ॥

क्या कहूं मै भरत भैयाको। कैसे मै जाऊं अजोध्या नगरको ॥ २ ॥ जावेगे कहां कपि गिरिकंदर। जावे बिभीखन अब कौन घरको ॥ ३ ॥ मानिकके प्रभु धनुख हात धरे। बतावो निशाचर कहां किधरको ॥ ४ ॥

पद १०१

( राग–पिलु जिल्हा. ताल–दादरा. )

उठ मिल भारत प्रभु घर आये। अठरा पद्म वान्नर बडे सिरस कपी। मारुतसुत संग लाये ॥ १ ॥ रावन मारे बिभीखन तारे। तापर छत्र धराये ॥२॥ अजोध्या नगरके नारी नर सब। घर घर आनंद बधाये ॥३॥ मानिकके प्रभु सिया संग लाये। लछमन चौर डुलाये ॥ ४ ॥

पद १०२

( राग–काफी. ताल–त्रिताल. )

करो कोई जप तप साधन। और कछु रामनाम सम नहीं ॥ धृ०॥ पूरब पश्चिम उत्तर दछन। कोटि तीरथ फिर आई ॥ १ ॥ 'रा' कहतें रघुबीरा पांहोचे। 'म' मुक्ति भर पाई ॥ २ ॥ मानिक कहे तुमारे नाम प्रतापसे। फत्तर सागरमांहि ॥ ३ ॥

पद १०३

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

जबहि धनुख तोरे रघुराई। देखत जनक आनंद भयो है ॥ धृ० ॥ कोमल शरीर राम अति छोटा। कैसे ये धनुख बिदारे है ॥ १ ॥ मुनिने सुनाये जनकको। ये भगवान अवतार लियो है॥२॥ मानिकके प्रभु धनुख तोरे तब। भूपन मुख मुकराय गयो है ॥ ३ ॥

पद १०४

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

जग रूठा तो रूठनदे। एक तुम मत रूठो मेरे रामजी ॥ धृ० ॥ एक चंद्रका प्रकाश भये तब। उडुगणसे मोहे क्या कामजी ॥ १ ॥

कल्पवृक्षने छत्र धरे तब । और वृक्षकी क्या छांवजी ॥ २ ॥ कामधेनुने दुग्ध पिलाई । और बसत धेनु धामजी ॥ ३ ॥ मानिक कहे सागरमो न्हाये । तब तीरथका क्या कामजी ॥ ४ ॥

## पद् १०५

( राग—भैरवी. ताल—त्रिताल. )

जनकराज पूछे दो बालकको ॥धृ०॥ कवन नगर इनका कहां ठिकाना । कहां के कुंवर थे जो धनभाग जीको ॥१॥ मानिक कहे प्रभु तुमरे स्वरूप को ॥ देखत जनकका मोहे मन जीको ॥२॥

## पद् १०६

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

धनुख बान लीनो सियारघुबीर ॥धृ०॥ रूप सुंदर माथे मुगुट विराजे । खैंचे कमान कोमल शरीर ॥ १ ॥ मानिक कहे प्रभु देख भूप । करे अपमान जो नर ॥२॥

## पद १०७

( राग—झिंझूटी. ताल—त्रिताल. )

भज मन मेरारे जानकी रघुबीर ॥ धृ० ॥ राजा दशरथ के कुंवर कहावे । राहत शरजूके तीर ॥ १ ॥ सागरपर पाषान जो तारे । उतरे सब कपिवीर ॥ २ ॥ मानिक के मन.येमत छांडिये । सुमरत रहो रणधीर ॥३॥

## पद १०८

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

मुगुटपर वारूं कोटि शशी । दशरथ राजा रामचंद्रपर वारूं ॥ धृ० ॥ राजा दशरथके चार दुलहरवा । तामे राम अति प्यारो ॥ १ ॥ कुंडलकी छब बरन न आवे । धनुख हात बीच धारो ॥२॥ सीता राम लछमन भरत शत्रुघन । सन्मुख हनूमन्त ठारो ॥ ३ ॥ मानिक के प्रभु अजोध्यावासी । ताकेचरन बलहारी ॥ ४ ॥

### पद १०९

(राग—पिलु. ताल—त्रिवट)

यहि दो बालक वनको सिधारे है ॥ धृ० ॥ कैसे वाके माता कैसे वाके पिता। कैसे नगरीके लोक कठिन हिय्या रहे ॥ १ ॥ मानिकके प्रभू अजोध्यावासी। चरन लगत जाके सील उद्धारे है ॥ २ ॥

### पद ११०

(राग—यमन जिल्हा. ताल-त्रिवट)

कुभावकू कैसा मिलेगा राम। योगी मनविश्राम ॥ धृ० ॥ ग्यान ध्यान लय लछ बतावे। मनमो बस रहे काम ॥ १ ॥ लोभ मोह मो भीतर भरा है। ऊपर धोवत चाम ॥ २ ॥ मानिक कहे ये लछनको नर। बांध ले जावे जम धाम ॥ ३ ॥

### पद १११

(राग—जोगिया. ताल—धुमाळी.)

क्या किसूसे काम हमारा। लय लागा साहेबसे हमारा। चैन नहीं दिन शाम हमारा ॥धृ०॥ अंदर बाहेर ओहि नजर आवे। जहां देखो तहां राम हमारा ॥१॥ मानिक कहे सद्गुरु प्रतापसे। मिल गया मंगलधाम हमारा ॥ २ ॥

### पद ११२

(राग—कानडा. ताल—त्रिवट.)

जानि घन गर्जे बिरला कोई ॥ धृ० ॥ खणण खणण घणण घणण। उबताक कणणण उडत निशान ॥ १ ॥ झनन झनन मानिकको। कहेना सननन उडे जैसे बान ॥ २ ॥

### पद ११३

(राग—मुलतानी. ताल—धुमाळी.)

रामनाम जप साधू जबलग सांसा ॥धृ०॥ गाफिलमें मत दिन गमावो। तब पछतावे जब जम डारे फांसा ॥१॥ तूं कहता मेरा माल खजाना। साथ नही आवेगा रतिमासा ॥२॥ मानिककें मन सुनरे मुसाफर। मंजल चलना नही तेरा बासा ॥३॥

## श्रीमारुतीवरील पदें

### पद ११४

(राग—देस. ताल—त्रिताल.)

जो करुणाधन राम माझा। कोठें आहे सांगा कपिराजा॥ धृ० ॥ दशरथ पिता, कौसल्या माता। अज नामक त्याचा आजा ॥१॥ मानिक म्हणे प्रभू अयोध्यावासी। धांवतसे दीनकाजा ॥ २ ॥

## पंचपदी

### पद ११५

( राग—झिंझूटी. ताल—दादरा. )

तो दयाळ भीम उभा चाळकापुरीं रे ॥धृ०॥ माता प्रसवतांचि बाळ गिळूं जाय रविफळ। उडी घाली उतावीळ गगनीं गर्जना करी रे ॥ १ ॥ शक्ती लागुनी पडला वीर रात थोडी घडी चार। साठ लक्ष योजन दूर द्रोण आणला शिरीं रे ॥ २ ॥ सजीव करूनी भूधरासी नेऊनी ठेवी गिरि स्थळासी। माणिक म्हणे या बाळासी कोण वर्णना करी रे ॥ ३ ॥

### पद ११६

(राग—यमन जिल्हा. ताल दादरा. )

सत्यवंत भीम नांदतो चाळकापुरीं रे ॥ धृ०॥ निर्बलासी देतो बळ वांझेलागिं देतो बाळ। आंधळ्यासी देऊनी डोळे डोळस करी रे ॥ १ ॥ बधिरासी देतो कर्ण निर्धनासी देतो धन। मनोरथ करी पूर्ण इच्छिल्यापरी रे ॥२॥ पांगुळ्यासी पाय देत लुल्यालागीं देतो हस्त। पित्त शीत संनिपात दूर होय नवज्वरहि रे ॥ ३ ॥ रक्तपित्ति कुष्ठरोग जाउनि होय दिव्य अंग। गंडमाळ होय भंग उदरव्यथा दूर करी रे ॥ ४ ॥ भक्तकामकल्पद्रुम तो हा उभा असे भीम। माणिकदास घेउनि नाम गर्जना करी रे ॥ ५ ॥

## पद ११७

( राग—झिंझूटी. ताल—दादरा. )

वाचे भीम भीम भीम बलभीम वदा रे ॥ धृ० ॥ बलभीम करतां ध्यास होतो पातकांचा नाश । कांपतसे काळ त्यास छेडिना कदा रे ॥१॥ भीमठायीं मन धरुनी बैसे कोणी ध्यान धरुनीं । येऊनि वारी त्याजवरुनि हातिंची गदा रे ॥ २ ॥ माणिक म्हणे बलभीम चार अक्षरांचें नाम । जपतां पूर्ण करी काम नेतो ब्रह्मपदा रे ॥ ३ ॥

## पद ११८

( राग–यमन जिल्हा. ताल––धुमाळी. )

अरे मनमोहन बलभीमराया ॥ धृ० ॥ सीताराम आज्ञा दिधले चाळकेच्या वचनीं गोंविलें । म्हणुनी उभे राहिले चाळकापुरीं ह्या ॥ १ ॥ चाळकेची पूजा घेसी भक्तांलागीं दर्शन देसी । आत्मारामा साह्य होसी तारिसी जगा या ॥ २ ॥ भक्तसखा महाराजा धांवत दीनाच्या काजा । माणिक हा शरण तुज लागत पाया ॥ ३ ॥

## पद ११९

(राग–झिंझूटी. ताल–धुमाळी.)

चला जाऊं पाहूं भीम चाळकापुरीचा ॥धृ०॥ सव्य कर उभा केला । पुच्छ वरुनि मुरडिला । डावा कर कटीं ठेविला । मुख उत्तरेचा ॥ १ ॥ पदकमळ शोभे गळा । भालीं कस्तुरीचा टिळा । नेसे पितांबर पिंवळा । कांठ जरीचा ॥२॥ अनाथाचें विघ्न वारी । आत्माराम साह्य कारी । माणिकाचा पूर्ण करी । हेतु अंतरींचा ॥ ३ ॥

# हिंदी

## पद १२०

(राग—यमन कल्याण. ताल–एक्का)

अंजनीको पूत गाइये मनाइये ॥ धृ०॥ रामदूत महाबली नाम लेत बला टली । माणिक कहे रोट लंगोट धूप दे सम झाइये ॥ १ ॥

## पद १२१

( राग–भूप. ताल–त्रिताल. )

भज राधेकृष्ण जगदंब सांब ॥ धृ० ॥ माणिकदास करी हें काम । राम राम राम । सीताराम सीताराम । श्रीराम जय राम जय जय राम॥१॥

# श्रीकृष्णपर पदें

## पद १२२

( राग–देस. ताल–धुमाळी. )

सगुण रूप नयनीं नयनीं आधीं दावा । मग तुम्ही वेदांत गावा ॥धृ०॥ तुम्ही तरी म्हणतां हरी हा हृदयस्थ । हें तंव जाणती समस्त । नव्हे आम्हीं योगी राहूं ध्यानस्थ । रिकामा मांडुनिया प्रस्थ । भक्तीविण ज्ञान निर्फळ मानावा ॥ मग० ॥ १ ॥ दही दुधाची दुधाची करीत चोरी । ठकविल्या गवळ्याच्या पोरी । चटक लाविल्या लहान थोरी । यशोदा बांधिली ज्या दोरी । दामोदर तो आणावा ॥ मग० ॥२॥ यमुना तीरीं हरी वाजवी वेणू । सवें गोपाळ चारी धेनू । ब्रह्मादिक जे वंदिती पदरेणू । दर्शना सुकृत फल नेणूं । साकाराचा आनंद मानावा ॥ मग०॥ ३ ॥ रासक्रीडेचें क्रीडेचें सुख फार । हृदीं आठवे वारंवार । सुंदर रूपडें सुकुमार । मूर्ति लावण्य रतिसार । माणिक प्रभु तो नेत्रीं वसवावा । मग० ॥ ४ ॥

## पद १२३

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

नंद मुकुंद मुरारि सांवळा गोकुळांत हरी आला हो ॥धृ० ॥ काराग्रहीं अवतार घेतला । देवकिच्या उदरा आला हो । कंस दुष्ट पापिष्ट जिवाला । कष्टी मनामध्यें झाला हो ॥१॥ घेउनि कडे वसुदेव निघाला । मध्यरात्रीं समयाला हो । यमुना जल कल्लोळ हरीच्या । स्पर्श करी चरणाला हो ॥ २ ॥ घनःशाम श्रीकृष्ण छबेला । रंगेला अलबेला हो ।

अलाबला किती घेती नाचती। करती घरोघरीं काला हो ॥ ३ ॥ वासुदेव गिरिधारी कन्हय्या मोहन मुरलीवाला हो। माणिक म्हणे प्रभू शरण तया जा। ध्याती मुनिजन ज्याला हो ॥ ४ ॥

पद १२४

( राग—यमन जिल्हा. ताल–त्रिताल. )

कारे मना हरिनाम न स्मरसी। लोभ लालूच ममतेमध्यें मरसी ॥धृ०॥ करिसील वाचे कोणाची निंदा। हरिभजना मागें कां सरसी ॥१॥ रक्षिलें कोणीं गर्भवासीं तुज। अरे मना मूढा तया विसरसी ॥ २ ॥ माणिक म्हणें मना सावध होउनि। जाय गुरूली शरण त्वरेंसी ॥ ३ ॥

पद १२५

( राग--पिलु. ताल–दादरा. )

हरीभजनीं मन धर कीं प्राण्या। पडशिल नरकीं ॥धृ०॥ प्रीति जडो हरिचे भजनासीं। विषया पाहुनी मागें सर कीं ॥१॥ टाकुनि देह भवाब्धि पसारा। संत दर्शनासी मर कीं ॥ २ ॥ माणिक म्हणे नरजन्मा येउनी। सुफल कांहीं तरी कर कीं ॥ ३ ॥

पद १२६

(राग—यमन. ताल—धुमाळी, अभंग. )

आणीक कांहीं नलगे तुला। एक प्रेमाचा भूकेला ॥धृ०॥ गवळ्याचें उच्छिष्ट ताका। तूं पसरिसी मुखा ॥ १ ॥ मुष्टीभर पोह्यासाठीं। तूं पसरिसी ओटी ॥ २ ॥ सुयोधना रागें येसी। विदुराच्या कण्या खासी ॥ ३ ॥ लाज ठेवी एकीकडे। धुसी अर्जुनाचे घोडे ॥ ४ ॥ भक्तसखा नारायणा। माणिक जीवींच्या जीवना ॥ ५ ॥

पद १२७

( राग—कानडा. ताल–त्रिताल. )

अगणित गुणगणना तुझी। यादवा माधवा रे ॥ धृ० ॥ धवाधवा जपत उमाधवा न कळे अंत। माणिक प्रभू सर्वांतर्यामी। जाणे साधु संत ॥ १ ॥

## पद १२८

(राग—पिलु. ताल—ख्याल.)

कां रे न ये तुझ्या मना । दयावंता नारायणा ॥ धृ० ॥ माधवा रे पुरुषोत्तमा । सकल उत्तमोत्तमा । गुणातीत निर्गुणा ॥ १ ॥ आतां कोठें गुंतलासी । बापा माझ्या रूषीकेशी । मज मोकलुनी दीना ॥ २ ॥ नको अंत पाहूं हरी । धांव आतां लवकरी । माणीक जीवींच्या जीवना ॥ ३ ॥

## पद १२९

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

कशी ही मुरली काय वद गे । स्वजनीं विजनीं धननीं मुरली गे ॥ धृ० ॥ बोधक वचनें अमृतरूपिया । निजश्रवणीं सरली गे ॥ १ ॥ विसरुनि गेल्यें गृह सुत धंदा । देहस्फूर्ति विरली गे ॥ २ ॥ माणिक म्हणे प्रभु पाहूनि नयनीं । सर्व आशा पुरली गे ॥ ३ ॥

## पद १३०

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

गायीं गायीं हरीचे गुण गायी ॥ धृ० ॥ ताळ मृदंग वीणा करीं घेउनी । कीर्तनासी उभे राही ॥ १ ॥ एक्या ठायीं स्थिर करूनी मन । प्रेमें करुन हरी वाही ॥ २ ॥ माणिक म्हणे शामसुंदर रूपडें । डोळा भरुनी आतां पाही ॥ ३ ॥

## पद १३१

( राग—यमन जिल्हा. ताल-धुमाळी. )

गायी गायी मना रे हरीचे गुण गायी ॥ धृ० ॥ एक्या भावे तत्पर होउनी । त्यजुनी सकल कल्पना रे ॥ १ ॥ जातसे दिन दिन व्यर्थचि वायां । नये नरदेह पुन्हा रे ॥ २ ॥ माणिक म्हणे मना नामप्रतापें । चुकती यमयातना रे ॥ ३ ॥

## पद १४८

(राग—झिंझूटी. ताल—दादरा)

आतां मी हो करूं काई । कृष्णें मन वेधीलें बाई ॥ कृष्ण कृष्ण स्मरतां कृष्णचि मी झाल्यें ॥धृ०॥ आसनीं शयनीं गमनीं । भोजनीं दिवा वा रजनीं । जागृति स्वप्न सुपुप्ती तुर्या ॥ उन्मनीं श्रीकृष्ण ॥१॥ मागें पुढें कृष्णचि आहे । सव्य डावे उभा राहे । पाहतां पाहणें पाहे ॥ अवघाचि हा श्रीकृष्ण ॥२॥आप तेज वायु । आकाशादि तत्वबहु । माणिक हा शिव-जीवु । झाला स्वयें हो श्रीकृष्ण ॥३॥

## पद १४९

(राग—पीलु जिल्हा. ताल—दीपचंदी.)

अग सखये जाऊनी सांग हरीला । विरहानळें मी तळमळतें ॥धृ०॥ शेज करूनि मी सिद्धचि बसल्यें । न ये निद्रा मंचकावरतें ॥ १ ॥ काय करूं मज कांहीं सुचेना । चैन नसे क्षणभरीं ते ॥ २ ॥ माणीक म्हणे हरी येई तूं लवकरी । देई आलिंगन राधेवरते ॥३॥

## पद १५०

(राग—वसंत. ताल—त्रिवट.)

अशी कशी मुरली तुझी असे मनमोहना रे ॥ धृ०॥ नहात होत्यें नग्न नहाणीं । लावुनी केसासी फणी । मुरली ऐकुनी ध्वनी । तशीच नग्न धांवल्यें । त्या वृंदावना रे ॥ १ ॥ भरुनि ठेविलें शिरीं कुंभ पाणी । जाल्यें गृहा चक्रपाणी । कुंभ विसरला म्हणूनी । पुन्हां फिरुनी आल्यें । यमुना जीवना रे ॥ २ ॥ म्हणतसे माणिकदास । लावुनी चरणाचा ध्यास । गोपी भुलल्या मुरलीस ॥ नसे देहभावना रे ॥ ३ ॥

## पद १५१

(राग—झिंझुटी. ताल—धुमाळी.)

आण त्या हरिला । सखे गडे ॥ धृ० ॥ माणिकप्रभु तो गोकुळवासी । मोहुनी मन हरिला ॥ १ ॥

## पद १३२

( राग—भूप. ताल—धुमाळी. )

गोपाळा धांवुनि येई रे। मज दीनाली भेट देई रे ॥ धृ० ॥ मी अनबळीं वाळक तुझा। उचलुनी मज कडे घेई रे ॥ १ ॥ षड्वैरी वुडवूं पाहती। येउनी साह्य होई रे ॥ २ ॥ माणिक म्हणे तुझिया वांचूनी। कोणी नसे मज बा रे ॥ ३ ॥

## पद १३३

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

झडकरि धांव सख्या यदुराया। कोणी नसे मज हृदयीं धराया ॥ धृ० ॥ माया महापूर नदीमधें वाहलों। स्वाधीन मनिचें मी जल वहु प्यालों। कल्पनेच्या लाटा पाहुनि भ्यालों। संसार डोहामध्यें मी बुडालों ॥ १ ॥ मत्स्य काम क्रोध जलचर मगरी। खेंकडा मद मत्सर वायुआहारी। वृश्चिक दंभ संडुक अहंकारी। साही मिळुनि मज जाचिति भारी ॥ २ ॥ चहूंकडे पाहतां कोणीच नाहीं। जीव माझा व्याकुळ झालासे पाहीं। सोडविना कोणी करूं तरी कायी। माणिक म्हणे प्रभू धांवुनी येई ॥ ३ ॥

## पद १३४

( राग—काफी. ताल—त्रिवट. )

प्रेमे हरिसी वदा वदा रे ॥ धृ० ॥ एक्या भावें शरण आलीया। दोष न जाणे कदा कदा रे ॥ १ ॥ पापी अजामिळ स्मरतां उद्धरिला। गेला तो ब्रह्मपदा पदा रे ॥ २ ॥ माणिक म्हणे मना सावध होउनि भज कीं हरिसी सदा सदा रे ॥ ३ ॥

## पद १३५

(राग—भैरवी. ताल—त्रिताल.)

प्रभु मजलागीं एवढा कठोर तूं काय रे॥धृ०॥ नक्रें गजा गांजियलें। म्हणुनी तुज बाहिलें। तुवां सोडविलें. होउनी सहाय्य रे ॥ १ ॥

## पद १४०

(राग—देस. ताल—त्रिताल.)

मना गोविंद गोविंद वद हे वाचे । कांहीं साधन कर सागर पार व्हायाचें ॥ धृ० ॥ मना बोली कैसी झाली ब्रह्मा सदरीं । राहिला कैसा नवमास माते उदरीं । रक्षण तेव्हां तुज कोण करी । करिसी विसर स्मरण कां नये याचें ॥ १ ॥ किती श्रम तुज बाहेर निघतां घडे । बहु श्रमुनी दमुनी पडे द्वारापुढें । रक्त मांस जडोनी अट्टहास रडे । मग पडली सांवली नारी नर याची ॥ २ ॥ बहु फिरूनि आलासी योनी नरदेहीं । आतां भजन साधन करी तरि कांहीं । माणिक म्हणे लाग गुरुपायीं । चुकवी भय यमयाचें ॥ ३ ॥

## पद १४१

(राग—काफी. ताल—दीपचंदी.)

यादव माधव स्मरण करा रे ॥ धृ० ॥ दृश्य पदार्थ अशाश्वत मानुनि । चिद्रूप नेत्रीं भरा रे ॥ १ ॥ सर्वांघटीं हरी व्यापक जाणूनी । निश्चय ठेवी वरा रे ॥ २ ॥ माणिक म्हणे हें गुज कळण्यास्तव । सद्गुरु चरण धरा रे ॥३॥

## पद १४२

(राग—देस. ताल—त्रिताल.)

लागलासे चुटका गे, करूं कैसें । क्षण एक न गमे या हरीविण ॥धृ०॥ मंजुळ भाषणें मोहुनियां मज । निघूनि गेले तेणें वसे मनिं खटका गे ॥१॥ विरहानळें जीव व्याकुळ होउनि । उठवेना देह झालासे मुटका गे ॥ २ ॥ माणिकप्रभुलागीं त्यजिन मी प्राणा । आणि सखे वाटुनि विष घुटका गे ॥३॥

## पद १४३

( राग—भैरवी. ताल—दीपचंदी. )

वेडें पिसें झालें माझें मन हें । कोणीं कांहीं बोलो मज जन हे ॥धृ०॥ शामसुंदर रूप नयनीं जडे । वेणू मंजुळ ध्वनी श्रवणीं पडे ॥ १ ॥ माया-

निर्मित प्रपंच भासेना । मजमाजीं देहभान असेना ॥ २ ॥ म्हणे माणिक मज लागलें पिसें । जेथें पहावें तेथें कृष्णमय दिसे ॥३॥

पद १४४

(राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल.)

हरी तुझें नामामृत गोड ॥ धृ० ॥ नामी गज गणिका तरले । असे तरले कितीएक अगणित क्रोड ॥ १ ॥ कंठ ज्याचा नीलकंठचि झाला । स्मरतां शीतल ध्येय अक्षर ॥ २ ॥ माणिक म्हणे जो नामामृत सेवी । तुटे येरझारा तया नसे घडमोड ॥ ३ ॥

पद १४५

(राग—झिंझूटी. ताल—त्रिवट.)

आतां गडे जाउनी हरी आण जाने सखे तूं जाय ॥ धृ० ॥ वैरी काम आवरितां नाटोपे । करित्यें मी नाना उपाय ॥ १ ॥ रुसले हरी जरी समजावी सखये । दृढ धरूनियां पाय ॥ २ ॥ दूती म्हणे राधे माणिक प्रभुजी । आणित्यें मी तूं उगी राहे ॥ ३ ॥

पद १४६

( राग—झिंझूटी. ताल—त्रिवट. )

आणा गे सयी हरी आणा ॥धृ०॥ शरदृतु चांदणी पलंगीं मी अंगणीं । समीप नसे यदुराणा गे ॥१॥ कुच तटतटले कंचुकी फिटली । मदन घेऊं पाहे प्राणा गे ॥२॥ माणिकप्रभु हरी आणा तया लवकरीं । मदनमर्दिता शहाणा गे ॥ ३ ॥

पद १४७

(राग–यमन जिल्हा. ताल–त्रिवट.)

आतां हरी सोडी माझ्या पदराला॥धृ०॥ सोडूं नको माझी कंचुकी ग्रंथी । सासू उभी सदराला ॥ १ ॥ मागसी तें मी देईन तूतें । चंबुं नको अधराला॥२॥माणिक म्हणे प्रभू सोडती गवळण । येतसे पाय धरायाला॥३॥

## पद १४८

( राग–झिंझ्टी. ताल–दादरा )

आतां मी हो करूं काई । कृष्णें मन वेधीलें बाई ॥ कृष्ण कृष्ण स्मरतां कृष्णचि मी झाल्यें ॥धृ०॥ आसनीं शयनीं गमनीं । भोजनीं दिवा वा रजनीं । जागृति स्वप्न सुषुप्ती तुर्या ॥ उन्मनीं श्रीकृष्ण ॥१॥ मागें पुढें कृष्णचि आहे । सव्य डावे उभा राहे । पाहतां पाहणें पाहे ॥ अवघाचि हा श्रीकृष्ण ॥२॥आप तेज वायु । आकाशादि तत्वबहु । माणिक हा शिव-जीवु । झाला स्वयें हो श्रीकृष्ण ॥३॥

## पद १४९

( राग—पीलु जिल्हा. ताल—दीपचंदी. )

अग सखये जाऊनी सांग हरीला । विरहानळें मी तळमळतें ॥धृ०॥ शेज करूनि मी सिद्धचि बसल्यें । न ये निद्रा मंचकावरतें ॥ १ ॥ काय करूं मज कांहीं सुचेना । चैन नसे क्षणभरीं ते ॥ २ ॥ माणीक म्हणे हरी येई तूं लवकरी । देई आलिंगन राधेवरते ॥३॥

## पद १५०

(राग–वसंत. ताल–त्रिवट.)

अशी कशी मुरली तुझी असे मनमोहना रे ॥ धृ०॥ नहात होत्यें नग्न नहाणीं । लावुनी केसासी फणी । मुरली ऐकुनी ध्वनी । तशीच नग्न धांवल्यें । त्या वृंदावना रे ॥ १ ॥ भरुनि ठेविलें शिरीं कुंभ पाणी । जात्यें गृहा चक्रपाणी । कुंभ विसरला म्हणूनी । पुन्हां फिरुनी आल्यें । यमुना जीवना रे ॥ २ ॥ म्हणतसे माणिकदास । लावुनी चरणाचा ध्यास । गोपी भुलल्या मुरलीस ॥ नसे देहभावना रे ॥ ३ ॥

## पद १५१

(राग–झिंझुटी. ताल–धुमाळी.)

आण त्या हरिला । सखे गडे ॥ धृ० ॥ माणिकप्रभु तो गोकुळवासी । मोहुनी मन हरिला ॥ १ ॥

## पद १५२

( राग–काफी. ताल–दीपचंदी. )

अर्जुनि कां नये रे यादवराया ॥ धृ० ॥ दुःशासन करीं केंस धरुनिया। ओढीतसे लवलाह्या ॥ १ ॥ दुर्योधन नग्न करूं इच्छितो । दिसे पांच निर्बळी काया रे ॥ २ ॥ भीष्मादिक गुरु द्रोण बैसले । त्यांसी नयेचि दया रे ॥ ३ ॥ धांव धांव माझे सांवळे कन्हाई । दास माणिक लागत पाया रे ॥ ४ ॥

## पद १५३

( राग–झिंझूटी. ताल–दादरा. )

धांव तूं कृष्णाबाई गे माझे आई ॥ धृ० ॥ कौरव पंक्तींत चालल्यें मी वाढीत । कंचुकी फिटली करूं काय गे ॥ १ ॥ एक म्हणे वाढी भात। दूजा मागे पयघृत। कित्येक म्हणती पात्रीं पोळी नाहीं गे ॥ २ ॥ स्मरतां मनीं गरुडध्वज द्रौपदी भासे चतुर्भुज। माणिकप्रभुनें विरडें बांधिलें पाही गे ॥ ३ ॥

## पद १५४

(राग—सोरट. ताल—एक्का.)

धांव जगत्पालना रे। मुनिजनमन हरण शरण दाखवी मज तुझे चरण। विनवितसे रमारमण। दिन पालना रे ॥ धृ० ॥ गोपीरमण गोविंद । गोपवेष बालमुकुंद। कंसांतक नंदकंद। वरद पालना रे ॥ १ ॥ कृष्ण विष्णु वासुदेव । मुरमर्दन माधव सनकादिक वामदेव । नमिति तुझ्या चरणा रे ॥ २ ॥ प्रल्हादाच्या आक्रांतासी । उडी घाली हांकेसरसी ॥ उद्धरिले महादोषी। गणिका पूतना रे ॥ ३ ॥ पांडव प्रतिपालक। भक्तवत्सल भयहारक। सुरवर जन सुखदायक॥ वर्णिती गुणा रे ॥ ४ ॥ शेषशयन श्रीनिवास। जगतारक जगन्निवास । विनवितसे माणिकदास ॥ भक्तपालना रे ॥ ५ ॥

## पद १५५

(राग—झिंझूटी. ताल—त्रिताल.)

करुणाकर यादवराया ये । ये धांवुनि या समया । नको करूं विलंब क्षण एक कांहीं । ही घडी जातसे वाया ॥धृ०॥ रुक्मी दादा हुडकितसे वर खासा मज जोगा । छपन्न देशींचे राजे आले कौंडण्यपुरालागीं । त्यांतुनि एक निवडिला निश्चय शिशुपाला द्याया ॥१॥ माधवा मधुसूदना रे मुरलीधर गोपाळा । गोवर्धनधारी येई रे निज भक्त प्रतिपाळा । मी दासी तुझी दयाळा । करीं कृपेची छाया ॥ २ ॥ वाचुनि पाहतां पत्र हरी तांतडीनें निघाले । संगें घेउनि यदुकुल सकल कौंडण्यपुरा आले ॥ माणिक प्रभुजीनें वरिली रुक्मिणी आदिमाया ॥ ३ ॥

## पद १५६

( राग—मुलतानी जिल्हा. ताल—दीपचंदी. )

आणा आणा गे त्या मधुसूदना । मनमोहन गोपींचा राणा ॥ धृ ० ॥ नेणों गुंतला कवणाचे सदनीं । पहा गे क्रीडतो यमुनेच्या जीवनीं ॥ १ ॥ शेजीं सुमन घालुनी मी बसल्यें । कांहीं न बोलतांचि रुसले ॥ २ ॥ माणिकप्रभु गोपीनाथा । कर जोडुनी चरणीं माथा ॥ ३ ॥

## पद १५७

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

उद्धवा गांठ भली पडली रे । गांठचि पडली ॥ धृ ० ॥ कुब्जा दासी तो गुरं राखी । उभयतांची संगत घडली ॥ १ ॥ पहा पहा सुंदर दारा त्यागुनी । वक्रा तेचि आवडली ॥ २ ॥ माणिक म्हणे कुब्जेच्या भावा । प्रभुची प्रीति जडली ॥ ३ ॥

## पद १५८

(राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल.)

उध्दवा परम घातकी कान्हा ॥ धृ ० ॥ शाश्वत जाणुनी रतलों आम्ही यासीं। शेवटासी कापिल्या कीं माना ॥ १ ॥ त्यागुनि गोकुळ गोपदारांसी। कुब्जेसी रतला कीं पहाना ॥ २ ॥ माणिकप्रभुविण जळावीण जैसे मीन। तडफडोनि त्यजि प्राणा ॥ ३ ॥

## पद १५९

(राग—ललत. ताल—त्रिताल.)

ऊठ त्वरेनें मनमोहना रे। गोधन घेउनि जाई वना रे ॥ धृ ० ॥ आरत्या घेउनि उभ्या गोपी द्वारा। दर्शन इच्छिति तुझें सकुमारा ॥ १ ॥ हंबरोनि तुज बाहाती धेनु। उदया आलासे तो निजभानु ॥ २ ॥ माणिकप्रभुसी वेद जो गाय। उठवी तयाप्रति यशोदा माय ॥ ३ ॥

## पद १६०

(राग—झिंझूटी. ताल—त्रिताल.)

कमलदलनयना रे कान्हा ॥ धृ० ॥ नवल सांगूं काई। दुभती वांझ गायी। सोडुनियां पान्हा रे ॥ १ ॥ ध्यास दिवानिशीं। चित्त तुझेपाशीं। नाठवे बाळ तान्हा रे ॥ २ ॥ माणिकप्रभुजवळीं नाचे गोपबाळी। विसरुनि देह भाना रे ॥ ३ ॥

## पद १६१

(राग—झिंझूटी. ताल—त्रिताल.)

कामळिवाला न ये कां गे। कोण्या सवतीच्या घरामध्यें बसला। म्हणुनियां सखे मजवरि रुसला ॥ धृ० ॥ माणिकप्रभुलागीं वेगें। प्राण सखे तूं आण जा गे। हृदय कठोर कां केला ॥ १ ॥

## पद १६२

( राग--पीलु. ताल--दीपचंदी. )

कृष्णा कां रे न येसी घराला । काय केलें मी मजवरी कोप धराया॥धृ०॥
तूं तो परगृहीं वसतोसी कान्हा । ऐसें गुज गुज शब्द पडे माझ्या काना॥१॥
कोण्या सवतीच्या ऐकोनी बोला । कां रे धरिसी माझ्यासंगें अबोला ॥२॥
ऐसें बोलूं नको अगे राधे । कां गांजिसी मज निरपराधें ॥ ३ ॥
म्हणे माणिक हरी नेला सदना । तिची पुरवी इच्छा मर्दुनी मदना ॥४॥

## पद १६३

( राग-झिंझूटी. ताल-दीपचंदी. )

सखे ग आण त्या हरिला । न ये कां गुंतला कोठें । तयाविण जीव तळमळतो । पडेना चैन मज कोठें ॥ धृ० ॥ कोण्या सवतीच्या गृहामध्यें बसला । तिच्या मोहामध्यें फसला । न जाणों मजवरी रुसला ॥ १ ॥ पलंगीं एकटी निजल्यें । मदन दाहानें गजबजल्यें । झुरझुरोनी मनीं थिजल्यें ॥ २ ॥ कुचद्वय फार तटतटले । बंद कंचुकीचे फिटले । शरीरामाजीं द्रव सुटले ॥ ३ ॥ आतां मी काय करूं बाई । तडकती छाती आणि बाही । जाउनि श्रीहरि आणा बाई ॥ ४ ॥ सखा माणिकप्रभु दावा । मूर्ति ती हृदयीं कोंदावा । फिटेल मग विरहाचा दावा ॥ ५ ॥

## पद १६४

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

कृष्णा कां रे धरिसी तूं माझी वाट ॥ धृ० ॥ घेउनियां दूध दहीं । जातों आम्ही लवलाहीं । होईल मथुरेचा हाट ॥ १ ॥ माणिक म्हणे प्रभू सोड ती गवळण । असे कितीएक शंभर साठ ॥ २ ॥

## पद १६५

(राग—झिंझूटी. ताल—त्रिताल.)

कोणीतरी जा ना हो सये गडे । सांवळिया आणा हो गडे गडे ॥ धृ०

मोरमुगुट मकराकृति कुंडल मंजुळ वाजवी पोंवा । शंखचक्रपीतांबरधारी मजला वाटे पहावा ॥ १ ॥ गळां वैजयंती हार सांवळी तनु कस्तुरी तिलक कपाळीं। यमुना तिरीं जो वाजवी वेणु गोपाळांच्या मेळीं ॥ २ ॥ माणिकप्रभू गोपी मनमोहन गोवर्धन गिरधारी। हा अवतार भक्तजनतारक दुष्ट कंस संहारी ॥ ३ ॥

## पद १६६

(राग–काफी. ताल–दीपचंदी)

कां गे हरी कोठें गुंतला । सखे कां नये घरा ॥ धृ०॥ कोठें गुंतलासे न कळेचि कांहीं। कोण्या सवतीनें मोहिलें मुरलीधरा ॥ १ ॥ जाय सखे तूं बाही हरीला । करूं नको विलंब । जा कीं गे त्वरा ॥ २ ॥ माणिक म्हणतसे धन्य ती राधिका । क्षणभरी नच विसरे इंदिरावरा ॥ ३ ॥

## पद १६७

(राग—यमन जिल्हा. ताल–त्रिताल.)

कवणे रीतीं हरी घरा न ये ॥ धृ० ॥ आज कामानलें तप्त मी गे। साजणी न सुचे मला गृहकाम ॥ १ ॥ माणिक म्हणतसे धन्य ती राधिका। क्षण न विसंबे यदुराजा ॥ २ ॥

## पद १६८

(राग–खमाज. ताल–त्रिताल.)

कृष्ण हरी मधुसूदन माधव। गोवर्धन गिरिधारी रे ॥ धृ० ॥ नारायण श्रीअनंत अच्युत केशव कुंजविहारी रे। श्रीधर वामन मुकुंद गोविंद मुरलीधर मुरारी रे ॥ १ ॥ ध्रुव प्रल्हाद व्यास पराशर नारद कीर्तन गायी रे । अतिपापी अजामिळ गणिका नक्र गजेंद्र अंतर्ध्यायी रे ॥ २ ॥ आपही ठाकुर आपही दास आपहि सब घटवासी रे । मानिकके प्रभु अंत न जाने अमर रूप अविनाश रे ॥ ३ ॥

## पद १६९

( राग--झिंझूटी. ताल--त्रिताल. )

कृष्णा जाऊं दे मला । माझी वाट धरूं नको सोड ॥ धृ० ॥ जाउनि सांगत्यें नंद मामंजीला । मोडीन तुझी मी खोड ॥ १ ॥ तूं गुराखी मीं असे राधिका । तुझी माझी कांहीं तरी जोड ॥ २ ॥ माणिक म्हणे तुझें नामामृत हें । लागतसे बहु गोड ॥ ३ ॥

## पद १७०

( राग-झिंझूटी. ताल-धमार. )

झोंबसी कां रे काना मी व्रजललना । एकटी वना छळिसी नाना॥धृ०॥ बोलत राधा दूर हो मुकुंदा रे । उठे आग भडक चोळीता तिडक नूतन स्तना ॥ १ ॥ आवळूं नको हरी हळू मज पोटीं धरी । झाले बेहाल गाल झाले लाल पुरे चुंबना ॥ २ ॥ माणिकप्रभु अनंता सोडी जाऊं दे आतां । दीर भावे धणी पाहतिल कोणी मुकेन मी प्राणा ॥ ३ ॥

## पद १७१

( राग-झिंझूटी. ताल-त्रिताल. )

तो यदुराणा गे कोणीतरी आणा गडेनो ॥ धृ० ॥ नंदगृहीं जो क्रीडे स्वच्छंदें । म्हणवी यशोदेचा तान्हा गे ॥ १ ॥ पीतवसन माथां मुकुट विराजे । कुंडल झळकत काना गे ॥ २ ॥ वेणूनादें जो व्रजदारांचें हिरोनि घेत देहभाना गे ॥ ३ ॥ माणिक्याचा प्रभू गोकुळवासी । घेत कंसाच्या प्राणा गे ॥ ४ ॥

## पद १७२

(राग-झिंझूटी. ताल-धुमाळी.)

तुझ्या वेणुनादें मी वेडीपिसीं झाल्यें ॥ धृ० ॥ न्हात मी होत्यें बसुनी नग्न न्हाणीं । मुरलीचा शब्द पडे माझ्या कानीं । तशीच मी उठुनी आल्यें

केश अजुनी ओले ॥ १ ॥ काजळ मुखांत घाली कुंकु लावी डोळां। डोक्यास हळद घांसी दांतवण कपाळा। लुगडें फेडुनि पांघरल्यें चोळी पायीं ल्याल्यें ॥ २ ॥ यमुनेच्या तीरीं हरी वाजवी वेणू। संगें गोपाळ घेऊनि चारितो धेनू । माणिकप्रभुची लीला गावुनी अंतरींच डोले ॥ ३ ॥

## पद १७३

(राग—झिंझूटी. ताल—त्रिताल.)

दावा नयनीं यशोदेचा सुकुमार ॥ धृ० ॥ मस्तकीं मुगुट कांनीं कुंडल शोभे। गळां वैजयंती हार ॥ १ ॥ सांवळी तनु कटीं पीत वेष्टिला असे। रूप सुंदर अनिवार ॥ २ ॥ यमुने तीरीं जो वाजवि वेणू। संगें गोपाळ गोभार ३ ॥ माणिक याचा प्रभु नाटकी गिरिधारी। करी दुष्ट संहार ॥४ ॥

## पद १७४

( राग—पिलु. ताल—दीपचंदी. )

दावा दावा गे सांवळीयासी। प्राण व्याकुळ दिन रजनीसी ॥ धृ० ॥ त्वरें येतों सांगुनी मज गेला। नेणों कवणासी पाहुनि भुलला ॥ १ ॥ वेगें जाउनी समजावी सखये। कर जोडुनि धरिल्यें पाय गे ॥ २ ॥ जरी नयेचि घडीं यदुराणा। माणिकप्रभुविण त्यागिन प्राणा ॥ ३ ॥

## पद १७५

( राग–भूप जिल्हा. ताल–त्रिताल. )

धरिसी कां रे हरी पदरा या। अशी रीत तुझी हे कशी परक्या स्त्रियेसी धराया ॥ धृ० ॥ मी व्रजललना तशी नोहे रे। मज संगें तूं अशी झोंबाझोंबी कराया ॥ १ ॥ नेईन तुजला धरुनियां कृष्णा। लावीन शिक्षा सांगुनी नंदराया ॥ २ ॥ माणिक म्हणे सोड ती गवळण। काकुळतीस्तव येतसे चरण धराया ॥ ३ ॥

## पद १७६

( राग–यमन जिल्हा. ताल–दीपचंदी. )

धांवा गे बाई धरिला कान्हा चोर ॥धृ०॥ मारावें तरी खोडी सोडीना। जैसा वराडी भोर ॥१॥ किति सांगावें कांहीं ऐकेना । निशिदिनीं याचा घोर ॥२॥ माणिक म्हणे प्रभू दीन दिसे परी । जो सर्वांहुनी थोर ॥३॥

## पद १७७

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

पहा यशोदे तुझा लेक खोडी । जाउनी दहींदूध मडकी फोडी ॥धृ०॥ येतसे नित्य गृहाप्रति माझ्या । लहानसें वासरूं वनाप्रति सोडी ॥१॥ जात असतां यमुनेच्या पाण्या । मागुनी येउनी वस्त्रचि फेडी ॥२॥ माणिक म्हणे वर्णितां याचे गुण । शेषहि शिणला माझी मति थोडी ॥ ३ ॥

## पद १७८

(राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी.)

पाहतां पाहतां हरी कसे गुप्त झाले । म्लानवदन ऐसे राधीका बोले हो ॥धृ०॥ षण्मासाची करुनी एक रजनी । क्रीडतसे हरी वनीं उपवनीं हो । कितीएक सहस्त्र मिळाल्या कामिनी । त्यामधें राधिका प्रीतीची राणी हो । अहंभावें हरी निघोनी गेले ॥१॥ एक दिशा एक धुंडीत जाती । एक गिरिकंदरामाजीं पाहती हो । एक बसुनी ठायीं श्रीहरी बाहती । एक मूर्छागत होउनी राहती हो । एक निचेतन जातसे झोले ॥ २ ॥ गोपी अहंकृति लवलेश नाहीं । म्हणोनि श्रीपति प्रगटे त्या ठायीं हो । एक पूजी एक लागत पायीं । एक स्तवी एक सुस्वर गायी हो । माणिकप्रभु गुण गाउनि डोले ॥३॥

## पद १७९

(राग—पिलु. ताल—धुमाळी. )

बरा तुमचा भरंवसा सख्या आतां खालीं वसा ॥ धृ० ॥ येतों म्हणुनी संध्याकाळीं । हातावर दिली टाळी । ममताचि नाहीं मुळीं । मिष्ट

आपणाचा ठसा ॥ १ ॥ वाड्यावरुनी जातांयेतां । मज वैरिणीपरि पाहतां । सोडीना मी तुम्हा आतां । मजसंगें बोला हसा ॥ २ ॥ माणिकाचा प्रभू हरी । राधा धरी दोहीं करीं । इच्छा तिची पूर्ण करी । तिणें इच्छिलें जें तसा ॥ ३ ॥

## पद १८०

(राग–मुलतानी. ताल—दादरा.

वळजोरी मला कां करितां हरी ॥ धृ० ॥ जात मी होत्यें यमुनेच्या पाण्या । आवळुनि निरि कां धरितां हरी ॥ १ ॥ पाहील सासू करील मज ताडण । येथुनी मागें परता हरी ॥ २ ॥ माणिक प्रभुसी बोलत राधा । कठिण स्तन कां चुरितां हरी ॥ ३ ॥

## पद १८१

( राग—झिंझूटी. ताल—त्रिताल. )

मनमोहन न ये कां ग । रुसला का ग आणा जा ग ॥ धृ० ॥ माणिक प्रभु तो प्राणविसावा । कोण्या ठायीं वसला ग । रुसला कां ग आणा जा ग ॥ १ ॥

## पद १८२

( राग–यमन जिल्हा. ताल—त्रिताल )

मथुरेसी गेला गे यदुवीर ॥ धृ०॥ रामकृष्ण रथीं अक्रूर सारथी । वारु चाले क्षण नसे धीर ॥ १ ॥ तोडुनि माया तांतडी जाया । सुटे जैसा कमठेहुनी तीर ॥ २ ॥ माणिक प्रभुविण व्यर्थचि हें जिणें । तडफडे मीन नसे नीर ॥ ३ ॥

## पद १८३

( राग—झिंझूटी. ताल—त्रिताल )

माधव नये कां आणा जा ॥धृ०॥ घरीं पहा अथवा यमुनातरीं पाहा । भेटला नसतां वृंदावनीं जा ॥ १ ॥ न आला जरि तरी मुकेन मी प्राणा । माणिकप्रभुसी असेंच म्हणा जा ॥ २ ॥

## पद १८४

(राग—झिंझुटी. ताल—दीपचंदी.)

माधव मथुरेंत गे अगे बाई। विरहानळें जीव व्याकुल करूं काई ॥ धृ० ॥ रासक्रीडेमधें प्रथम मला ओढी। झिडकारिलें तेव्हां बदला आतां फेडी ॥ १ ॥ रुसतां मी समजावी हृदयीं धरोनी। बसवी मांडीवरी घालीत वेणी ॥ २ ॥ रतिसमयीं मज देतसे चुंबन। झांकी मुखासी अशी मी चांडाळीण ॥ ३ ॥ आण सखे वाटुनी विषप्याला। माणिकप्रभुविण जिणें कशाला ॥ ४ ॥

## पद १८५

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

माझे सावळे कानाई तूं, चोरी करूं नको। गृहीं दही दूध खायी ॥ धृ० ॥ माणिकप्रभु अनंता बाहेर जाऊं नको आतां। लोणी देत्यें मी खाउनी सुखी सदनीं राही ॥ १ ॥

## पद १८६

( राग-पिलु ताल-दीपचंदी. )

मनमोहन वाजवी वेणु कसा ॥ धृ० ॥ रतिसमयीं मी भ्रतारासी म्हणत्यें। कां मज झोंबिसी बाप असा ॥ १ ॥ वेणूनादें काम करीत असे नाना। भावासी म्हणे रति कराया बसा ॥ २ ॥ माणिक प्रभुजींनीं अनुचित केलें ॥ मुरली नादें मना लाविलें पिसा ॥ ३ ॥

## पद १८७

( राग—मुलतानी ताल—दीपचंदी. )

माझा हरी नेणें कांहीं। तुम्ही गोपी गोकुळच्या तुफान्या किती बंगाल्या बाई ॥ धृ० ॥ बाळकृष्ण बालक हा अजुनी तुम्हाप्रति जोडी नाहीं। माणिक याचा प्रभु नाटकधारी न सांपडे ब्रह्मादिकांही ॥ १ ॥

## पद १८८

( राग—कालंगडा. ताल–धुमाळी. )

मज चैन नसे रे कदा । मोहिलें मन मुरली नादा ॥ धृ० ॥ टाकुनियां गृह-पति मुलां । धुंडिल्यें कुंजवनीं मी तुला । मुरली शब्द ऐकिला । असें वाटतें कीं कृष्णा मला । तुज संगें रतावें रे सदा ॥ १ ॥ मुरलीचा शब्द पडे कानीं । होते तळमळ अतिशय मनीं । शरीरांत काम शिरोनी । तापतो बहु उग्रचि होऊनि । किती आवरूं मी या मदा ॥ २ ॥ काय वर्णूं मुरलीच्या सुखा । विसरल्यें देहतापादिक दुःखा । बहु नाटक रूप हा निका । मोहिलें मन पाहतां श्रीमुखा । तुजवरि मी झाल्यें फिदा ॥३॥ परब्रह्मीचें रूपडें । चारी धेनु संगें घेउनि सवंगडे । सुदामा पेंद्या वांकडे । असे किती भक्तजन रोकडे । माणिक वर्णी हरिपदा ॥ ४ ॥

## पद १८९

( राग—परज. ताल–त्रिताल. )

मोहिलें मन जें हरि, मुरली कशी रे ॥ धृ० ॥ गोड न वाटे अन्न हा धंदा लागलेंसें चित्त तुझेपाशीं रे ॥ १ ॥ माणिक म्हणे प्रभु मुरलीनादें । मोहिली गवळण झाली पिशी रे ॥ २ ॥

## पद १९०

( राग—पिलु. ताल—धुमाळी.)

माझ्या बन्सीवाल्या रे तुझें रूप पाहावें वाटे घडोघडीं ॥ धृ० ॥ मोर-मुगुट मकराकृति कुंडल । ओढुनि बांधिसि केंस जुडी ॥ १ ॥ वेद भुजा पीतांबर शोभे । गळां माळ मुक्ताफळ लडी ॥ २ ॥ माणिकप्रभु गोपीमन-मोहन । विहरत यमुनेच्या थडी ॥ ३ ॥

## पद १९१

( राग—पिलु–झिल्हा. ताल—त्रिताल. )

माधवासी कोणी आणा ॥ धृ० ॥ शेज सिद्ध केली मंचकी । सुखें निद्रा तेथें कैंची ॥ सुटली ग्रंथी कंचुकीची । अजुनि कां नये कृष्णा ॥ १ ॥ चैन

न पडे घडिपल कांहीं । शरीरीं शिरला मदन बाई ॥ आण कृष्णासी लवलाही । विलंब केल्या मी मुकेन प्राणा ॥ २ ॥ पाहे राधेची शुद्ध भक्ति। आले धांवत श्रीपती । रतुनि करी तिची मदनपूर्ति ॥ माणिक म्हणे राधे धन्य भावना ॥ ३ ॥

## पद १९२

( राग—कालंगडा. ताल—त्रिताल. )

मसीं दावा गे हरीतें ॥ धृ० ॥ मन्मथ जाचणी होतसे साजणी । न धरवे धीर क्षणभरी ते ॥ १ ॥ सखे जाउनि बाहे पदर तुला पसरित्यें ॥२॥ माणिक म्हणे हरी जाई तूं लवकरी । देई आलिंगन राधे त्वरितें ॥ ३ ॥

## पद १९३

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

यशोदेबाई खोडी तुझा कारटा ॥ धृ० ॥ करीना ते करीतसे नाना कर्म । दिसतो लहान पोरटा ॥ १ ॥ माणिक म्हणतसे किति सांगूं याचे गुण । जार लबाड चोरटा ॥ २ ॥

## पद १९४

( राग—यमन–जिल्हा. ताल–त्रिताल. )

यशोदे सांग आतां हरिला ॥ धृ० ॥ साडी चोळी घेउनि माझी। कदंबावरि चढला ॥ १ ॥ आम्ही परनारी येउनि रात्रीं शेजारीं निजला ॥ २ ॥ माणिक म्हणे प्रभु जोडुनि पाणी । चरणीं लीन झाला ॥ ३ ॥

## पद १९५

( राग—यमन–जिल्हा. ताल–त्रिताल. )

रडे हा गोविंद राधे तुझ्या गृहा नेई गे ॥ धृ० ॥ करितसे गवळ्या घरीं । दहीदुधाची चोरी । खोड्या करी नानापरी । अंतचि नाहीं गे ॥१॥ याची खोडी किती वानूं। खेळायासी मागे भानू । मुखांत घालितां स्तनु ।

न समजे कांहीं गे ॥ २ ॥ उचलुनी कडिये घेई । तुझ्या गृहाप्रति नेई । खाऊं घाली दूधदही । याला समजावी गे ॥ ३ ॥ उतरी यशोदा कडी । राधेवरी घाली उडी । माणिकप्रभुची गुणगोडी । निशिदिनिं गाई गे ॥४ ॥

## पद १९६

(राग–झिंझूटी. ताल–दीपचंदी.)

राधे तुझें चांगुलपण किति वानूं ॥ धृ० ॥ सरळ नासिक दिसे आकर्ण नेत्र । मृग लज्जित गे पाहुनि नयनूं ॥ १ ॥ गौरवर्ण अति सुंदर काया । लाघवी कटी तुझी गजगती जानु ॥ २ ॥ अलंकारासहित वेष्टित वेणी । हळदी कुंकु माथां दिसे प्रतिभानू ॥ २ ॥ माणिक म्हणे राधे पूर्वींचे तपबळें । रततसे तुजसंगें यशोदेचा तान्हूं ॥ ४ ॥

## पद १९७

(राग––झिंझूटी. ताल––दीपचंदी.)

राधिके मम प्राणसखे जाऊं कुंजवनाप्रति चाल ॥ धृ० ॥ करूं तेथें जाउनी एकांत विलास । आला जवळ ऋतुकाल ॥ १ ॥ खांद्यावरि हात घालुनि आडवे । चुंबूं अधरद्वय गाल ॥ २ ॥ माणिक म्हणे प्रभु कृष्ण छबेला । नूतन नवा करि ख्याल ॥ ३ ॥

## पद १९८

(राग—पहाडी. ताल—त्रिताल.)

वाजवी कैसा हरी वेणु । फिरोनियां गर रर रर रर ॥धृ०॥ मुरलीध्वनि पडतां श्रवणीं । होतसे काम दर्द मज ॥ अंगीं विपयवाण संचरुनी । येतो काटा थर रर रर रर ॥ १ ॥ जाय सखे तूं बाहे । आतां त्या नंदमुलाला ॥ होते मदनउष्णता भारी । पोळतसे चर रर रर रर ॥ २ ॥ कान्हा गोपाळ गायी । असे यमुनातीराठायीं ॥ माणिक म्हणे व्रजदारा । जाई तेथें भर रर रर रर ॥ ३ ॥

## पद १९९

(राग—देस. ताल—दादरा.)

वारिजनयना ये वाहन सुपर्णा ॥ धृ० ॥ गोविंद गोपाल गोकुलवासी नंदलाल । गोवर्धनधारी ये गोपीमनमोहना ॥ १ ॥ यशोदेचा कुमार यमुनेठायीं वेणुनादें वळितो गायी । यदुपति जगदोद्धार येऊं दे तुज करुणा ॥ २ ॥ तारी तारी मज हरी । तारकांतक कंसारी । तारक तुझें नाम त्वरित माणिक धरि चरणा ॥ ३ ॥

## पद २००

(राग—भूप जिल्हा. ताल—त्रिवट.)

सखेनों त्वरें धरा गे । पळतसे लुटु लुटु शाम ॥ धृ० ॥ खोडी करितां याचा अंत दिसेना करूं देईना गृहकाम ॥ १ ॥ गोपी मजला सांगे गाऱ्हाणें । सोडूं म्हणती ग्राम ॥ २॥ माणिक याचा प्रभु होउनि बालक । खेळत नंद निजधाम ॥ ३ ॥

## पद २०१

( राग—यमन. ताल—त्रिताल. )

सुंदर माधव अधर वाजवी वेणू । पदर घ्याया देहभान नसे गे ॥धृ०॥ सदरीं येउनि हरी नजरेसी पडतां । उदर भरायास्तव कोण बसे गे ॥ १ ॥ न्हात नग्न न्हाणी पाणीं घेऊनि पाणी । उकलिली वेणीफणीं । तशीच असे गे ॥ २ ॥ माणिकप्रभुविण आणिक असा कोण । मुरलीनादें मना लाविलें पिसें गे ॥ ३ ॥

## पद २०२

( राग—झिंझूटी. ताल—दादरा. )

कृष्णा तूझ्या वेणूंत काय रे । मन मोहित होय रे ॥धृ०॥ गाईचें वासरूं म्हशीसीं जोडी । बैल दोहाप्रति जाय रे ॥१॥ कुंकु तें डोळ्यांत काजळ

कपाळा । हळदीसी मटमटां खाय रे ॥२॥ माणिक म्हणे कैसी मुरली मुकुंदा । ऐकतां देहभान जाय रे ॥३॥

### पद २०३

(राग—पिलु. ताल—दीपचंदी.)

हरी नेला हरी नेला । अक्रुर मेला येउनियां आज सखे ॥ धृ० ॥ राम कृष्ण यांसी बसवुनि वेगें । चालवी रथ मथुरेला ॥ १ ॥ व्यर्थंचि हा शृंगार करुनी दाखविणें कवणाला ॥ २ ॥ जाऊं चला यमुनेंत बुडाया । राहुनी काय करायाला ॥ ३ ॥ माणिक म्हणे प्रभु भासतसे मज । गोपी मुकती प्राणाला ॥ ४ ॥

### पद २०४

( राग—भैरवी. ताल—त्रिताल. )

हिरोनी कैसा नेला गे घनश्याम ॥ धृ० ॥ रामकृष्ण यांसी बसवुनियां रथीं । चालिले मार्ग धरोनी ॥ १ ॥ सांवळें सुंदर रूप मनोहर । कसा नेला ग्रामांत शिरोनी ॥ २ ॥ क्षण एक न गमे मजला सखे । व्यर्थंचि हा शृंगार करोनी ॥३॥ माणिक म्हणतसे गोपीलागीं । रहा तुम्ही हरिला स्मरोनी ॥ ४ ॥

### पद २०५

(राग–पिलु. ताल–दादरा.)

ऐसी प्रीत सख्यानें काय केली ॥धृ०॥ त्याची माझी खूणचि नव्हती । मज पाहुनि डोळा घाली ॥ १ ॥ विरहानळें मी व्याकुळ पडनांचि आपुल्या पदरें वारा घाली ॥ २ ॥ झिडकावितां मी राग नये त्यासी । बोलत मंजुळ बोली ॥ ३ ॥ माणिक बोले विपयपर बोली । अद्वैत अन्वय खोली ॥ ४ ॥

### पद २०६

( राग—झिंझूटी. ताल—त्रिताल. )

हरी नये रुसला कां ग ॥ धृ० ॥ कंटाळुनी मसी वीट धरूनि मनीं । क्रोध हृदयीं घुसला कां ग ॥ १ ॥ कंवटाळीण कोणी कवटाळिलें त्यासी ।

तिचें घरीं बसला कां ग ॥२॥ बोधिलें असें कोणी माणिकप्रभुजीसी। बोध तिचा ठसला कां ग ॥ ३ ॥

### पद २०७

( राग–झिंजूटी. ताल–धुमाळी. )

बंगल्याखालूनी येतो जातो । किती अकडबाज नाजुक मुखडा ॥ धृ० ॥ नेत्रींची चमक बिजलीचा तुकडा । भलत्या ग मिषें मजकडे पहातो ॥१॥ आतां जा ग सखे तूं सत्वर जा । त्याचा मार्ग धरा कोठें जातो तें पहा। त्याचें नांव काय कोण्याठायीं राहतो ॥२॥ बहुताजन्मींचा सुकृत व्हावा ॥ तरी असा सखा नेत्रीं पहावा । माणिकप्रभुचा विरह न साहे तो ॥ ३ ॥

### पद २०८

( राग—झिंझूटी. ताल— दीपचंदी. )

सोडी रवी तक्र करूं दे कान्हया । नवनीत काढुनि देत्यें तान्हया॥धृ०॥ माणिकप्रभु जो त्रिभुवनदाता । समजावीतसे त्या यशोदा माता ॥ १ ॥

### पद २०९

( राग—परज. ताल—त्रिताल. )

मसीं बोलूं नको गिरिधारी । बहु खोटा मोठा नट बालट हरी ॥ धृ० ॥ जधीं होऊनि गोकुळीं गुजगुज उठली । तधीं पासूनी तूझी माझी संगत तुटली ॥ १ ॥ काय सांगू या दैवाला । कोण्या सवतीनें घातचि केला ॥२॥ राधे कां गे भरिसी तुं रागे । काय अपराध केला म्यां सांग गे ॥ ३ ॥ म्हणे माणिक हांसोनि ती राधा । करीं धरिली त्या बालमुकुंदा ॥ ४ ॥

### पद २१०

( राग—झिंझूटी. ताल—धुमाळी. )

जा गे सखे तूं जा गे । आतां गडे जाउनी हरी आण ॥ धृ० ॥ वैरी काम हा आवरितां नाटोपे । करित्यें मी नाना उपाय ॥ १ ॥ रुसले हरी जरी समजावी सखये । दृढ धरुनियां पाय ॥ २ ॥ दूती म्हणे राधे माणिकप्रभूसी । आणित्यें मी उगी व्हाय ॥ ३ ॥

### पद २११

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

कृष्णरूपीं जडली ती बाला । राधेच्या गृहीं होतो सोहळा ॥ धृ० ॥ राधा बोले रडूं नको घनःशामा । यशोदेसी करूं दे गृहकामा । चाल माझ्या गृहासी खेळाया। नेई म्हणे राधेसी माया। कडिये घेउनी कृष्णातें। आली मग आपुल्या सदनातें। पाळखीं बैसवुनी गोपाळा। राधेच्या गृहीं होतो सोहळा ॥१॥ सांवळी पाहुनी मूर्ति ते। आवरी आपुल्या पदरातें। करुनी हास्यवदन तेव्हां। म्हणे तूं थोर होशील केव्हां। माझ्या मनीं आवडी खेळावें। तुम्ही आम्ही मंचकीं लोळावें। हरी म्हणे थोर होतों या वेळा। राधेच्या गृहीं० ॥ २ ॥ दधिभात मिश्रित करुनी। जेववी हरिसी ती तरुणी। पतिसी म्हणे क्षणभरी तुम्ही बैसा। कृष्ण-मुखीं घालीतसे ग्रासा । भोजन झालिया द्वार उघडी । अनय पाहे तांतडी। पाहतां मोहित मुखकमळा। राधेच्या गृहीं० ॥ ३ ॥

---

## कानडी पदें

### पद २१२

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. )

गोपी निन कंदाबालमुकुंदा। हिंग माडिद्रे येनु छंदा ने ॥ धृ० ॥ बाल गोल्लर कूडि नंदकिशोरा। हाल मसरु क्यनि तिंदाने ॥ १ ॥ निन्ने नन्न सण्ण सोशि वयदा यळदकशी। भोगिसिदा गोविंदाने ॥ २ ॥ माणिकने प्रभु अवतार गोकुळदल्लीं। दुष्ट कंसरिगे क्वंदाने ॥ ३ ॥

### पद २१३

( राग—काफी. ताल—दीपचंदी. )

गोपीगृहीं दधि चोरिसिदा। नोडिरम्मा यन्ना ॥ धृ० ॥ मस्तकदल्लि मुगुट। मुखकरदल्ली मुरली। कुंडल मकराकारा ॥१॥ कस्तुरि तिलक कंठ-दल्लीं पदका। शंख चक्र गोवर्धन धारा ॥२॥ माणिकने प्रभु कंसवधाता। पीतवसन नंदकिशोरा ॥३॥

---

# हिंदी पदें

## पद २१४

(राग—झिंझूटी. ताल—दादरा.)

नंदकुंवर सांवरी कान्हा । बासरी बजाई ॥धृ०॥ शुक सनक व्यासमुनि ध्रुव पेहेलाद नारदमुनि । बहगये सब प्रेमभाव देहसुध बिसराई ॥१॥ चकित भयें सबहि देव ब्रह्मविष्णुमहादेव। त्रिभुवनमों नाद भरे सुनत शेषशायी ॥२॥ बह रहे थिर जमुनानीर डुल रहे बिमानि सूर। मानिकदास मगन भये हरिके गुन गायी ॥३॥

## पद २१५

( राग—मुलतानी जिल्हा. ताल-दादरा. )

अभी न मिला रे मेरा भला बन्सीवाला ॥ धृ० ॥ जावोरी सखी कोई मनावो शामको। उस पियाको दिलसे खुलावो ॥ १ ॥ घडि पल छन जुगसम बीती । मानिक प्रभुजीको जलदी मिलावो ॥ २ ॥

## पद २१६

(राग—कानडा. ताल—त्रिताल)

निदंरिया मारो पियासो लागी। मानिकके प्रभु जन्महि लेके सारे जगसे ठग रही ॥ १ ॥

## पद २१७

( राग—काफी. ताल—दिपचंदी )

सुगर उतारनहार । प्रभु खेवट मारो ॥ धृ०॥ शरन आये वाको दोख न जाने । कर देत सागरपार ॥ १ ॥ मानिक के प्रभु भक्तिन भूको । कहूं न जाने बिचार ॥ २ ॥

## पद २१८

( राग—काफी. ताल—दिपचंदी. )

अजहुं न क्यों नहि आयो कृपाधो । कौन दास तुमको बिरमायो ॥धृ०॥ गज सुमरे तब धायो प्रभुजी । खगपति बेगिन पायो ॥ १ ॥ द्रुपदसुताकी

सखी लाज प्रभु। लाखन चीर वढायो ॥ २ ॥ खंब फोर पहेलादके कारन। नरसिंग रूप धर आयो ॥ ३ ॥ मानिक कहे तोहे दरसनके कारन। हुलक हुलक जस गायो ॥ ४ ॥

## पद २१९

(राग—देस. ताल—दीपचंदी)

भक्तराज पहेलाद पुकारे। जय जय जय नरसिंग हरे। तुमरे नाम लिये जब प्रभुजी। संकट विपत दुरित हरे ॥ धृ० ॥ हिरणाकुस पेहेलादसे पुछे हो वेटा क्या क्या तुम पढे। हंसके पहेलाद कहे पितासे आगम सब मारग मीटे ॥ १ ॥ क्रोधकु आये पिता कहे तब बालकको मारहि डारो। कहे पहेलाद नहिं डर माको नरसिंह है राखनहारो ॥२॥ लेकर शस्त्र दूत तब दौरे बालकको जब मारन लागे। चक्र सुदर्शन आसपिस शस्त्रकी घाव एकहि न लागे ॥ ३ ॥ फेंक दिये पर्वतके ऊपरसे बालको खुब जेर करे। बालकका येह संकट जानके प्रभु अधर धाय पकरे ॥ ४ ॥ तेल तपे कढईके भीतर बालकको जब डार दिये। नरसिंग नरसिंग नाम पुकारत शीतल अगन तबहि भये ॥ ५ ॥ पय भीतर विखको डारके माता कहे तूं पान करे। ले नरसिंग नाम पय पियो लागे विख अमृतसमान रे ॥ ६ ॥ हिरनाकुस पहेलादसे पूछे कहां अधार नरसिंग है तेरे। कहे पेहेलाद सुनिये पिताजी जहां तहां सब पूर्ण भरे ॥ ७ ॥ हिरनाकुसने क्रोधसे जब खंबनपर लाथ दिये। कड कड कड कड खंब फोरके तब नरसिंग अवतार भये ॥ ८ ॥ प्रभुजीने नखसे पेट चीरके हिरनाकुसको नाश करे। दिनदयाल नरसिंग ऐसे निसदिन मानिक गावत रे ॥ ९ ॥

## पद २२०

(राग—गौरी. ताल—झुमाली.)

अब कहां गयो घनश्याम बिहारी ॥ धृ० ॥ खंब फोड नरसिंग उधरी। हिरणकश्यपु उर फारे ॥ १ ॥ द्रुपदसुताकी लज्जा राखी। खेंचत चीर दुःशासन हारे ॥ २ ॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी। चरनकमल बलिहारी ॥ ३ ॥

## पद २२१

(राग—बिहाग ताल—त्रिताल.)

ऐसे गरिबनवाज प्रभुजी ॥धृ०॥ संकट पडे तब सुमरन कीनो । उधार लियो गजराज ॥ १ ॥ द्रुपदसुताकी लज्जा राखी । लाखन चीर बढाय महाराज ॥ २ ॥ मानिकके प्रभु दीनदयाल । शरन आयकी लाज ॥ ३ ॥

## पद २२२

(राग--काफी. ताल--दीपचंदी)

म तोरे हीन दीन कैसे छुटैयां । पापपुण्य कछु देखन आया ॥धृ०॥ पावन किये पापी अजामिल । दुजा पावन किये चोखामेल । पावन किये रोहिदास चम्हारिया ॥१॥ पावन किये मिराबाई । दुजा पावन किये सजन कसाई । पावन गजराज गुसंय्या ॥२॥ मानिनके प्रभु नाथ कृष्णजी । कर जोर करता है अर्जी । तुम्हारे चरनको ध्यास लगय्या ॥ ३ ॥

## पद २२३

(राग--काफी. ताल--दीपचंदी.)

राखो मोरी लाज ये महाराज ॥धृ०॥ पतितपावन प्रभु श्रीहरि दिनके । देवर भक्तन काज ॥ १ ॥ तुमहि तारो तुमहि मारो । तुम भक्तनके सिरताज ॥२॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी । शरन आये यदुराज ॥३॥

## पद २२४

(राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी.)

ओढलिया है शाम कामरि काली ॥धृ०॥ सांवरी सूरत बांके रसभर आखियां । इन हिन कवन सुकुमारी ॥१॥ जमुनाके नीर तीर धेनु चरावे । बन्सी बजावे मनहारी ॥२॥ मानिकके प्रभु दीनदयाला । ताके चरन बलेहारी ॥३॥

### पद २२५

(राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल.)

आज वन्सी बजाई घनश्यामने ॥धृ०॥ जमुना तीर गये विहारी। वन्सी की नाद सुनाई हो ॥१॥ बृंदावनमो कुंजगलि नमों। व्रजको लाज गमाई हो ॥ २ ॥ मानिक कहे त्रिभुवनपालक। चरनन ध्यान लगाई हो ॥ ३ ॥

### पद २२६

( राग—मल्हार. ताल—त्रिवट. )

आज नखपर परवत शाम धरे ॥ धृ० ॥ घुमंड घुमंडकर बादल छाये। सननन पर्वतपर बूंद गिरे ॥ १ ॥ घडि घडि पल पल बिजली चमके। बादलसे अंधियार गिरे ॥ २ ॥ मानिकके प्रभु कृष्णजी। आज दुष्टनको संहार करे ॥ ३ ॥

### पद २२७

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

अब कैसी सखी री जाऊं पनियारी ॥ धृ० ॥ जमुनाके नीर तीर गऊ चरावे। वन्सी बजावत कन्हया री ॥ १ ॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी। ताकुं कांपे गवाल थरारी ॥ २ ॥

### पद २२८

( राग—काफी ताल—दीपचंदी. )

आज शाम वन्सी हो बजाई ॥ धृ० ॥ वन्सी सुन जब नागर नटकी। शेष प्रेम भयो सोसन झटकी। धरती जब जाधर लटकी। ऐसी प्रेम छाई ॥ १ ॥ जमुना तीर हार बाज बन वन्सी की धून सबद बराय घन। मानिकके प्रभु भक्तनके प्रान चरनन ध्यान लगाई ॥ २ ॥

### पद २२९

( राग—झिंझुटी. ताल—त्रिताल. )

उद्धव तुम जाके वो हरीसे कहिये ॥ धृ० ॥ अन्न त्यजे, ना जलकी हो आस। रोवन लागे गौवे ॥ १ ॥ छांड दिये हम ब्रिज गवालनको। कुब्रीसो

प्रीत लगाये ॥ २ ॥ मानिकके प्रभु तुमरे दरसको। व्याकुल ब्रिज सब भये ॥ ३ ॥

पद २३०

(राग—मुलतानी जिल्हा. ताल—त्रिताल.)

कवन राधे छोकरेने मोरा हार गमायो ॥ धृ० ॥ दधि खाये मटकी फोरी पटकी। सिरके बाल तोरी ॥ १ ॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी। चरनन जाऊं बलेहारी ॥२॥

पद २३१

(राग—यमन. ताल—त्रिताल.)

कुबरी कंस की दासी। वोसंग जावयाको जान। ऊधो हमसे बने है बैमान ॥ धृ० ॥ हम जाने ऐसी ना भयोगी। बोलत मधुर बचन ॥१॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी। गोपी ब्रिजको जीवन प्रान ॥२॥

पद २३२

(राग—पिलु. ताल—दीपचंदी.)

चल जाऊं रे बन आज कन्हैया ॥धृ०॥ लिये रोटी पाछे बांध सिदोरी। लिये कुछ आव दही दुध मलैया ॥१॥ गौवन भार गोविंद हाकारत। पाछे पुकारत जसोदा मैया ॥ २ ॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी। तोहे चरनन बल जाऊं बलैया ॥३॥

पद २३३

(राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल.)

तोरे वन्सीके नाद दिवानी भई ॥ धृ० ॥ गौके बछेरे भैंशी कु छोरी। बैलसे दूध निकाल रही ॥१॥ नाकोंमें सुरमा कानोमें मिस्सिं। नयनोंसे कुंकू लगाते रही ॥२॥ हाथोंमे पैंजण पावोंमे चोली। शिरकु सारी लपटते रही ॥ ३ ॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी। तोरे मुरलीने बहोत जुलम की ॥ ४ ॥

## पद २३४

( राग—खमाज. ताल—धुमाळी. )

तकड् धिंऽतकड् धिंऽमृदंग बजावे। नाचत गोपीबाला रे ॥ धृ० ॥ भक्तनकु तारे कंसनकु मारे। राज दिये उग्रसेना रे। यवनके खातर द्वारका बसाये। अंत नहीं अस्माना रे ॥ १ ॥ पांडव के कैवारी कौरवको संहारी। असुरासुरमर्दना रे। यवनकु लेकर मुचकुंद–विवरमें भस्म किये दुर्जना रे ॥ २ ॥ भक्तनका प्रेम देखे घननीळ सुदामनगरीका सोना रे। दास मानिक कहे मधुसूदन जस दिया अर्जुना रे ॥ ३ ॥

## पद २३५

( राग—झिंझूटी. ताल—पंजाबी. )

दया करो दासनपर स्वामी। सत्यनारायण अंतर्यामी ॥ धृ० ॥कदली शर्करा गोधूम पय घृत। कबहुं न कीनो ये विधिसे व्रत ॥ १ ॥ सत्यकथा सुनी नहि कानन से। कबहुं न नाम लिये आनसे ॥ २ ॥ मानिकदास पतित खल कामी। पावन करो गरुडध्वज स्वामी ॥ ३ ॥

## पद २३६

( राग—झिंझूटी. ताल—त्रिताल. )

देखो री नयन रूप नीको ॥ धृ० ॥ कानन कुंडलको प्रकाश । छुप गये सूरज चंद्र आकाश। सीसनपर मुगुट विराजे। माथे चंदन टीको ॥ १ ॥ पीत कसे गरे बैर विराजे। रूप स्वरूपको बरनन आवे। शंख चक्र दो हात विराजे। नाद सुनो मुरलीको ॥ २ ॥ आसपास गोपाल मेला। बीच सुहावे बाल गोपाला। मानिकके प्रभु नंद–घर उपजे। धन्य भाग्य गोकुलको ॥३॥

## पद २३७

(राग—काफी. ताल—त्रिताल.)

नंदके चरावत गायी सब व्रजमांही ॥ धृ० ॥ बन बन बजावे मुरली। मुरलीके नादसुनायी ॥ १ ॥ संग लिये गोपालन–मेला। वोही मेघन सांवला ॥ २ ॥ मानिक कहतसे ताहोकू। तोहे ध्यान देना मोहेकू ॥३॥

पद २३८

(राग—पिलु. ताल—धुमाळी.)

प्यारा बन्सीवाला रे। बासुरी बजाय मेरा मन हार लियो ॥ धृ० ॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी। गरे वैजयंती माला ॥१॥

पद २३९

(राग—पिलु. ताल—दीपचंदी.)

वृंदावनमो बीन। बाजे कन्हय्या ॥धृ०॥ मानिकके प्रभू नंदघर उपजे। भक्तनको आधीन ॥ १ ॥

पद २४०

(राग—पिलु. ताल—धुमाळी.)

बन्सीवालेने मोहलिया प्रान ॥ धृ० ॥ मैं दधिवेचन जात वृंदावन। वीच मिला प्रभु आन ॥ १ ॥ मानिकके प्रभु जमुनाके नीरतीर। बन्सी बजावे गावे तान ॥ २ ॥

पद २४१

(राग—पिलु. ताल—धुमाळी.)

माई मोरा दिल लगा प्यारे बन्सीवारीसे ॥ धृ० ॥ मानिकके प्रभु गोकुलवासी। पूर्णब्रह्म गिरिवरधारीसे ॥ १ ॥

पद २४२

(राग—झिंझूटी. ताल—धुमाळी.)

मैं वारूं रे सैय्या तोहे परसे रे ॥ धृ० ॥ तोहे मुख देखनको आयीरे कन्हय्या। दौरत दौरत पियाघरसे रे ॥ १ ॥ सांवरी सूरत रसभर अखियां। लेऊंगी बलैंय्या दो करसे रे ॥ २ ॥ मानिकके प्रभु ये नंदलाल दरसनबिन जिया तरसे रे ॥ ३ ॥

पद २४३

(राग—पीलु. ताल—दीपचंदी.)

मत बाजो मत बाजो मुरली कन्हय्या। आग लगो तोरे मुरलीकु सैंय्या ॥ धृ० ॥ जमुनाके नीर तीर गौवे चरावे। बन्सी बजावे वोहि

कन्हय्या ॥ १ ॥ जद तेरे मुरलीकी धून सुनय्यां । गृहद्वार मंदिर लून दिखंय्या ॥ २ ॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी । कायकु ऐसी बन्सी बजाया ॥ ३ ॥

पद २४४

( राग—काफी. ताल—दीपचंदी. )

ओढावो कामल कारी । माको थंड लगे ऋतु भारी ॥ धृ० ॥ मानिक प्रभुजीने ओढाई कामल । दरसन आये नरनारी ॥ १ ॥

पद २४५

( राग—झिंझूटी. ताल—धुमाळी. )

तेरी सांवरी सुरत बांके नयना ॥ धृ० ॥ चाल चलत जैसी मोरवा नाचे । बोली बोले तोता मैना ॥ १ ॥

पद २४६

( राग—झिंझूटी. ताल—धुमाळी.)

मय्या मोहे शाम देवत गारी । मोहे झडकके चुनरी फारी रे ॥धृ०॥ दधि तेरो खायो माखन खायो । ईने दधिकी मथनिया फोरी रे ॥१॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी । तोहे चरनन जाऊं बलेहारी ॥२॥

पद २४७

( राग—झिंझूटी. ताल—धुमाळी.)

मेरी जान बांका मुरलियावाला ॥धृ०॥ मोर मुगुट मकराकृति कुंडल । गला बैजयंती माला ॥१॥ वेदभुजा पीतांबर सोहे । कछु सांवर कछु-काला ॥२॥ मानिकके प्रभु या ब्रिजमोहन । बन्सी बजाय जादू डाला ॥३॥

पद २४८

( राग—पिलु जिल्हा. ताल—दीपचंदी. )

शाम दे दे रे चीर हमारी ॥धृ०॥ लेकर चीर कदंब चढ बैठे । हम जलबीच उभारी ॥ १ ॥ देवोजी चीर हमारी कन्हय्या । पैंया पकर कर जोरी ॥२॥ मानिकके प्रभु ये नंदलाला । तुम जीते हम हारी ॥३॥

पद २४९

( राग—पिलु जिल्हा. ताल—दीपचंदी. )

शामपर मत डारो राधे चोरी ॥धृ०॥ बाहेर शाम गयो नहि राधे । तापर ये बरजोरी ॥१॥ छोटीसी सूरत खेले अंगनमो । कब आवे घर तेरी ? ॥२॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी । ताके चरन बलेहारी ॥३॥

पद २५०

( राग—यमन जिल्हा. ताल--त्रिताल. )

सुनत तेरी बन्सी दिवानी भई ॥ धृ० ॥ बन्सी की धून सुन नंगी नाच रही । थोरीसी सूद ना रही ॥१॥ मानिकके प्रभु नाथ कृष्णजी । चरनन लाग रही ॥ २ ॥

पद २५१

( राग--पीलु जिल्हा. ताल--दीपचंदी. )

सांवरियासे बताव मोरी सजनी । जाको धुंडत गयी दिनरजनी ॥धृ०॥ मोरमुगुट गले बैजयंती । कानोंमे कुंडल झलकत मोती ॥ १ ॥ खांदे कांवरी हातबीच मुरली । जाको भूलगई राधिका सैली ॥२॥ मानिकप्रभु नंदलाला । पगमें पैंजन घुगुंरुवाला ॥३॥

पद २५२

( राग--परज. ताल—त्रिताल. )

सखि सावन नहि पियरवा नगीच ॥धृ०॥ झिलमिल झिलमिल मेहा बरसे । अंगनमे हो गयी किच । घडिघडि पल छन विजली चमके । देखत अखियां मिच ॥१॥ पूर्व देशसे पवन चलत है । बादल भरगयी नीच । मानिक कहे अब नाव परी है । गंगा-जमुना बीच ॥२॥

पद २५३

( राग—बागेश्री बहार. ताल—त्रिताल. )

निंदिया मा दरस माको दीनुवा ॥ ना जानुं मोहे का कीनुवा । बालमा ये आज भईलुवा ॥धृ०॥ छब देखतेही मै तो सूद हारी । धन तन

मन जीवन सब वारी ॥ बा० ॥ १ ॥ टुक देख अपनो करलीना। चित्त उचक बावर कर दीना ॥ बा० ॥ २ ॥ ऐसो मोहन दूजो नहि माई । अलबेला यहि मानिक सांई ॥ बा० ॥ ३ ॥

पद २५४

( राग—पंचम. ताल– (क्रम) चौताल, सुरफाकता, त्रिताल, झंपा )

बन्सी धून सरस राय कोमल लय मधुरी गान खेलत सुरंग फाग नंदनंदन जमुनातीरवासी ॥ धृ० ॥ गावे गारी दे दे तारी सब ब्रजनारी रंग पिचकारी भरभर मारी । भिजे सब विमल चीर । बन्सी धून० ॥१॥ मानिक सुरसावत सावसे संग सुहाय मोटी छोटी गुलाबदानी चपल नयन भर अबिर होरी । खी शाम शामर चंडोल डंकार सुन देव आकाश छाये । मानिक अति गुनगंभीर । बन्सी धून० ॥ २ ॥

---

## उर्दू पदें

पद २५५

( राग—पिलु जिल्हा. ताल—दीपचंदी. )

अपने मे आप खुदा देखता हूं । खुदी को मैं जिसदम जुदा देखता हूं । न काफर न मोमिन न मुसल्मान समझो । हर हरमें हरजा बजा देखता हूं । अलाकुल्ल शय्यिन् मोहितस्तजाहेर व जूल्वेनुमा बरमला देखता हूं । ये मानिये अकबरकु मानिक सावित । जिस दमसे दमसे मिला देखता हूं ॥

पद २५६

(राग—झिंझुटी. ताल—दीपचंदी.)

इस वजूदको झूटा जानलेव। देखो देखो तुमहीमे तुम हो। तुमको तो तुमने भुलगयो। मैं वजूद कहके कूद रहे। ये वजूदसे तुम अलग रहो। थोडेमे समझा देऊं मै ये बात मानो मेरी सही। दुनियाको सपना

जानलेव। पैदा तो तुम हुये नहि। कजा तो तुमकु आवे नहि। मानिक कहे तुम मस्त रहो ॥

पद २५७

( राग–झिंझूटी. ताल–दादरा. )

अल्लाहकु मिला चाहे तो तू मैंको बिसरजा। गर इष्क लिया चाहे तो तू सरको विसर जा। मानिक कहे अये दिल रहो रबके यादमें। लयलुन्नहार लय लगो मत दमकु विसर जा ॥ १ ॥

पद २५८

( राग—यमन. ताल–त्रिताल. )

जहां देखे तहां रब तुहि तूहि। मानिक सांई भरपूर भरा है देखनहारा वोहि वोहि ॥ १ ॥

पद २५९

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

पयंबरकु जाने सोहि मुसल्मान। रसूले खुदा वो कहावे पयंबर बतावे राह रब पढाके कल्मा। लाइलाह इल्लिल्ला है अल्ला। नहीं है सिवा उसके सुनो तुम अए उल्मा। मानिक कहे खुद खुदाने कहा है। महम्मदकु जाने सोहि मेरा मेहमा ॥ १ ॥

पद २६०

(राग–झिंझूटी. ताल–दादरा. )

मुष्कीलकु पार करो मेरे मुर्तुजा अली। लेतेहि नाम तुमारा आयी सो बला टली ॥ धृ० ॥ मानिकके वाली हो तुम दो जहांके बीच लग है तुमारे दरका। फिरता है गली गली ॥ १ ॥

पद २६१

(राग—पिलु. ताल—दीपचंदी.)

मेरा गौस मोहियोद्दीन। दस्तगीर महबूब सुवहानी पीरानूपीर मानिकके वाली वास्स तुम माफ करो गुन्हा तक्सीर ॥ १ ॥

## पद २६२

( राग-खमाज. ताल-धुमाळी. )

वोहि जो वंदा वोहि जो वंदा । राह न जाने सोहि गंदा । लाइलाहसे दमकु लेके इल्लिलाहमें ठैर जाना । महंमद रसूलिल्ला कहके नबी अलीका रम्ज पाना । कौल है रसूलिल्लाका नमाज रोजा करते रहना । अपने दीनपर कायम रहके मौतके आगे मर जाना । मानिक सग है रसूल दरका बांध लिया गलेमें तागा । डोरी तो मेरी रबके हाथमें जिधर ऐंचा उधर भागा ॥ १ ॥

## पद २६३

( राग--यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

जब मुरषदने कान फूका । खुल गये आखां । मुझे मैं देखा । मानिक कहे गाफिलका परदा । लेकर दस्त उठाकर फेका ॥ १ ॥

## पद २६४

(राग—झिंझूटी. ताल—त्रिताल.)

मन काहेका डर है तुझे । अल्लाह तेरा रखवाली है । मानिक कहे यह जानकर । नबी अलीका ध्यान कर । महबूबकी पैछान कर । सिरपर मदत सब वली है ॥ १ ॥

## पद २६५

(राग—पिलु. ताल—दीपचंदी.)

हर हर घटमों एकहि एक । मुरषदके निगाहसे देख ॥धृ०॥ बावा अदमसे है पैदायष । निकलेगा दम गिर जावे लाष ॥१॥ मानिक कहे आपहि आप । आपहि बेटा आपही बाप ॥२॥

## दोहरे

२६६

धूंडो अपने पीरको । करलेव अपनी बेट ।
मानिक कहे तुम मस्त रहो । जम क्या उखाडे झाट ॥१॥

२६७

सांई अपने पास है । ताको गये है भूल ।
मानिक कहे सब जगतके । नयनमें पडी है धूल ॥२॥

२६८

सांई मेरा जहां बसे । तहांकी अवघड घाट ।
मानिक कहे वेपीरको । कैसी मिलेगी वाट ॥३॥

२६९

सांई मेरा जहां वसे । वहां नहीं हम तुम ।
मानिक कहे मै क्या कहूं । बात हो गयी गुम ॥४॥

२७०

मानिक कहत है मजल महीलेके । जगसे देख ढगी ढगी रे ॥५॥





श्री

# मनोहर माणिकप्रभु

## महाराज

यांचीं पदें

॥ श्री ॥

# पदांची क्रमवार सूची

——:०:——

## ॥ श्रीगुरु अवधूत ॥

### पद १

( राग–खमाज. ताल–धुमाळी. )

सच्चिद्घन परब्रम्ह निजात्मा वेदागम्य तो माणिक रे ॥ धृ० ॥ भूतल वहु पापिष्ट जनांनीं कलियुगीं व्यापित झालें रे । यास्तव सुरगण सकलहि मिळुनी प्रार्थिति दत्तात्रेया रे ॥ १ ॥ कृपासिंधु भक्तकार्यकल्पद्रुम गुरु सकलमतां उद्धारी रे । ऐसी प्रार्थना ऐकुनि गुरुवर प्रगटला श्रीवत्स गोत्रीं रे ॥ २ ॥ तोडुनि दुर्जन संतचि केले स्थापियले निगमोक्ता रे । माणिकदास मनोहर विनवी ध्यातां त्या मोक्षप्राप्ती रे ॥ ३ ॥

### पद २

( राग–देस. ताल–धुमाळी. )

जो जो जो जो रे प्रभुराया । तव स्फूर्ति झाली ही माया ॥धृ०॥ प्रथम आदिनारायण । तोचि पद्मज अत्रि जाण । मग दत्तात्रय चिद्घन । माणिकरूपें प्रगटोन । उद्धरिलें पापी जनां या ॥१॥ त्या मूलप्रकृति मायेसी । तो तूंचि प्रतिबिंबलासी । स्वरेनें सगुण जहालासी । मग त्वां केलें या सृष्टीसी । वहु झालासी दीन ताराया ॥२॥ पाळणा मानसमंदिरीं । हालवी भक्तिसुंदरी । हातीं धरोनि प्रेमदोरी । मनोहर हृदया अंतरीं । राजाधिराज माणिक गुरुवर्या ॥३॥

### पद ३

( राग–पिलु जिल्हा. ताल–धुमाळी. )

वंदे श्रीमाणिकमखिलेश्वर पालं । मृगमदलिप्तसुभालं, दधानं हस्ते शोभितदंडं । दारुकाखिल पाखांडं । इच्छया कृत स्थिरचर ब्रह्मांडं । सकलानंद करण्डम् । ईशंवीशाहित निजपदकमलं ॥ १ ॥ आद्यं सत्करुणापारावारं ।

नतजनहृदयविहारं। अपारं चागमसागरसारं। भूषित मणिमुक्ताहारं। भक्त्यामुनि सुरवरनरपातारं। मनोहरबालकपालम्॥ २॥

### पद ४

( राग–कालंगडा. ताल–त्रिताल. )

श्रीमाणिकाख्ये नतजनसख्ये। सुरमखमुख्ये अस्ति मनो मे॥ धृ०॥ दीनार्तिनाशे स्वयंप्रकाशे। व्याप्तपंचकोशे, चैतन्याकाशे॥ १॥ करधृतदंडे आनंदकरंडे। कृतत्रिकांडे भालेंदु खंडे॥ २॥ सकलानंदे विरहितभेदे। नाशकखेदे ईशवंद्यपादे॥ ३॥ कालांतकाले करुणारसाले। आनंदालवाले त्रिभुवनपाले॥ ४॥ माणिकमुक्ताहारे निगमाब्धिसारे। सकलांतरे जगन्मनोहरे॥ ५॥

### पद ५

( राग–पिलु जिल्हा. ताल–दादरा. )

भज रे मनुज त्वं शरणं सुखकंदं। त्रयभुवनानंदं॥ धृ०॥ दंडक वनवासिमुकुंदं सुमनस्कंज मिलिंदं। द्विजनंदन दितिजवृंदप्रहरणं कुंददंतं सुसज्जनसुखदं॥ १॥ गुरुदैवत दैवत वेदप्रमाणं मतोच्छ्रय कुरु तच्चरणं। माणिकमजमखिलाधिहरणं स्वभक्तप्राणं। तारणतूर्ण भवहरण चरण ते रक्षण मनः कुरु निजमनोहरदीनम्॥ २॥

### पद ६

( राग–देस. ताल–दादरा.. )

भज माणिकं भज माणिकं भज माणिकं भज माणिकं॥ धृ०॥ सुरनायकं भवहारकं। फलदायकं सुखकारकं॥ १॥ अघहारकं जनतारकं। प्रभुनायकं नयधारकं॥२॥ नतपालकं गुणदायकं। नरसिंहसूनुतोषकं॥ ३॥

### पद ७

( राग–भैरवी. ताल–धुमाळी. )

माणिक प्रभुवर परतर सुखकर सुरवर ईश्वर दत्तप्रभो। भवहर गिरिधर दिगंबर सांबर हरिहरवंदित देव विभो। सच्चिद्घन निजभक्तप्रपा-

लन संसृतिदारुणनाशन भो। जय जय जय जय जयप्रद स्वार्थद शर्मद नैजजनेषुहि भो ॥धृ०॥ सज्जनमंडन दुर्जनखंडन दुर्मददंडन कारक भो। मणिगण हार विराजित राजित नाशित दितिसुतवृंदक भो। अत्रिसुत त्रिगुणात्मक यदुनृपवंदित है हय तारक भो ॥१॥ मोहग्राहविदारक तारक मायाहारक रक्षक भो। स्वात्मसुखैकरसात्मक नतजननिजपददायक पोषक भो। भवजलसिंधुसुतारक रुक्म कश्यपुविदारक तोषक भो ॥२॥ मनोहरनंदन नंदनवनतरुजात कुसुमकृतहारविराजित। मायाकृतसदसन्मय-स्थिरचरचालक ज्ञान विभूषणभूषित। हरिहरविधिमुखसुरगणकिंनरगंध-र्वादिमुनिजन वंदित ॥३॥ निगमसमुद्रविशोधक चिन्मयमूर्ति निरामय भो भगवन्। अज्ञानांधःकारविनाशक हृदय प्रकाशक भो स्वामिन्। भक्तसमूह मनोरथसुरतरु योगीराज महाराजन् ॥४॥ सज्जनहृदयसरोरुह विस्तृतमध्य विहारिन् लक्ष्मीपते। निरंजन निर्गुण निरीह निराकृति अष्ट-विविध सुसिद्ध्यवनिपते। अंतर्दाह विशामक सद्गुरो नानारूपक लोकपते ॥५॥ द्विजकुलभूषण त्रिभुवनतोषण निशिचरचर्षण भूतपते। पंकजलोचन दैत्यनिकृंतन हे नारायण विप्रपते। सदोदित परिपूर्ण सकलार्तिनाशक धर्मसंरक्षण सिद्धपते ॥६॥ त्रिभुवननाथ स्वयं निर्नाथ सुकामकैवल्यधर्मार्थ-पते। आनंदाख्याप्रमेय निरूपम शांति दयामय पृथ्वीपते। सकलमत-स्थापक सन्नायक नानारूपक विबुधपते ॥ ७ ॥ हनुमदनुज नरकेसरयाग्रज द्विनेत्र द्विभुज दंडधारक भो। बयांवातनय श्रीवत्सकुलोद्भवनेत्रकरंजित-कज्जल भो। नैजदासमनोहरपालक अखंडानंदविवर्धक भो ॥८॥ संस्कृत भाषासूत्रविगुंफित नवनव मणिमय हारमिदं। ये नित्यमनेनार्चयंति प्रभुं सत्यं सुखिनः ते सुखदं। ये प्रपठंति सुभक्तियुतास्ते प्राप्नुवंति मुनिवंद्यपदं ॥ ९ ॥

## पद ८

( राग—यमन जिल्हा. ताल—त्रिताल. )

नतमनहरणा तूं त्राहि मां। जय कुमतिसुहनन ॥ धृ० ॥ द्विलोचन सुंदर पाणी। झळकति कुंडल कर्णी। स्वसुख कारण भवहर चरण ते

गाति मुनि निशिदिनिं अघहरण। जय कुमति० ॥ १ ॥ जय सर्वस्तव्या अखिलेशा। जो अगम्या चतुःषष्ट अष्टादशा। कोपे नाकभूपादि कांपति तुज। देवन्न स्तविती पंकजनयना। जय कुमति० ॥ २ ॥ गुरुराज माणिकप्रभुराजा। अव्यया अज निराकारा। पाररहित अपार पापकारी। तारि मनोहरा भवविदारा ॥ ३ ॥

## पद ९

( राग—परज. ताल—धुमाळी. )

कधिं भेटशिल मज माणिका। कधिं पाहिन मीं तव पादुका ॥ धृ० ॥
आस लागली मजला तुझी। कां विसर पडली तुजला माझी ॥ १ ॥
दीन म्हणुनी कां उपेक्षिलें। पापी म्हणुनि कां मज सोडियलें ॥ २ ॥
जरी मी बहु अन्यायी खरा। मनोहरा जगीं नाहीं दुजा आसरा ॥ ३ ॥

## पद १०

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. )

सखया जावें निजगुरुचरणा शरण झडकरी। त्याविण दुजा त्राता नाहीं तुज जगदंतरीं ॥ धृ० ॥ नित्यानंदं निरूपमसुखदं भज देशिकनाथं। मूर्खतया त्वं संसृतिकूपे पतितोऽसीह कथं। अर्थमनर्थं त्यक्त्वा स्वार्थं साधय परमार्थं। धृत्वा नरतनुमिह भूलोके भ्रमसि किमुव्यर्थम् ॥ १ ॥ येनु माडिदर येनु इल्ला सद्गुरुहीनरिगे। ध्यान धारणा माडिद श्रमवे हुलिवण्णा नरिगे। गुरुमार्गविण हादी इल्ला होगलिक्के अलिगे। यच्चर बिट्टु येनु इष्टि मूर्खा नि मलगिद्दे ॥ २ ॥ गुरुविश्वेश्वर पादोदक जानले वोहि गंगा। तारकमंत्र उपदेस सुनते हि अज्ञान जावेगा। ज्ञानगुरु दृष्टि पडतेहि अज्ञान भागेगा। जो इस मार्गसे निकल गया वो फिर नहिं आवेगा ॥ ३ ॥ बहूत योनी बहूत साधन बहु युग मी फिरलों। परी आपुल्या स्थानालागीं नाहीं पावलों। मनोहर म्हणे जेव्हां श्रीमाणिकचरणा लागलों। तेव्हां अनिर्वाच्य खुणा आपुल्या लाधलों ॥ ४ ॥

## पद ११

(राग–कालंगडा. ताल–धुमाळी.)

गुरुपदलम्नो भवाब्धितरणार्थें भव त्वं देहिन्। मग मिळेल मोक्ष सत्वरीं तुला याच देहीं ॥ धृ० ॥ हरिहर शरणं संसृतिहरणं त्यक्त्वा कं भजसि। बा रे निजपद सोडुनि व्यर्थ फुकाचि तूं मुकसी। तनवळगे तां नोडदबिट्टु याको श्रम बिडसि। मनोहर कहे सद्गुरु चरनन बिन न तुटे भवफांसी ॥१॥

## पद १२

(राग–झिंझूटी. ताल–धुमाळी.)

श्रमलासी माझ्या नाथा ॥ धृ० ॥ सज्जन पोषणीं भवाब्धि शोषणीं। श्रीगुरुमाणिकप्रभु दत्ता ॥ १ ॥ अध्यात्मक जाहला ज्ञानदेह हा ह्मा दिला ऐसी गाति कीर्ति तुझी भागवतादि कथा ॥ २ ॥ नरहरि हृदयाब्जवासी प्रगटला बयांबा कुशीं। रक्षिता मनोहर दीन अनाथा ॥ ३ ॥

## पद १३

(राग–काफी. ताल–दीपचंदी.)

मीं जन्मुनी केलें काय ?। व्यर्थ शिणविली माय ॥धृ०॥ ईशदत्त शक्त्युदरपोषणीं। विषयोपभोगीं केला काय ॥१॥ निंदक बहु खल पापिष्ठ मी। अति केले अन्याय ॥२॥ ऐसा हीन दीन मनोहर तरेल। होतां माणिक माय सहाय.॥३॥

## पद १४

(राग–परज. ताल–त्रिताल.)

राखी लाज माझी श्रीमाणिका। तुजविण शरण मी जाऊं कवण आणिका ॥धृ०॥ दैवोज्झित मी बहु पापकर्मी। रतलों नाहीं मी निगमादि धर्मीं ॥१॥ न कळे कांहीं निज वर्मक्रिया। योग न याग न साधन तें आर्या ॥२॥ ऐसियां तारक तूं एक जाणुनी। मनोहर भाकी वारंवार दीन वाणी ॥३॥

## पद १५

(राग–हमीर. ताल–त्रिताल)

दाता जगीं माणिकप्रभु तो एक ॥ धृ० ॥ उपासकातें त्या त्या रूपें। इच्छित पुरवी देख ॥ १ ॥ जीवन एकचि फलिता करितें। भूवरि बीज अनेक ॥२॥ मनोहर म्हणे एक संत। वदती वेद प्रमुख ॥३॥

## पद १६

(राग–झिंझूटी. ताल–धुमाळी.)

श्रीमाणिका त्वत्पदकमलां दाखवि त्वत्कृपेनेंच पावलों अवस्था मानवी ॥ धृ० ॥ व्यर्थ जातो हा देह सारा। नकळे आयुष्याचा थारा। यास्तव दास मनोहरा। ज्ञानामृतधारा चाखवी ॥ १ ॥

## पद १७

(राग–झिंझूटी. ताल–दादरा.)

माणिक चरण कमल युगुल मानसीं वसो रे ॥ धृ० ॥ श्रीमाणिक नाम मुखीं गावें। डोळे रूप तेंचि पहावें। देह त्याचे काजीं पडावें। दृढ हें असो रे ॥ १ ॥ अन्य निश्चय अन्य देव। चित्तीं हें कदा नसावें। माणिक पदीं लीन व्हावें। अंतर नसो रे ॥ २ ॥ मनोहर म्हणे द्वैतभाव। येणें सत्य होय अभाव। आहे भक्ति भवाब्धिनाव। येणें दुःख नसो रे ॥ ३ ॥

## पद १८

(राग–यमन. ताल–त्रिताल.)

दया करी श्रीमाणिका मां पाहि रे। त्राता त्रिजगदंतरीं तुजविण नाहीं रे ॥ धृ० ॥ काम क्रोध अहंकार त्रिपुटीचें स्थान। लोभ मोह मत्सरादि कापूं पहाति मान ॥ १ ॥ भवतोय सागरडोहीं बुडतों मी, काढीं। त्रिविधतापें वेधिलों, वेदना ही तोडी ॥ २ ॥ शरण मी जाऊं कवणा। तारि तारि मज नत मनोहर दीना रे ॥ ३ ॥

## पद १९

( राग–यमन जिल्हा. ताल–धुमाळी )

माणिकपदीं नत जे संत। नकळे त्यांचा अंत ॥ धृ० ॥ यत्पदरजसेवक भवजलनिधि। तारिति इह खलु संत ॥ १ ॥ मनोहर म्हणे त्यांच्या संगतीनें। शीघ्रचि भेटे अनंत ॥ २ ॥

## पद २०

( राग–मुलतानी जिल्हा. ताल–दीपचंदी. )

दावा दावा गे माणिक"".। त्याविण व्यर्थ ही जाते काया ॥ धृ० ॥ कंठीं शोभे कौस्तुभ मणी। मीन कुंडल झळकति कर्णी ॥ १ ॥ योगी ध्याती जया दिनरात्र। करीं शोभतसे दारुवेत्र ॥ २ ॥ म्हणे वेगीं आतां मनोहर। दाखवा वेगें बयाकुमर ॥ ३ ॥

## पद २१

( राग–मुलतानी जिल्हा. ताल–दीपचंदी. )

ध्या त्या माणिकप्रभुच्या पाया। चित्त भ्रमवूं नका तुम्ही वाया ॥ धृ० ॥ द्विजसुताची पाहुनी भक्ति। ग्रंथरूपें सांगुनी निज युक्ति। लावुनियां स्वीय पदा ऽऽ सक्ति। दिधली हो तयालागिं मुक्ति ॥ १ ॥ अबला एक वैश्यजा। चित्तीं चिंतूनियां मोक्षकाजा। शरण आली सद्गुरु महाराजा। मोक्ष दिधला काढुनी अहंलज्जा ॥ २ ॥ शूद्रका इतुका बहुवेळा। काहीं नेणें एक भाव रोकडा। तयावरि आला स्नेहओढा। दिधलें अखंड स्थान सोडुनि भववेडा ॥ ३ ॥ द्विजकन्येच्या भावबळें। कपर्दिकेसी पुत्र दिले। बहुतां मृत्युभय चुकविलें। मनोहर म्हणे वानितां वेद थकले ॥४॥

## पद २२

( राग–काफी. ताल–दीपचंदी. )

कां न दया येत आतां। माणिका अवधूता ॥ धृ० ॥ मुक्ताफळ हार कंठींचा शोभे। कटकादि घातले हाता ॥ १ ॥ शुभ्रवसन तें दैदिप्य भासे। मृगमद चर्चिलें माथां ॥ २ ॥ मनोहर म्हणे जगतामाजिं। कोणी दुजा नसे त्राता ॥ ३ ॥

## पद २३

( राग–काफी. ताल–धुमाळी. )

पंचमहापातकी वरा । त्याहुनि अधम मी खरा ॥धृ०॥ शरण आलों सुखकरा । ये झडकरीं दीनोद्धारा । तूं दावि आतां निजसुखा ॥१॥ नेति नेति नेतीति वस्तु ती । निगमागमादि गर्जति । तव पदा नेई प्रार्थी । मनोहर माणिकाप्रति । मां पाहि जगन्नायका ॥२॥

## पद २४

( राग–तिलककामोद. ताल–धुमाळी. )

कोठें गेला प्राणनाथ । धुंडूं कवण्या काननांत । मांडिला हो प्राणांत । कधिं भेटेल माझा कांत। सांग गे साजणी ॥धृ०॥ फिरल्यें मी वहुत फेरी। त्रासल्यें हो या संसारीं। कोणी मम नाहीं कैवारी। शांति येईल केंवि अंतरीं। सांग गे० ॥ १ ॥ जन्म जातो हा वाया। बहु शिणविली काया। परि चुकेचि ना माया। कधिं पाहीन कांतपाया। सांग गे० ॥२॥ नयन वाट पाहती। दैन्यें दीनवाणी भाकिती। थकली हो मनोहरमति। आतां कधीं पाहिन माणिक मूर्ति। सांग गे० ॥३॥

## पद २५

( राग–( अभंग. ) ताल–धुमाळी. )

येई येई ग माणिक आई। तूं माझे आई ॥धृ०॥नेणें धर्मासी कर्म ओढ । वाटे विषय अति गोड ॥ १ ॥ काळ कंदर्प शरीरीं । मृत्यु मारी भरारी ॥ २ ॥ जन्ममरण तापत्रय । मोहित मी मायामय ॥ ३ ॥ वृत्ति विलयासी जाईना । रक्षी मनोहर दीना ॥ ४ ॥

## पद २६

( राग–पिलु. ताल–दीपचंदी. )

आतां दाखवी साजणी गे मजला। कांत माणिकप्रभु सद्गुरुला ॥ धृ०॥ चैन जिवा पडेना त्यावांचुनी । काय सार्थक त्याविण वांचुनी ॥ १ ॥ मज माझें कळेना मी कोण। चित्त भ्रमलें चुकलें माझें स्थान ॥ २ ॥ म्हणे मनोहर माझिये मना । सद्गुरुवांचुनी शांति येईना ॥ ३ ॥

## पद २७

( राग–झिंझूटी. ताल–धुमाळी. )

सख्या माझ्या माणीकाला कोणी तरी दावा ॥ धृ० ॥ जो कां सच्चिनंद-रूपींचा हो ठेवा । निशिदिनिं ध्यातों परि भेटेना कदावा । मजसंगें ऐसा त्याचा काय आहे दावा । दर्शनावांचुनी न शमे हृदयींचा दावा ॥१॥ त्रिभुवनानंद नाम आहे तुझें देवा । मग मी एकला कां वा न तुष्ट व्हावा । पतितोद्धारक ब्रीदा राखी वासुदेवा । येई येई येई आतां सख्या गुरुरावा ॥ २ ॥ निजरूप मनोहरदासालागिं दावा । झडकरि येऊनी पुरवी माझ्या मनोभावा । आतां कोठें गुंतलासी जगन्नाथ देवा । सदा माझ्या हृदयामाजीं पदकंज ठेवा ॥ ३ ॥

## पद २८

( राग–देस. ताल–धुमाळी. )

मना लाग रे गुरुपायीं । तयावांचुनी सद्गति नाहीं ॥ धृ० ॥ जीवेश्वर द्वैताद्वैताची कडसणी । निरसुनि भवऔषधातें देई ॥ १ ॥ मनोहर म्हणे श्रीगुरुच्या कृपेनें । देहभान नुरेचि कांहीं ॥ २ ॥

## पद २९

( राग–परज. ताल–त्रिताल. )

अरे गुरुपदपंकजीं लीन होई रे । तुझा जन्म व्यर्थ जाणुनी रत होई रे ॥ धृ० ॥ शीघ्र जावें हरिगुरु चरणा । मनोहर म्हणे मग येईल करुणा ॥ १ ॥

## पद ३०

( राग–जोगिया. ताल–धुमाळी. )

गुरुच्या उपकारा उपकारा । नाहीं पारावारा ॥ धृ० ॥ केली इंद्रियपटुता । दिधली मनीं जाणिवता ॥ १ ॥ गर्भीं रक्षण केलें । हे नरतनु तया दिधले ॥ २ ॥ मनोहर म्हणे असें असतांहि । त्या न भजे तत्सम कृतघ्न नाहीं ॥ ३ ॥

## पद ३१

(राग–झिंझूटी जिल्हा. ताल–त्रिताल.)

श्रीगुरुराया माणीका । योगीराजा जगद्व्यापका ॥ धृ० ॥ भक्तकार्य कल्पद्रुमा । नमो गुरुसार्वभौमा । अद्वैता पुरुषोत्तमा । निरालंबा निरुपमा ॥ १ ॥

## पद ३२

(राग–परज. ताल–त्रिताल.)

श्रीमाणिकनाम वदा रे । न बाधिच कदा आपदा रे ॥ धृ० ॥ अज्ञान हें माजलें बहु । मी तूं भिदा मनोहर म्हणे ज्ञानप्राप्तीस्तव रत व्हा त्याच्या पदा ॥ १ ॥

## पद ३३

(राग–भैरवी. ताल–दीपचंदी.)

माणिकप्रभुवर नामासी ध्या । न तुलती वेदादि प्रतापासी ह्या ॥धृ ०॥ सुरवर ऋषिगण गंधर्वादिकां । त्रिभुवनीं सर्व मनोरथ पूरका । भक्तमनोरथ कल्पतरू । मनोहर म्हणे एक हा श्रीगुरु ॥ १ ॥

## पद ३४

(राग–परज. ताल–त्रिताल.)

तुम्हीं माणिकपायीं लागा हो । तुम्ही रामा रामा गा हो ।।धृ०।। तुम्ही नामाचा मोह त्यागा । मनोहर म्हणे अपवर्गा । दे यत्पदच्युतगंगा ॥१॥

## पद ३५

(राग–खमाज. ताल–त्रिताल.)

श्रीमाणिक मंत्र स्मरा स्मरा रे । जन, स्मरा विस्मरा रे ॥धृ०॥ एक्या ठायीं स्थिर करुनि मन । निशिदिनिं ध्यान धरा रे ॥ १ ॥ तोडुनी भवबंध आनंदानंद । सुखकंद खरा रे ॥२॥ केले मुक्त मनोहर वत्सा । नेलें हो निजधरा रे ॥३॥

## पद ३६

(राग–खमाज. ताल–धुमाळी.)

प्रभु तो आहे समर्थ। कां करितां चिंता व्यर्थ ॥धृ०॥ त्यागुनि गृह सुत कांता। सर्वंहि संचित हो निज अर्था। मनोहर म्हणे शरण आलीया। पुरवितो मनोरथा ॥१॥

## पद ३७

(राग–खमाज. ताल–त्रिताल.)

घे रे मना विषयांपासुनी मोड। लागो तुज माणिक नाम बहु गोड ॥धृ०॥ विपरीता चरणीं रत हें बहु। लागली तुजसी खोड ॥१॥ परस्त्री धन सुत वास्तव मीपणीं। करिसी अतिशय झोड ॥२॥ श्रीगुरुभक्ति वैराग्य साधनीं। ठेवी अंतरांत ओढ ॥३॥ निशिदिनिं मनोहर प्रभुपद युगुला। लागीं तूं कर जोड ॥४॥

## पद ३८

(राग–झिंझूटी. ताल–धुमाळी.)

वा रे आतां वृत्ति लावी माणीकाच्या पाया। निरर्थक जाते तुझी घडो-घडीं काया ॥ धृ० ॥ जो कां दारूवेन्नधारी जगीं त्याची माया। मनोहर म्हणे मना नको धावूं वाया ॥ १ ॥

## पद ३९

(राग–खमाज. ताल–त्रिताल.)

दाता तूंचि माणिकप्रभू मम नाथ ॥ धृ० ॥ स्वसत्ते जड तनु ही चाळवी। नसुनि असे सर्वांत ॥ १ ॥ भू जल तेज समीर ख मन धी। अहंकृति पेरवी त्यांत ॥ २ ॥ मनोहर म्हणे नेति नेति। वाखाणी वेद जगांत ॥ ३ ॥

---

## श्रीसरस्वतीवरील पदें

### पद ४०

( राग–परज. ताल–त्रिताल. )

श्रीविद्या ललिता मम माता ॥ धृ० ॥ अजा पुराणी चतुष्कपदें त्यादि। गाति वेद गाथा ॥ १ ॥ माणिकदास मनोहर विनवी । जी जगत्प्रभु कांता ॥ २ ॥

### पद ४१

श्रीविद्ये ललिते हर दयिते ॥ धृ० ॥ मनोहर म्हणे श्रीमाणिक प्रभे । करी कृपा मम माते ॥ १ ॥

### पद ४२

( राग—परज. ताल—धुमाळी. )

आम्हां तीच गति श्रीभगवति ॥ धृ० ॥ जीच्या चरिता अष्टादश आणि सहा चारी गाति ॥ १ ॥ कामराज बीज जपे नृप । पावला स्त्री स्वक्षिति ॥ २ ॥ मनोहर म्हणे श्रीमाणिकप्रभुची । जी इच्छाशक्ति ॥ ३ ॥

---

## श्रीशंकरपर पदें

### पद ४३

( राग–जोगिया. ताल–धुमाळी. )

तारी तारी रे शंकरा। परमपुरुषा परमेश्वरा ॥ धृ० ॥ पंचवदना नागेंद्रभूषणा । पार्वतिरमणा गंगाधरा ॥ १ ॥ नाशनमदना भवभयहरणा । नरसिंहात्मज रक्षणा दीनोद्धारा ॥ २ ॥

### पद ४४

( राग–काफी. ताल–दीपचंदी )

शिव शिव शंभो शंकरा। दीनोद्धारणा अघहरणा ॥धृ०॥ हर हर देवा ईश्वरा । करि करुणा पुरदहना ॥१॥ भवभव विभव त्रिनेत्रा । व्यालभूषणा भवहनना ॥२॥ शिव शिव शर्वा प्रभो सुकरा । दावी चरणा विषभक्षणा॥३॥ आतां मनोहरा गुरुमाणिकाच्या दीना । पाही दिग्वसना ॥ ४ ॥

---

# श्रीकृष्णपर पदें

## पद ४५

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. )

भामा रामा अनुदित कामा सुभ्रू सुंदरवामा। अरुणललामा बोलतां म्हणती छळूं नको भीमकी भामा ॥धृ०॥ सत्या नाम असत्या वाटे वृत्या कृत्या मज भासे। अन्या धन्या कोण ती कन्या त्रिभुवनीं ऐसी मान्य असे ॥१॥ काया वाचा मायाविनी तूं वाग्बाणें वेधिसी। काय हरीला प्रिय तुं एकटी मृगभटकटी वदे ऐसी ॥२॥ मग ती बोले राजकुळीं त्वां जन्मुनि छळिले बंधु। चौर्यें आणिलें ऐसे हरिला व्यर्थ जनीं अपवादू ॥३॥ पितृघातिनी दारिका ऐसी हृद्दारिका निपजली। ठावें मजला एक्या मण्यास्तव भिऊनि पित्यानें दिली ॥ ४ ॥ बहुत तप आचरोनि मिळविलें माझ्या मी प्राणेशा। चंचल चपला तुजवरी भूवरी बहुतांची गे आशा ॥५॥ मदर्थ सिंधू शोधुनि काढुनि मज हरी अंगिकारी। तूं प्राप्त झालिया दान देसी ऐसी कैसी गे नारी ॥ ६ ॥ मग हरी येउनि सांतवन करी दोहींच्याहि चित्ता। अग्नि सूर्य दाहातें शमवी जेंवी सजला घनता ॥ ७ ॥ मौक्तिक हारीं माणिकप्रभुच्या पदीं रता हो ह्या वदल्या। सत्यलोकपति कुमरी थकली चरितातें या लिहाया ॥ ८ ॥

## पद ४६

( राग—पिलु. ताल—दीपचंदी. )

धांव धांव रे पांडुरंगा। ज्याच्या पदीं शोभति गंगा ॥ धृ० ॥ भीमा-तटनिवासा कमलेशा। जगदुद्धरा जगन्निवासा। गोविंदा परमेशा। परात्पर भक्तजनरक्षका परमेशा ॥ १ ॥ तूंचि नौका भवाब्धितरंगा। उदरा घेतले हे ज्यानें अनंगा। केशवा माधवा नारायणा। तूंचि रक्षक मनोहर दीना ॥ २ ॥

---

# वेदांतपर पदें

## पद ४७

(राग–काफी. ताल–त्रिताल.)

मन हें बहु अनिवार । काय करूं यासी न लागे थार ॥ धृ० ॥व्यर्थचि जन्मुनि बहु श्रमतों परि । गुरु भजनीं अस्थिर । मनोहर म्हणे श्रीमाणिक कृपेविण । न पावे हा निर्धार ॥ १ ॥

## पद ४८

( राग–(अभंग.) ताल–धुमाळी. )

आम्ही नव्हेचि आमुचा देह । आम्हां कैंचा आत्मस्नेह ॥ धृ० ॥ भावाचाहि भाव जेथें ज्ञानाचें ज्ञान । गुरुविण आम्हां नसे त्याचें भान ॥ १ ॥ प्रकृतीची प्रकृति कृती क्रियेविण । स्थिर चिरकाल असे छिन्नभिन्न ॥ २ ॥ म्हणे मनोहर श्रीमाणिक संगतीचा । उदयासि आला लाभ स्वयंज्योतीचा ॥ ३ ॥

## पद ४९

( राग–( अभंग. ) ताल–धुमाळी. )

तोचि मूर्ख जाणावा सत्य रे । ज्ञानाविण म्हणे झालें मत्कृत्य रे ॥धृ०॥ जेणें बुडतो या संसारीं । तेचि जिंकलों नाहीं सहा अरि ॥ १ ॥ चित्त नाहीं विलया नेलें । नाहीं देखिलें ठाव आपुलें ॥ २ ॥ आपली आपणातें भूल पडली । व्याघ्रें श्वानासवें श्वानता मानिली ॥ ३ ॥ मनोहर म्हणे मना ऐसें नको करूं । माणिक पदीं लागुनी होई भवपारू ॥ ४ ॥

## पद ५०

( राग–खमाज. ताल—धुमाळी. )

अहो तुम्ही त्यागा हा अभिमान ॥ धृ० ॥ माझे चाकर मीच पोषक । मी यांचा यजमान ॥ १ ॥ देतो कोण कुणासी कोठुनी । आपणचि

कर्माधीन ॥ २ ॥ मी याचा हे माझे आप्त। मूर्खपणें म्हणणें ॥ ३ ॥ मनोहर म्हणे श्रीमाणिकावांचुनी । जीवा तारक कोण ॥ ४ ॥

पद ५१

( राग--यमन जिल्हा. ताल–दीपचंदी. )

भ्रम गेल्या जाण ब्रह्म होशी रे ॥ धृ० ॥ भ्रमनाशक एक गुरुपाय । म्हणूनि भजावा तो सर्व उपाय ॥ १ ॥ 'अहं ब्रह्मास्मि' याची होय स्फूर्ति । कोऽहं भ्रांति गेल्या जीव होसी ॥ २ ॥ आतां माणिक मनोहर भाव । माणिक कृपेनें आला अनुभव ॥ ३ ॥

पद ५२

( राग–पिलु जिल्हा. ताल–दादरा. )

दत्ता अवधूता भेट देई त्वरिता रे ॥ धृ० ॥ सच्चिद्धन स्वरूपा अनसुयानंदना । अत्रियाच्या सुता ॥ १ ॥ निरंजन निर्गुणात्मिका। तूंचि मनोहर यासी त्राता ॥ २ ॥

पद ५३

केला व्याप व्यापक सर्वांभूतीं । म्हणे मनोहर माणिकमय कांति ॥ १ ॥

पद ५४ (अष्टक)

अत्रिपुत्रका ब्रम्हरूपका । अनामनामका सत्यशक्तिका । आनंदात्मका चिच्छरीरिका । भज तूं माणिका भक्तपालका ॥ १ ॥ अत्रिनंदना दैत्यनाशना । पद्मलोचना देवरक्षणा । अगाधकीर्तिका धरणिधारका । भज तूं० ॥ २ ॥ दंडधारका युग्मनेत्रका । भानुकोटितेज प्रभाधिका । भक्तहृत्सरोजाग्रवीजका । भज तूं० ॥ ३ ॥ निगमस्थापका धर्मपालका । सृष्टिनायका वृष्टिवर्षका । पादसंश्रितालागीं तारका । भज तूं० ॥ ४ ॥

त्रिगुणरूपका त्रिगुणहारका । त्रिगण कारका त्रिगणभाविका ।
हरिहरेश तूं लोकनायका । भज तूं० ॥५॥
द्रुहिणरूपका । सृष्टिकारका ! विष्णुरूपका सृष्टिपालका ।
रुद्ररूप तूं लोकहारका । भज तूं०॥६॥

द्वैतहारका भवविदारका । नतजनस्वपादाब्जदायका ।
शिवजिवैक्यत्व प्रदायका । भज तूं० ॥७॥
भक्ति मुक्ति चित्सुखाब्धि दायका । अनिर्वाच्यका आद्यरूपका ।
मनोहराख्य नैजदासरक्षका । भज तूं० ॥८॥

## पद ५५ (अष्टक)

भक्तपालका दैन्य नाशका । पापदायका जगन्नाथका ।
अनंतकोटि ब्रह्मांड नायका । नुपेक्षी मला दत्तमाणिका ॥१॥
अजामीळ पापीहि तारिला । द्रौपदी गजेंद्रासी धांवला ।
नरहरी मिषें स्तंभिं प्रगटला । कां उपेक्षिसी माणिका मला ॥२॥
अत्रिमुनि तपा करि सुदारुणा। दाविलें तया प्रेमरूपणा ।
दत्त होउनी देसि दर्शना । कां उपेक्षिसि व्यर्थ या दिना ॥३॥
ऐक्यतागुणें स्तवन ऐकतां । म्हणसि हे तिघे एक तत्त्वता ।
तीच मानिली शीघ्र पुत्रता । कां उपेक्षिसी माणिका आतां ॥४॥
प्रगटसी तिथें दत्त होउनि । भक्त तारिले भक्ति लावुनी ।
भक्त आर्ति तूं दवडिसी क्षणीं । माणिका तुझा दास हा गणी ॥५॥
नगरपीठ श्रीमती सतिकुशीं । स्वामि श्रीपाद तूंचि प्रगटसी ।
रजक मूर्धाभिषिक्त करविसी । माणिका मला कां उपेक्षिसी ॥६॥
नगर करंजीं अंबिका कुशीं । नरेंद्र भारती तूंचि प्रगटसी ।
द्विजज जाहला प्रतिबृहस्पति । मजसिं माणिका कां उपेक्षिसी ॥७॥
मनोहरात्मजा कल्याणकारका । प्रगटिसी स्वयें दत्त माणिका ।
बहुत तारिले पदरजःकणीं । रक्षि मनोहरा रूप दावुनी ॥ ८ ॥

## पद ५६

( राग—झिंझूटी. ताल—दीपचंदी. )

गुरु माणिक जगदंतरिं भरला । त्याविण किंचित् स्थळ नाहीं उरला ॥ धृ० ॥ पृथ्वी असे आपीं वसे तेजीं तेणें तेज असे । वायु असे आकाश व्यापुनि उरला रे ॥ १ ॥ असे घटीं वसे मठीं असे महदाकाशीं । विकासे चिदाकाशींच राशी रे ॥ २ ॥ भक्तकार्य कल्पवृक्ष सुरनरांचे पुरवी कांक्ष । मनोहरदास विनवी श्रीप्रभु चरणां रे ॥ ३ ॥

## पद ५७ ( अष्टक )

श्रीकरनखा कोटिचंद्रिका। जेंवि शोभती ग्रंथचंद्रिका। कोमलांगुली पाद पद्मिका। मानसीं सदा ध्यायि माणिका ॥ १ ॥ जानु जान्हवी जंघ मानवी। अंक-हीनवी अर्क हीनवी। लाजवी कटी कारसिंहिका। मानसीं सदा०॥२॥ निम्ननाभिका त्रिवलि शोभिका। पीनवक्षका श्रीवत्सलक्ष्मका। जानु हस्तका कंबुकंठका। मानसीं सदा० ॥ ३ ॥ मंद हास्यका सरळ नासिका। भालपट्टिका शोभितालका। दधिमधुपयामृतादिस्नातका। मानसीं सदा०॥४॥ शुद्ध न्हाउनी केशधूपिका। केशरांचिता गंधचर्चका। पीतपटकटीं ब्रह्मधारका। मानसीं सदा० ॥ ५ ॥ ठेविसी करीं कामधेनु ही। सेवनी प्रिया तांबुलासहि। सर्वभूषणा पूर्णभूषका। मानसीं० ॥ ६ ॥ मुगुट मस्तकीं कंठिं कौस्तुभा। मेखला कटीं मुद्रिका शुभा। कर्णि कुंडलें पादरंजिका। मानसीं सदा०॥ ७ ॥ भुवनसुंदरा श्रीमनोहरा। भक्तकामना पुरविसी त्वरा। ध्यानकारका ब्रह्मरूपका। मानसीं सदा० ॥ ८ ॥

---

# हिंदुस्थानी पदें

## पद ५८

( राग—यमन. ताल—दादरा. )

उसका ही भाल बडा है। नहिं विधीको बरनन जाय ॥ धृ० ॥ मानिक नामका प्रताप। सुनो जो करे इस जाप। सोहि हुवा सुखरूप। उसकुं मिला ब्रह्मरूप। वही पाया आपकुं आप। उसकुं देखत धर्म भूप। होवे हृदय बीच काप। उसके सिरवकु भव सांप। नहिं उसे जानो आप। उसके दर्शन त्रय ताप नसे। जारे सबहि पाप। क्या कहूं रूप अनूप ॥ १ ॥ मानिक चरननकी धूल। परी जिनके शिरकमल। उसकु भई बपुभूल। चित्त भया बहु विमल। जन्म भया तिनका सफल। उस गरे परी मुक्तमाल। तुटा संसृति जंजाल। गया मायामोहमल। उसकु वंदे सुरपाल। और कांपे वह काल। भये षड्रिपु येहि विकल। होते साधुजन सुखल। कहे मनोहर गुरुबाल ॥ २ ॥

### पद ५९

( राग–जोगीया. ताल–दीपचंदी. )

गुरु मानिकके पग लाग रे ॥ धृ० ॥ काम क्रोधकु छांड दीजियो। मुखसे नामको लीजियो। मनोहर कहे नरतनु मत खोयियो। त्यजियो दुर्जन संग रे ॥ १ ॥

### पद ६०

( राग–काफी. ताल–दीपचंदी. )

नरतनु व्यर्थ गमाई। नहि धूंडा अपना मानीक सांई ॥ धृ० ॥ गंगा गोदा जमुना कृष्णा। सब तीरथको न्हाई ॥ १ ॥ देवपूजा ऋपि सेवन कीन्हियो। मन कछु निर्मल नाहीं ॥ २ ॥ मनोहर कहे मानिक चरनन-विन। सार्थक कछु नहिं भाई ॥ ३ ॥

### पद ६१

( राग–यमन जिल्हा. ताल–पंजाबी. )

सियां देखी हिया हारक रघुवीर ठैरत ठैरत जब निकसी। मधुर मधुर पैंजनियां वाजे। राजीवनयना विजलीसी ॥ धृ० ॥ मुखकी सोभा कोटि ससि सम। नथकी झुमकी सतकवीसी। अधर आरक्त प्रवालवल्ली जूं दंत कुंदकी कलि जैसी ॥१॥ गले हार मोतियनका झलके कुच गुच्छ जुगुलपर जो बासी। मनोहर मानिकदास कहे सुन जगन्माता जानकि ऐसी ॥२॥

## दोहरे

### ६२

किसकु क्या जाने धुंद। कहे मनोहर मानिकमो मगन आपी अपको अंध ॥ १ ॥

### ६३

मानिक चरननको लय लागो नर। जाय मुक्तिको कहे मनोहर ॥ २ ॥

---

## उर्दू पदें

### पद ६४

इस वजूदके लिये मै बेवजूदहूं। चाहे सो करो अब मैमौजूद हूं ॥ १ ॥ कोई चढावो गुल अत्तर कोई उडावो खांक। कोई करो सना

गिला मैं असवजूद हूं ॥ २ ॥ मनोहर कहे ये सरको तनसे जुदा करो। हमारे दत्तापे आज फिलफोर मौजूद हूं ॥ ३ ॥

### पद ६५

( राग–झिंझूटी. ताल–दीपचंदी. )

रूइ पुरनूर आज देखा मैं यारका । जानो गोला माहे आफताब सद अंगारका ॥ १ ॥ दीन दुनियाके हजारों तमाशे । समजा है क्या पैदा वहांले ॥ २ ॥ मानिक बंदा देख वजूदकु भूलगया । अब परवा नहीं है आपकी, बहाना हो गया ॥ ३ ॥

### पद ६६

( राग–देस. ताल–धुमाळी. )

या महबूब सुबहानी । कर मुष्किलको आसानी ॥ १ ॥ अली महंमद अवलादे अली । शेख कादर जीलानी ॥ २ ॥ हबीबुल्ला हुताला तूं । गौस समदानी ॥ ३ ॥ हसन बिन मुसन्ना तूं । कुतुब रब्बानी ॥ ४ ॥

### पद ६७

( राग–जोगिया मांड. ताल–दीपचंदी. )

जो कोई आपको भूलगया । सो क्या खुदा जाने ॥ १ ॥ जिसकु इष्क आब शराब नदिन पासाकी । जानो उस भेदसेहि राह रहगया की ॥ २ ॥ मानिकके दर्का खांक बरदार कहे ह भाई । ये जिनसे पाया सोहि समझे और न जाने कोई ॥ ३ ॥

---

### पद ६८ ( आरति )

जयदेव जयदेव जय जय गुरुभूपा । आरति ओवाळुं तुज सच्चिद्रूपा ॥ धृ० ॥ भक्ति स्नेह सद्गुरुवाक्य हे वर्ति । पात्र सोज्वल केलें निज चित्तवृत्ति । त्यांत लावोनियां सुज्ञान ज्योती । पाजळली श्रीगुरु माणिक प्रभुमूर्ति ॥ १ ॥ सत्यज्ञानानंत- सकलांतरवासी । सर्व स्वरूपें गाती निगमागम तुजसीं । भक्तमनोरथपूरक तूं एक असती । दास मनोहर ठेवी निज पायापाशीं ॥ २ ॥





श्री

# मार्तंड माणिकप्रभु

## महाराज

यांचीं पदें

॥ श्री ॥

# पदांची क्रमवार सूची.

## ॥ श्रीगुरु अवधूत ॥

### पद १

( राग–पिलु. ताल–धुमाळी. )

किति दैव सुकृत हें फळलें । अजि म्यां परमामृत प्यालें ॥ धृ० ॥ बसवुनी सन्मुख अवलोकुनियां । मानाभिमाना सोडविलें ॥ १ ॥ ज्ञानरूप मार्तांडप्रभूसी । सार्व काल मज जोडविलें ॥ २ ॥

### पद २

( राग–भैरवी. ताल–पंजाबी. )

मज हें संत दयेचें देणें । मज हें साधुदयेचें देणें ॥ धृ० ॥ सत्स्वरूपी सहपंचभूत मी । जग मिथ्या अनुभवणें ॥ १ ॥ तुच्छ अनिर्वचनीय ही माया । स्वरूपीं असंभव पाहाणें । नामरूपमल वस्त्रां फेडुनी । आकाशाचें घेणें ॥ २ ॥ स्वानुभवें जाणिव गाळुनी । निजवस्तूचें घेणें ॥ ३ ॥ ज्ञानरूप मार्तंड प्रतापें । स्वरूपीं स्वरूपच पहाणें ॥ ५ ॥ मज श्रीगुरु घरींचें देणें ॥ धृ० ॥

### पद ३

( राग–जोगिया. ताल–धुमाळी )

आम्ही जाऊं चला आम्ही पाहूं चला । गुरुराज प्रगट अवधूत आला । बोलुं चला आणि प्रार्थुं चला हा । निर्विकल्प सविकल्पीं आला ॥ धृ० ॥ घेति पत्र पुष्प फल जळ गंध मणि मोतीं । आणि नटुनि म्हणती आतां पाहूं चला । शीघ्र चला अति शीघ्र चला । हा निर्विकल्प० ॥ १ ॥ कोणि हार तुरा मौक्तिक गजरा रत्नकटक मुगुट शिरीं घालुं चला । मागूं चला धन पुत्र सुख । हा निर्विकल्प० ॥ २ ॥ कोणी मागे गुजमंत्र योग ज्ञान ध्यान तंत्र । नको जन्म परतंत्र । पदीं रमूं चला । ज्ञानरूप मार्तंड गुरु । हा निर्विकल्प० ॥ ३ ॥

## पद ४

( राग—जोगिया. ताल—धुमाळी. )

प्रभुला कोण आवड, नावडता। अवघे जन हे भजती स्वहिता ॥ धृ०॥ काय अजामिळें उत्कट तप केलें। किति तो सुदामा धनवंत । कोण गजेंद्र तो वेदार्थज्ञाता। काय बिभीषण कुलवंत ॥ १ ॥ गोकुळींचे जन किती योगाभ्यासी। किती त्या गोपिका महंत । मार्तंडप्रभु तुझी निजलीला ही अनंत ॥ २ ॥

## पद ५

( राग—तोडी. ताल—त्रिताल. )

विबुधचंद्र गुरुबाप माझा। भवहरणा करुणामृतधर। तव दयावृष्टीनें त्राहि। माझा विबुधचंद्र० ॥धृ०॥ बोधवाक्य झंझापवनें श्रम। मोहवन्हि हा लोपवी तोषवी बाप माझा॥ १ ॥ स्वरूप चिन्मार्तांड अढळपदीं। अवाच्य मौनामौन बैसवी बाप माझा ॥ २ ॥

## पद ६

( राग—मुलतानी. ताल—धुमाळी. )

येईं येईं श्रीमाणिका भक्तजनपालका ॥ धृ० ॥ या हो मुनिमानस हंसा। कृष्णा तूं दारक भवकंसा। खलगज पंचानन वेषा । आठवी त्रीदा आदिपुरुषा। कां रे उपेक्षिसी आम्हां। कीं श्रमलासी भक्तकामा । सखया दीनजननीजनका ॥ १ ॥ कवणें हो गर्भीं रक्षियलें। मातें संकटीं सोडविलें। प्रथम हो अंगिकारियलें। कां मग शंकित मन केलें। विश्वस्रष्टा तूं सकलज्ञाता। न जाणो आमच्या संचिता। भक्तसौभाग्य सुरपालना। करुणालया जगजीवना। सदया अद्य अवगुणनाशका ॥ २ ॥ मुक्तजनपंकज तरणी। या हो त्वरित वेत्रपाणी। श्रीवयाकलागर्भचंद्रा। मनोहर धनत्रय देवेंद्रा। हनुमदनुज नरहरिरूपा। प्रिय श्रीमनोहर गुरुभूपा। मोह मणिमल्ल मार्तांडा। प्रभु तूं पोषक ब्रह्मांडा। सच्चिदानंदा तमहारका ॥३॥

### पद ७

( राग–पीलु. ताल–धुमाळी. )

कुणि आणा हो भक्तसखा तो आणा। दीनप्रभु तो आणा। चैतन्य देशिंचा राणा। आनंद देशिंचा राणा॥ धृ०॥ जन भुलला हो निज मायेनें भुलला। महाविषय मृगजळीं बुडला। या पंचभूतां सत्य कल्पुनी रमला। बहु जन्म जन्मुनी गेला॥ १॥ मोहशक्तीनें, मोहवैऱ्यानें, जीवा घातचि केला। प्रिय स्वस्वरूपा हो मुकला। जन स्वस्वरूपा हो मुकला। जगउपकारा जाउनि त्या श्रीचरणां। जन उपकारा जाउनि त्या श्रीचरणां। या भवदुःखा वाखाणा॥ चाल॥ कोणि विश्वां हित-गुज सांगा। मी देह बुद्धि ही त्यागा। मी जीव बुद्धि ही त्यागा। जा सच्चिदानंद पदीं लागा। ज्ञानमार्तांडा दिव्यदृष्टीनें जाणा। आत्म-दृष्टिनें जाणा। जग ब्रह्म हेंच मनिं आणा॥ २॥ कोणी०॥

### पद ८

( राग–जोगिया. ताल–धुमाळी. )

माणिका येई माणिका येई। प्रियनामा सच्चिदानंद–धामा॥ धृ०॥ आत्मा स्वच्छंदें नाचविसी। जग मायिक भासविसी। करुनी कर्मातें उपनिषदें। अलिप्त तूं बोलविसी। स्फूर्णवाणीतें प्रेरविसी। अनिर्वाच्य तूं असती॥ १॥ तत्पद ईश्वर तूं क्रीडाया। एकचि बहुधा होसी। आपणां विलोकुनी अति हर्षें। सर्वंही आपणचि होसी। प्रवेश करूनियां निजसत्तें। दृश्य जडां चेतविसी। नामरूपातें दावुनियां स्वस्वरूप लोपविसी॥ २॥ विनोद तुझा हा बहुरूपें। भक्तिबळें अवतरसी। देउनि पदसेवा निजसदनीं। आनंदें नांदविसी। ज्ञानमार्तांडा द्योतविसी। निर्विकार सुखराशी॥ ३॥

### पद ९

( राग–छंद. ताल–धुमाळी. )

पहा किति दैव उघडलें आमुचें। देखिलें रूप श्रीप्रभुचें॥ धृ०॥ हा विश्वरूप गिरिधारी। निजकृपें जीव हे तारी। ही साय जगां उपकारी। अति संकट सर्वंहि वारी। मी सकलमतस्थापक हें गाजवी ब्रीदहि पाही

॥ १ ॥ अहो चला चला आम्ही जाऊं। डोळ्यानें रूप हें पाहूं। श्रीहस्तें प्रसाद घेऊं। मग जन्मवरी सुखी राहूं। पूजनें धन्यता लेवूं। स्वस्वरूप-सुख घेऊं ॥ २ ॥ हा सगुण देह श्रीगुरुचा। मग पहाया न मिळे साचा। हा कंद निजानंदाचा। ज्ञानरूप मार्तांडाचा ॥ ३ ॥

### पद १०

(राग–वसंत. ताल–त्रिताल.)

झालों आम्ही बहु धन्य। भेटलें सगुण हें ब्रह्म ॥ धृ० ॥ नको उदास स्थिति ती मुक्ति। ही माया आम्हां प्रिय भक्ति ॥ १ ॥ महावाक्य नको हें आम्हां। घेऊं तुझ्या सुमंगल नामा ॥ २ ॥ नको वियोग तुझा देवा। जन्मजन्मीं घे तुझी सेवा ॥ ३ ॥ तूं जीवन या ब्रह्मांडा। तूं प्रकाश चिन्मार्तांडा ॥ ४ ॥

### पद ११

(राग–अल्हैया बिलावल. ताल–झंपा.)

श्रीगुरु माणिक जय गुरु माणिक। हाचि गुरुउपदेश मुख्य आम्हां ॥ दान व्रत यज्ञ हे स्नान गंगा। सोमपान मधुअमृतरस सेवुं, सेवुं नामा ॥ धृ० ॥ पुण्य जय सत्कीर्ति दक्षिणोत्तर मार्ग हेचि। अमनस्क हट तारकादि। ज्ञान हें ध्यान हें, महावाक्य भजन हें, भक्तकल्पद्रुमा सार्वभौमा ॥ १ ॥ क्षेत्र माणिक मंत्र तीर्थ संगम दाल, भिक्षान्न अवधूत भजन द्या देवा। बोध हा मार्तंड विश्वहृदयीं वसो जन्मजन्मीं हेंचि दान द्या देवा ॥ २ ॥

### पद १२

(राग–अरभि. ताल–धुमाळी.)

विसरूं जरि या चरणा हे प्रभो, तरि द्यावें मरणा, हे प्रभो। देह पडो दुर्मरणचि येवो, न करूं तव स्मरणा, हे प्रभो ॥ धृ०॥ शतमख जरि केलों विधिने; वेद स्तविजेलों विधिनें। धीश सुरेश महेशहि झालों, परि पावो पतना, हे प्रभो, जरि न करूं नमना ॥१॥ परसिद्धचा वळल्या आपणचि, गरूपद मज आलें आपणचि। योग जळो आणि ज्ञान जळो तें, जो न करी भजना, झडूं दे ती रसना ॥ २ ॥ रौरव नरक घडो या देहींच सुखि,

बहु कृमि पडो या देहींच । निंदा जरि करूं निजगुरुस्थाना । आणि डोलवूं माना, हो करी नरककूप कानां भो हरि ॥ ३ ॥ टाकुनि गुरुमंत्रा कुमतिनें, पूजूं सुरयंत्रा सुमतिनें । माणिक माणिक हा जप सोडुनि, आणिक धरूं ध्याना । न्यावें यमसदना, हे प्रभो ॥ ४ ॥ सेवक हा तुमचा, हो प्रिय, बोला मुखें, 'आमुचा हो प्रिय ' । ज्ञानरूप मार्तांडस्वरूपीं, अभेदमति जडुं द्या । सेवा ही घडूं द्या, हे प्रभो ॥ ५ ॥

## पद १३

(राग–जोगिया. ताल–त्रिताल.)

आतां जाई रे शरण, जरि धरिसि चरण, दूर जन्ममरण, करी गुरुची कृपा । टाकुनियां गुरु सार्वभौम हा, कां रे तूं पसरिसी कर हे नृपा ॥धृ०॥ हा देह शकट, अस्थि मांस प्रकट, पहा सकल हे घट, जन्ममृत्यु जरा । कालचक्रिं गुंतले जीवशिव, शिवशिवशिव कधिं येतिल घरा । हे स्त्रीपुत्र धन, देह लोभाचें बंधन, येणें पावसी पतन, करि शीघ्र त्वरा । ज्ञानामृत पिउनी सुखी हो, किति तरि सेविसि विषय गरा । बहु वाढविलें तंत्र, किति जपसी हे मंत्र, परि होसी परतंत्र, धरि श्रीगुरुजपा ॥ १ ॥ पहा स्थूल सूक्ष्म गति, गुण अवस्था जागृति, स्वप्न सुषुप्ति उत्पत्ति, स्थिति लय व्यवहार । पंचभूत माया विद्या त्रैकालिक मिथ्या, करि तुं विचार । तूंचि पंच महापापी, वेदतयालागिं शापी, बोले जग द्वयरूपी, भेद करी व्यवहार । ज्ञानरूप मार्तांड प्रकाशें, या द्वैतदृष्टिचा करि संहार । मुळिं झालाचि नाहींसी, मग कैची भव फांशी, गुरुवाक्य उजळिसी, या ज्ञानदीपा ॥ २ ॥

## पद १४

(राग–खमाज. ताल–त्रिताल धीमा.)

जा जा, जनहो भजा, श्रीगुरुगुज अमृतवचन रस घ्या, पिउनि उमजा ॥ धृ० ॥ स्वहित करा जा स्वरूपीं रमा जा, निज हित धन श्रीगुरु माणिक समजा ॥ १ ॥

## पद १५

( राग–अल्हैया विलावल. ताल—दीपचंदी. )

स्मरा हो माणिक मनोहर हा ॥ धृ० ॥ हेमकटक विवर्त नग जग, भासवी, पोषवी, लोपवी। अगुण आणि गुण साम्य धरी तो। माणिक श्री मनोहर हा० ॥ १ ॥ सकल जीव जडाजडात्मक चालवी, बोलवी, डोलवी भक्तजन सौभाग्य प्रभू तो। माणिक० ॥ २ ॥ अचल घन सुख अढळ निजपद,दाखवी,बैसवी,तोषवी। ज्ञानधन मार्तांड गुरू तो। माणिक० ॥३॥

## पद १६

( राग–खमाज. ताल–त्रिताल. )

स्वहित कर कीं विषयीं भुललासी, पहा रे गड्या ॥ धृ० ॥ गुरु माणिका शरण जा, नमन कर द्वय करा जोडुनि, सुखकर, भवहर, प्रियतर, हितपर, निजघर, पुस रे गड्या ॥ १ ॥

## पद १७

( राग–पीलु जिल्हा. ताल–दीपचंदी. )

अरे जा श्रीप्रभु रिझवा। हें वय जातें अहा हा हा ॥ धृ० ॥ अहा तारुण्य मद धन हें कुणा हो शेवटा नेलें। क्षणिक हो रंग हा हिरवा। हें वय जातें० ॥१॥ अहाहा या विषयभोगा, किति हो दीन तुम्ही झालां। हे जन हो, स्वानुभव आठवा । हें वय० ॥ २ ॥ स्वकर्मं चालतें जग हें प्रिय स्त्री मित्र सुत बंधु। अशा बोधें मना फिरवा। हें वय ० ॥ ३ ॥ पहा हो कल्पजीवी शूर कवि राजे कुठें गेले। मी मोठा दंभ हा हटवा। हें वय० ॥ ४ ॥ महायोगी तपस्वी हे कसे एकांत सुखवासी। तसा एकांत सुख सेवा। हें वय० ॥ ५ ॥ शरण जा बोध चिन्मार्तांड रूपा पूर्ण तुम्ही जाणा। निजानंदा मनीं ठसवा। हें वय० ॥ ६ ॥

---

## श्रीप्रभुचरित्र.

## पद १८

( राग–साम. ताल–त्रिताल. )

नमितों ज्ञानपुंज पदकमलां। वदतों लीला। प्रभु हा, हरि हा, विधि हा, शिव हा, एकचि झाला ॥ धृ० ॥ झाला माणिक करितो निजलीला।

प्रभु हा, हरि हा, विधि हा शिव हा, एकचि झाला ॥ १ ॥ सकल मतासीं स्थापक तो गुरु । भक्त काम पुरवाया सुरतरु । जगकल्याणीं झाली कथा । ती ऐका । मनसा, वचसा, सुरसा, वदतों लीला ॥ २ ॥ सच्चिदानंदकंद विजय तूं । ज्ञानरूप मार्तांड गुरू तूं । या भवकाननीं दावि पथा । तें ऐका । मनसा वचसा सुरसा वदतों लीला ॥ ३ ॥

## पद १९

( राग–यमन जिल्हा. ताल–दादरा. )

दत्त अवधूत गुरु दत्त अवधूत । स्वच्छंदें पालटवी रूप गुणानंत ॥धृ०॥ देवत्रय मायिक दृग्बंधन केलें द्वैत दृश्य रचिलें । नामरूप जाणुनी ब्रह्मचि पूर्ण आलें ॥ १ ॥ ऐकुनियां प्रजाकाम शुभ विरंची आज्ञा, केली ही प्रतिज्ञा । अत्रि म्हणे तया शरण पूर्णा ब्रह्मसंज्ञा ॥ २ ॥ नरहरि श्रीपाद परमहंस वेषधारी । द्विज संकट वारी । श्रीमाणिकरूपें सकलमता तारी ॥ ३ ॥ स्वात्मसुखा श्रीमनोहररूप प्रगटविलें । दृश्य धन्य केलें । पूर्णरूपें जग हें चिन्मार्तंडचि झालें ॥ ४ ॥

## पद २०

( राग–यमन जिल्हा. ताल–दीपचंदी. )

कवण्या हो कार्या श्रीगुरु सांगा । झाली ही चर्या सद्गुरु सांगा ॥धृ०॥ कवण भ्रष्ट पिशाच्च नृपवर । कष्टवी बहु श्रेष्ठवी, भक्त दुष्ट वारूनी इष्ट-जन संतुष्ट करण्या धांव घेतली ॥ १ ॥ कवण मुनि सुर सिद्ध ऋषिगण गंधमाल्य सवस्त्र, अर्पुनि मुक्तिकर उपदेश घेउनि ज्ञानघन मार्तांड देखिले ॥ २ ॥

## पद २१

राग–जोगिया. ताल–धुमाळी. )

योगशक्तिचा वर्णिन महिमा वंदुनि गुरु माणिका । झाला विश्वरूप आयका ॥ धृ० ॥ विदुरग्रामीं सकलजातिनीं प्रार्थियलें प्रभुवरा । यावें श्रीप्रभु आमुचे घरा । ब्राह्मण हो अतिशूद्र स्त्रिया बहु वाईट अथवा बरा । परंतु सेवक जन हा खरा । सकलमतासी स्थापक तूं जरि, शमवी

आमुच्या भुका। व्यावें अद्भुत या लौकिका ॥ १ ॥ ऐकुनि श्रीप्रभु हास्य वदन करि बोले मधुर ध्वनी। न व्हावें निष्ठुर आपुल्या मनीं। एक्या कालिंच सदनीं तुमच्या शिष्यांसह येऊनी। घाल तें घेईन प्रिय मानुनी। ऐकुनि सर्वंहि गेले निजघरा पाहति त्या कौतुका ॥ २ ॥ योगशक्तिनें तो प्रभु आपणचि अनेक रूपा धरी। प्रगटला सर्वांच्या मंदिरीं। कोठें वस्त्र धन पुष्पचि घेतो, कोठें भोजन करी। परि तो एकचि सर्वां घरीं। अद्भुत लीला श्रीप्रभुची ही न वर्णवे ब्रह्मादिकां ॥ ३ ॥ अन्य गृहांप्रति अन्य येउनि श्रीप्रभुसी पाहिलें। पाहतां स्वगृहींहि देखिले। विदुरग्रासीं विश्वरूपधृत श्रीप्रभु अवलोकिले। ऐका अद्भुत हें वर्तलें। ज्ञानरूप मार्तांडगुरू हा खेळ दाविला निका ॥ ४ ॥

## पद २२

(राग–जोगिया. ताल–धुमाळी.)

हा गुरु बांका। वसविला म्लेंच्छजनीं ठाका ॥ धृ० ॥ म्लेंच्छ सत्व हें एकवटलें। भूतपंचपशु हे वधिले। निजबोधशक्ति पचविले। शिजविती पाका ॥ १ ॥ चित्तवृत्ति पात्रें भरिती। वरि भक्ति शांति झांकिती। गुरुस्वरूपासमीप नेती। सोडिलें धाका ॥ २ ॥ म्लेंच्छ भिक्षा ती घेतली। शुद्ध योगजलें प्रोक्षिली। शिव स्वानुभवें अर्पिली। मारिला डंका ॥ ३ ॥ दृश्य मांस शर्करा केली। गोडी ब्रह्मस्थिति ती आली। मोहमद्य तुर्या झाली। दुग्ध ती ऐका ॥ ४ ॥ उघडिला ज्ञाननेत्र मार्तांड। केला एकंकार ब्रह्मांड। माया जात्यभिमान उडविला धाका ॥ ५ ॥

## पद २३

(राग–जोगिया. ताल–केहरवा)

कमलवदनीं हें अमृत भरा। माणिक माणिक मंत्र स्मरा ॥ धृ० ॥ द्वैत बुद्धि ही दूर करा। अहंब्रह्म हें नच विसरा ॥ १ ॥ सकलमताचा पंथ धरा। सर्व सौख्य येईल घरा ॥२॥ महावाक्य हें मनिं विवरा। ज्ञानरूप मार्तंड स्मरा ॥ ३ ॥

## पद २४

(राग–जोगिया. ताल–केहरवा.)

धन्य धन्य अति धन्य आम्ही । श्रीमाणिकपदीं लीन आम्ही ॥ धृ० ॥ श्रीमाणिकपदीं लीन रहा । ब्रह्मलोक हे तुच्छ पहा ॥ १ ॥ जन्ममृत्युभ्रम उधळीतो । सच्चिदानंद आम्ही होतों ॥ २ ॥ ज्ञानरूप मार्तांड पहा । निर्विकल्प होऊनि रहा ॥ ३ ॥

## पद २५

(राग–झिंझूटी. ताल–धुमाळी.)

गुरु संगतिनें समरस खेळती । स्वछंदें नाचति उडती । आनंदें निज गुण गाती । धन्य जयाची सत्संगति ॥ धृ० ॥ विषयसेवनीं समाधि भोगिती । कधिं हसती कधिं जग पाहती । ते डुलती स्वस्वरुपीं प्रीति । ज्ञानबीज मार्तांड गति । गुज दावुनि त्यामधिं नांदविती ॥ १ ॥

## पद २६

(राग–यमन जिल्हा. ताल–केहरवा.)

स्मरुनि तत्त्व हें स्वरूप पाहे । जग नोहे ब्रह्मचि आहे आहे ॥धृ०॥ मीपण बंध हे मिथ्या वाहे । जग नोहे वस्तुचि आहे आहे । त्वंपद साक्षी तत्पद लक्षी । असिपद हें स्वरूपीं किमपि न साहे । श्रीगुरुमाणिक जय गुरु माणिक । म्हणुनी हें अखंड प्रेमें वाहे ॥ १ ॥

## पद २७

(राग–कालंगडा. ताल–केहरवा.)

हा कोल खेळा हो । कठिण ही ग्रंथि खोला हो ॥ धृ० ॥ आकाशा रंग नाहीं । रंगा त्या नांव नाहीं । मुळींच नाहीं तेंचि सत्य झालें बाबा ॥ १॥ वंध्येसीं पुत्र नाहीं । पुत्रा कलत्र नाहीं । वरचि नाहीं कैंचा वऱ्हाडी बाबा ॥ २ ॥ ब्रह्मीं हें दृश्य नाहीं । दृश्यासी थारा नाहीं । भ्रमचि नाहीं कोण बद्ध मुक्त बाबा ॥ ३ ॥ विभक्त भक्त नाहीं । भक्तांत द्वैत नाहीं । माणिकचि हा चिन्मार्तांड बाबा ॥ ४ ॥

## पद २८

( राग–झिंझूटी जिल्हा. ताल–धुमाळी. )

एक ब्रह्म ही दुसरी माया तीन गुण अवस्था हे चार। पंच भूतांचा सूक्ष्म दृष्टिनें करी सुविचार। सहा भाव आणि सप्त भूमिका अष्ट देह होतां संहार। दृश्य दिसे हें चिन्मय घनसुख ब्रह्माकार। नाशवंत चंचल जड, जग हें क्षणिक, विषयसुख अति निःसार। मोक्षप्रद हें श्रीगुरुमाणिक नामचि सार। सकलमतस्थापित श्रीगुरुसी शरण जाईं रे करी हा विचार। कोण मी, कैंचें दृश्य विश्व आणि हा विस्तार। मीच ब्रह्म हें सदृढ धरुनि मनिं, निजानंद सुख घेइं अपार। श्रीगुरु बोधें जग हें मार्तांडाकार॥ १॥

## पद २९

( राग–हिंदोल. ताल–चौताल. )

माणिका माणिका माणिका मदन मदहर मुखमकरंद मिलिंदायमान सुरमुनि मानसहंस ते विजय भो॥ धृ० ॥ ( अंतरा )॥ अचल अज अविनाश नित एक गुरु अवधूत सत ज्ञानघन मार्तंड चित अनुपम आनंद भो॥ १॥

## पद ३०

(राग–पिलु. ताल–दीपचंदी.)

नित्य वंदू त्या माणिकपायां। प्रणवरूपें भासे ही जेथें माया॥ धृ० ॥ पूर्णरूपें कृपा बोलवेना। अनुभवें अनुभवहि साहीना। बोधें बोध जाहली कल्पना। मृत्यु पावली स्फूर्तिवासना॥ १॥ अहंब्रह्मास्मि वृत्ति गळाली। ऐक्यतेची समाधि हारपली। शून्य विद्येची वार्ता निमाली। कवणा सांगूं हे गति कैसी झाली॥ २॥ ज्ञानमार्तंडोदय झाला। भास विवर्त विरोनी गेला। सहज माणिक होऊन ठेला। हाहि अर्थ समूळ वाया गेला॥ ३॥

## पद ३१

( राग–पिलु जिल्हा. ताल–दीपचंदी. )

धन्यहि धन्य झालों घेतां माणिक नामा। कैवल्यसुख तें थोडें कवण पुण्याचा महिमा॥ धृ० ॥ सकलजडां भेदू नाहीं कैंची देहीं अहंता। एक

तो अंतरात्मा भोग्य विश्वां भोगिता । स्वरूप कल्पूं जातां तेथें नाहीं कल्पिता ॥ १ ॥ अस्ति भाति प्रिय आत्मा हा अनुभव जगासी । जागृति स्वप्न सुषुप्ति दृश्य साक्षी देहासी । नेति नेति या वचनें साक्षीपणहि नाशी ॥ २ ॥ एक सच्चिदानंदीं कवण भोक्ता तो पाही । निर्विकार नित्य असतां वृत्ति स्फुरेल कां ही । ज्ञानरूपमार्तांडा तमवार्ताहि नाहीं ॥ ३ ॥

## पद ३२

(राग–भूप. ताल–धुमाळी.)

कोण्या सुकृत दैव हें फळलें । गुरुहस्तामृत शिरीं पडलें । मन माझें वळलें, स्वहित गुज कळलें ॥ धृ० ॥ किति श्रम हे अहा किति श्रम हे । कोण बद्ध, कोण जगिं सुटले, भूतगुण नटले, व्यर्थ जन शिणले ॥ १ ॥ किति गुज हें अहा किती गुज हें, बहु शास्त्र वेदहि थकले, अनुभविं थिजले, मौनपणीं रमले ॥ २ ॥ किती सुख हें अहा किती सुख हें । हे पंचभूत नाहीं सरले, देखणें फिरलें, स्वरूपचि भरलें ॥ ३ ॥ (चाल) किति धन्य भाग्य विश्वाचें । स्वस्वरूपीं स्थिरपरि नाचे । अज्ञानि जीव नरकाचे । सज्ञानी जीव मोक्षाचे । हें कपट मूलतत्त्वाचें । आमुचें न तुमचें जो मानिल त्याचें । तुज नमो बोध मार्तांडा । तूं शमवि वाद पाखांडा । निजरूपीं ठेवि ब्रह्मांडा । नाचवी सुखाचा झेंडा । हें काव्य बोलणें सरलें संभ्रम पुरले, मीपण नुरलें ॥ ४ ॥

## पद ३३

(राग–वसंत. ताल–सुरफाक.)

गुरुघरीं मी आल्यें, निजघरीं मी आल्यें । झाल्यें चिज्जीवन, होउनि मन उन्मन, हो ल्यालें निजधन ॥ धृ० ॥ बोध सुखामृत (आत्म०) स्वरूप दावुनी बहु धाल्यें । घन माणिक तेजीं रमले ॥ १ ॥

## पद ३४

(राग–यमन जिल्हा. ताल–पंजाबी.)

मदहरमदन मनोहरनंदन । मुनिमानस मलमूल निकृंतन ॥ धृ० ॥ कमल नेत्र मुखकमल सुमानस । कमलधाम कमलाधर खेलन ॥ १ ॥

श्रीनखकोटि भानुशशीखंडित । स्वात्मसुखैक रसात्मक दोलन ॥ २ ॥ ज्ञानकिरण मार्तांडरूपधर । सच्चिदानंदमूलभवभंजन ॥ ३ ॥

## पद ३५

(राग—कालंगडा. ताल—त्रिताल.)

श्रीचरणपंकजस्मरणं अनादिनिधनं संसृतिहरणं ॥ धृ० ॥ द्वैताद्वैत विवर्जितरूपं । मानावमानविहीनं ॥ १ ॥ सच्चिद्घन परिपूर्ण सुखात्मक ज्ञानमार्तंड स्वरूपम् ॥ २ ॥

## पद ३६

(राग—भूप जिल्हा. ताल—धुमाळी.)

माया धृतपादारविंद । जय जय चिदानंद सुखकंद ॥ धृ० ॥ निर्गुण आणि सगुणाकृति दाविसि । विश्वरूप निजछंद ॥ १ ॥ शेष सरस्वति महादेव परि । तव भजनीं रे मतिमंद ॥ २ ॥ ज्ञानरूपमार्तांड स्वरूपीं । अतितर घन आनंद ॥ ३ ॥

## पद ३७

(राग—भूप जिल्हा. ताल—त्रिताल.)

उगवला चंद्र हा ज्ञानकलेचा । किंवा प्रेम हें संतजनाचें ॥ धृ० ॥ उगवली माय ही माय भक्तजनांची । ज्ञानरूप मार्तांड प्रभू हा । विश्वसुखाचा कंद । हा आनंदाचा कंद ॥ १ ॥

## पद ३८

(राग—भैरव. ताल—धुमाळी.)

देवा या या ना कां कोप आला । देवा गा वा रे हो पाव मला ॥ धृ० ॥ देवा ना त्यागा या पतितकुला । देवा हा जन पीडित शरण तुला ॥ १ ॥ देवा अपराधा आमुच्या विसरा । देवा ना आम्हां तारक दुसरा ॥ २ ॥ देवा या मायाजाला आंवरा । देवा चिन्मार्तांडा ऐक्य करा ॥ ३ ॥

पद ३९

(राग—यमन जिल्हा. ताल—धुमाळी. अद्धा.)

देवा मी हो तुमची प्रिय दासी ॥ धृ०॥ ईश महेश ब्रह्म सुख हो कां । प्रभु तुमच्याविण मी हो उदासी ॥ १ ॥ मुक्तिभुवन सुरप्रयाग गंगा । तूंचि आम्हां त्रिपदी आणि काशी ॥ २ ॥ ज्ञानरूप मार्तांड पतीसी । मी नवरी न वरी आणिकासी ॥ ३ ॥

पद ४०

(राग—जोगिया. ताल—धुमाळी.)

ज्याचा देहचि निर्विकल्प गाजे । ज्यासी सद्गुरु नाम हें साजे । ज्यासी पाहातांचि आत्मबोध माजे । हेचि अवधूत श्रीदत्तराजे ॥ धृ० ॥ ज्याच्या दृष्टीसी ही सृष्टि नाहीं । ज्याच्या कृपेचा चोज सांगूं कायी । देहभोग विदेह सुख लाही । रूप पाहतांचि ब्रह्मसुख लाजे ॥ १ ॥ ज्ञानमार्तांड हा उगवला । मूळ जीवा अज्ञान ग्रासीयेला । आहे नाहीं हा एक दादूला । एक छत्र स्वरूप विराजे ॥ २ ॥

पद ४१

(राग—पिलु. ताल—धुमाळी.)

भज नुतसुरमौली जन हो । श्रीमाणिक पदरजधूली घे । आत्मसुखा । घे स्वात्मसुखा ॥ धृ० ॥ नाटकी हा अवधूतचि नटतो । विधि हर वनमाली ॥ १ ॥ निजानंद प्रियधामा रामा । निर्गुण गुणशाली प्रभु हा ॥ २ ॥ पूर्ण कृपें चिन्मार्तांडोदयीं बोधस्फूर्ति हरली जन हो ॥ ३ ॥

पद ४२

( राग—पिलु. ताल—धुमाळी. )

अवधूत भजा अवधूत भजा । ब्रह्म होती हे भूत सहज । मायामल निर्धूत ॥ धृ०॥ निरालंबीं आलंबन करी जो । तोचि शुद्ध अतिपूत ॥ १ ॥ परमहंस सनकादिक वंदिती । जगभरित महद्भूत ॥ २ ॥ भक्तकार्यकल्पद्रुम गुरु हा । विधि हरिहरपदीं विनत ॥ ३ ॥ प्रिय मार्तांडाकार एक सुखचिन्मय ओतप्रोत ॥ ४ ॥

## पद ४३

( राग–झिंझुटी. ताल—दादरा. )

तोचि आम्हां पोषवी। हा अवधूत, अवधूत ॥ धृ० ॥ सृष्टिकाम अत्रि जया ध्यानिं तोषवी ॥ १ ॥ नरहरि श्रीपाद हंस योग शोभवी ॥ २ ॥ विश्वसुखा श्रीमाणिक रूप मानवी ॥ ३ ॥ सकलमतां तारक गुरुमार्ग वाढवी ॥ ४ ॥ ज्ञानरूप मार्तांड नित्य द्योतवी ॥ ५ ॥

## पद ४४

( राग—अभंग. बागेसरी. ताल—धुमाळी. )

मायामलधूत आम्हीं अवधूत। दृश्य पंचभूत जाणूं आम्ही ॥ १ जाणूं आम्ही स्वप्न सुषुप्ति जागृती। जन्ममरण भीति नाहीं आम्हा ॥ २ ॥ नाहीं आम्हां देह वासना संबंध। कैंचा मोक्ष बंध चिदाकाशीं ॥ ३ ॥ चिदाकाशीं चित्र निर्गुण सगुण। आम्ही ब्रह्म पूर्ण सत्यज्ञान ॥ ४ ॥ ज्ञान मार्तांड हा बोध अभंग। झाला भवभंग हरपली माया ॥ ५ ॥

## पद ४५

( राग—जोगिया. ताल—केहरवा. )

अवधूतां शरण रिघाल्यें। देहींच ब्रह्मसुख फळलें। किति विस्मय नवल हें झालें। ब्रह्मासी ब्रह्मपण आलें ॥ धृ० ॥ आहे तें अस्ति ब्रह्म, भासतें तें भाति ब्रह्म। विषयीं सुख तें प्रिय ब्रह्म, हें अस्ति भाति प्रिय ब्रह्म। नामरूप मिथ्या झालें ॥ १ ॥ वंध्यासुत लग्न वऱ्हाडी मृगजलीं भ्याली दिली बुडी। स्वप्नींचा तो नावाडी, महावाक्य बोधुनी काढी। लटक्या मुखीं सार्थक झालें ॥ २ ॥ माया ही अर्थिक नाहीं, मार्तांडीं मृगजल पाही। मग बंध मोक्ष तो काई। ब्रह्मचि ब्रह्मसुख घेई। मौनाचें बोलणें सरलें ॥ ३ ॥

# श्रीशंकरावरील पदें

## पद ४६

( राग—जोगिया. ताल—धुमाळी. )

येई चेतन सांबा, मन हें आवरी। हृदयाकाशीं उठती मी मी लहरी। न कळे कोण मी भ्यालों मज पोटिं धरी। बुडतों भ्रमजलडोहीं न्या पैल-तिरीं ॥ धृ० ॥ नाहींसी तरी ही सृष्टि कवणें रचिली। 'अहंब्रह्म' ही वृत्ति कवणा स्फुरली। अनंत जडजीवाकृति कशि हो दिसली। प्रकाशावांचुनि निशि ही कुणि भासविली ॥ १ ॥ माझें मीपण सांबा त्वां चेतविलें। जागृति स्वप्न सुषुप्ति त्वां भोगविलें। 'अंतर्यामी' म्हणुनी वेदीं स्तविलें। अंतरीं वसुनी सांबा मज अंतरिलें ॥ २ ॥ विषयभोगपर वृत्ति जेव्हां मुरली। अन्य वृत्तिही नाहीं शांति फळली। प्रगटे चिन्मूर्ति जी हृदयीं वसली। हा अनुभव सर्वां परि मति हो भ्रमली ॥ ३ ॥ स्त्रीपुरुषाकृति तूझी जाणुनी भुलतों। विषयीं सुख तूं नाथा नेणुनी रमतों। न कळे कोण मी ऐसें कळुनी भ्रमतों। नाथा आत्मस्मृति दे चरणीं नमितों ॥ ४ ॥ पूर्णकाम तूं सांबा जग कां रचिलें। ममैवांश म्हणता परि नरकें पिडिलें। दुर्घट माया वाक्य हें आम्हां फळलें। त्राहि त्राहि हे भगवन् दैवें त्यजिलें ॥ ५ ॥ पर शिववाणी वदली वत्सा उठि हो। आत्मोल्हासीं जग हें मग कां भय हो। जीव भ्रम, तूं साक्षी शिव हो शिव हो। तव भूषण ही माया तुज मंगल शुभ हो ॥ ६ ॥ मी आहें या अनुभवीं सत्ता प्रगटे। अनंत जन्म ज्ञान, विण चेतन न घटे। स्वप्नींहि निद्रासुख न कदापि विटे। चिदानंद मी निश्चयें हें दैन्य फिटे ॥ ७ ॥ स्वानुभव स्फूर्ति पद मनिं सार्थ जडे। ब्रह्मकपाट अविद्या सहजीं उघडे। चिन्मार्तांड प्रसादें हा योग घडे। सकलमत प्रभू नांदे जिकडे तिकडे ॥ ८ ॥

## पद ४७

ताल—धुमाळी. )

हा शैव नव्हे मनुजाधम मूढ तो ऐका। मी सांब नव्हे कोण मी धरी जो शंका ॥ धृ० ॥ ब्रह्मादि स्तंब जडशक्ति हीच शाळंका। चैतन्य लिंग

शिव अलिप्त मायापंका। अवकाश रूपिणी कामेश्वरी वामांका। हा वृत्ति-प्रवाह गंगाजल भवनौका॥ चाल॥ दृग्विषय भोगवी चेतन मी सांब। अंतरीं प्रकृति गुण साक्षी मी सांब। जगीं सुपुप्ति लय सुखदाता मी सांब। मत्सन्निधानसत्ता ही विद्या क्षणिका। मज अनंत वेषें सुखवि कुशल जशी गणिका॥ १॥ हे पंचभूत मी पंचमुखी शिवराणा। मनप्रवाह चेतवी परि न धरी अभिमाना। कधिं दुःख भोगी कधिं विनोद करी शिवगाना। मन शिशु खेळ खेळुनी येई शिव ( आत्म ) सदना॥ चा०॥ ईशान रुद्र मृड अष्टमूर्ति मी सांब। भ्रम भस्म चर्चि शिवदीक्षा मी सांब। स्त्री-पुरुष सर्व हे जगदंबा आणि सांब। कैलास देह, मी जगदात्मा मग भय कां। भूलिंग ज्ञानमार्तांड सत्य शिव डंका॥ २॥

## पद ४८

( राग—जोगिया. ताल—धुमाळी. )

सहजमुक्ति श्रीप्रसाद कलियुगिं पाहि राजराजेश्वरी महिमा। भूकैलासीं सद्गण क्रीडे सार्वभौम शिवगौरी उमा॥ धृ०॥ पूर्णब्रह्म चैतन्य लिंग, घन प्रकाश भेदभ्रम भक्षी। देह पानवटी, मस्तक पिंडी, नेत्रीं बिंदु तो शिव साक्षी। ज्ञानेंद्रिय पंच लिंगदेहीं विश्वरूप हा विरूपाक्षी। कर्मेंद्रिय मन आत्मा द्वादश ज्योतिर्लिंग क्षेत्रीं लक्षी॥ चाल॥ मस्तकीं काशी-विश्वेश्वर वाराणसी। श्रीशैल भृकुटी मल्लिकार्जुना पूजिसी। नासिका-प्रगति त्रिंबकेश्वरा वंदिसी। रामेश्वर ममलेश्वर जप हा याच देहीं दे शिवधामा॥ १॥ हस्तपाद भीमाशंकर हा, घृष्णेश्वर नवचक्रीं समजा। शुक्लपथीं केदारेश्वर दर्शन, महाकाल जिव्हाग्रीं भजा। वैद्यनाथ आयुष्य नागवळ सोमनाथ जीवन मनुजा। आत्मस्फुरण गोकर्ण महाबळ सुखाब्धिजल चिद्बिल्व पुजा॥ चा०॥ बहिरंतर अंगाष्टकीं भैरव स्थापना। असितांगरु अतिक्रोध चंडभीषणा। संहार कपालोन्मत्त वंद्य सज्जना। जय जय शंकर भेद भस्म करी पंचवदन शिवरूप आम्हां॥ २॥ ऐक शिवार्चन स्वयमात्मा शिव, अर्धांगी तुर्या गौरी। सुषुप्ति शून्य सिंहासनीं शिव मी स्वप्नवृत्ति सामुग्री बरी। सद्योजात तत्पुरुष वामदेव ईशान अघोर

न्यास करी । जागृति भोग नित्यपूजा ही प्रसाद जीवन्मुक्ति खरी ॥चाल॥ चैतन्य एक शिव पंचभूतीं भावना । रुद्राक्ष भस्मा पंचाक्षरी दीक्षार्चना । कैलास देह, शिव मींच, सत्य धारणा । ज्ञानलिंग मार्तंड तेज शिव जगत्रयीं नाहीं उपमा ॥ ३ ॥

## पद ४९

( राग—अरभी. ताल झुमाळी. )

कमलेश्वर प्रिय हो, हे मानस । कमल करस्थित हो हे मानस । सहस्त्र-दल चित्कमलीं जो शिव प्राण मदात्मा हो हे मानस । कमल शिवालय हो हे मानस ॥ धृ० ॥ षट्कमलीं विहरो हे मानस । प्रपंच मद विसरो हे मानस । ब्रह्मकमल मकरंद सुधारस मधु सेवनीं रत हो हे मानस । कमलपदीं नत हो हे मानस ॥ १ ॥ कमलासनीं स्थिर हो हे मानस । जन्म शिवार्चन हो हे मानस । सिंहनाद शिवगर्जनें भ्रमगजगंड विदारण हो हे मानस । कमल शिवार्पण हो हे मानस ॥ २ ॥ वंशकमल विकसो हे मानस । शिवयश गानीं असो हे मानस । शिवमार्तंड सदय हृत्कमलीं सफल हें जीवन हो हे मानस । सकल कमलरूप हो हे मानस ॥ ३ ॥

## पद ५०

( राग—मालकंस. ताल—त्रिताल. )

सिंहनाद गर्जे हा शंकर । भूकैलासीं नाथ कमलेश्वर ॥ धृ० ॥ मीच ब्रह्म माया मी विष्णू । शक्तिकाल महाकाल अघोर मी । अधिष्ठान अप-वाद भ्रांति । ज्ञान ध्यान गुण संकल्प स्फुरण तत्पुरुष नामधर ॥ १ ॥ वामदेव ईशान वरेण्य मी सद्योजात गायत्री प्रणव । चिन्मणि मार्तंड बोध नेति नेति गर्जे मी । चिदानंद जंगम स्थावर ॥ २ ॥

---

# श्री देवी वरील पदें

## श्रीव्यंकम्मा पंचपदी

### पद ५१

( राग—कानडा. ताल—धुमाळी. )

ये ग ये श्रीगुरु ब्रह्म स्फुरणे । चिन्मणि घनकिरणे । माये अज अनंत ज्ञानाभरणे । शतमुख शतचरणे । अनादि सादि सृष्टि दृष्टि भ्रम बंध मोक्ष श्रुतिवाक्यालंकरणे ॥ १ ॥ आद्ये असशी निज निर्गुण धामीं, सर्वांतर्यामीं । तुयें भ्रमलीस या अद्भुत कर्मीं, वेरधर्म नियमीं । सर्वांतरीं नटसी त्रिपुटी चिद्भ्रमाधार मानमेय करणें ॥ २ ॥ विश्वे बीजमहद्भूताकाशे शिव जीवाभासे । विद्ये अमित ग्रंथि सुक्ष्मविकासे धीवृत्ति विलासे । भेदशुद्ध सांख्ययोग मिथ्या सकल स्वमतवाक्यालंकरणे ॥ ३ ॥ अमृते अस्ति भाति प्रिय जंजाले, सत्तालवाले । सुकृते सुख उन्मनि समाधि मूले, सच्चित्सुख लीले । ब्रह्म उखर मृगजल मार्तंडे । व्यंके जय निर्विकल्पपूर्णे ॥ ४ ॥

### पद ५२

( राग–जोगिया कालंगडा. ताल–धुमाळी. )

येई येई ग चित्कमले, चिन्मधु उन्मनि बाले । चेतनवामांके, चित्पंके व्यंके करुणालवाले ॥ धृ० ॥ विश्वा ईशचि ग जरि बुडवी, माता वत्सा वधवी । भक्ता देवचि ग जरि भुलवी, शिष्या श्रीगुरु भ्रमवी । तैसी कोपसी तूं, तरि कोणा करुणावाणि वदावी । आम्हां हतदैवा मग कैंची गुरुसेवा सुख पदवी ॥ १ ॥ वातें बल धूलीसी दावियलें, काळें कीटक वधिले । शिवनेत्रें तृणपर्णा जाळियलें, चक्रें मशक वधिले । तैसें तूं जननी निजसत्तें दीनजनां मोहविले । काय पराक्रम तूझे आणि आम्हां माता नाम हें फळलें ॥ २ ॥ मधुकर देह त्यजी मधुपानीं, कुरंग सुस्वर गानीं । पतंग दीपा ग तनु अर्पी, स्वरूपीं जैसा ज्ञानी । चरणीं मस्तक हें अर्पियलें, घे भूषण हें मानी । चिन्मणिमार्तंडे मधुखंडे निर्विकल्पपददानी ॥ ३ ॥

## पद ५३

( राग—भीमपलासी. ताल—धुमाळी. )

व्यंका नाम जगज्जननी कुलभूषण ही अवतरली हो। शंका भ्रम चंडमुंड मर्दिनी रंकाऽमरपद देई हो ॥ धृ० ॥ अति भट कटक विषय दुर्घट हट शमवाया ही नटली हो। टंकारुनी हठयोग चापगुण दृश्यस्फूर्ति सह वधिली हो ॥ १ ॥ पद्मासनीं शुभ शांत मुद्रा शुभ्रांबर कटि कसली हो। परमप्रिय गुरुभक्तां सुखकर वर देण्या ही सजली हो ॥ २ ॥ सत्य ज्ञानानंदरूप चिन्मार्तांडाची लहरी हो । निर्विकल्प स्वस्वरूप हितगुज श्रीमाणिकपदीं मुरली हो ॥ ३ ॥

## पद ५४

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. )

व्यंका सच्चिदानंद वामांका दाविसी गुणपंका। शंका भ्रम मर्दुनी विश्वकलंका करि तव जय डंका। कंका मुख भेदुनी निजसत्ते ईशपदीं वसवी ग या रंका ॥ १ ॥ अंबा निर्विकल्परूपीं बिंबा दाविसी प्रतिबिंबा। उदरीं पोषिसी या मायिक डिंबा जेवीं मृत्कुंभा। अस्तिभाति प्रिय ब्रह्मरूप जगदीशपदा देसी निरालंबा ॥ २ ॥ आर्ये सकल दृश्य कारणकार्ये समर्थे गुरुवर्ये । शौर्ये नियमासन समाधिधैर्ये एकांतचर्ये। ज्ञानकिरण सन्मणिमार्तांडे महामौन निर्विकल्पभार्ये ॥ ३ ॥

## पद ५५

( राग–खमाज जिल्हा. ताल–त्रिताल–धीमा. )

भासे एकचि हे दो अंग । मधुनवरली मणि दिन करीं पाहातां। गोडी प्रकाश अभंग ॥ धृ० ॥ बिंबीं बिंब असुनि प्रतिबिंबीं । खेळे बहुविध छंद ॥ १ ॥ शब्द रूपरसगंधा भोगुनी । स्वरूपीं चित्त असंग ॥ २ ॥ श्रीव्यंका जल माणिक जलधीं। चिन्मार्तांड तरंग ॥ ३ ॥

## पद ५६

( राग--खमाज जिल्हा. ताल--पंजाबी. )

शामले सख्यसेवाव्यसनं मा कुरु । नतोऽस्मि ललिते विदितोऽहं वंदितोऽहं दानशीले व्यसनं मा कुरु ॥ धृ० ॥ शिवेऽनुकूले सुभगोऽहं

वंदितोऽहं हतदैव्ये व्यसनं मा कुरु । शिवे सुमुखे सुगात्रे सदयनेत्रे रत्नमित्रे । व्यसनं मा कुरु ॥ १ ॥

पद ५७

( राग--भैरवी. ताल--पंजाबी. )

मिथुनसुखदानी ही शामा । शामला सुमंगलनामा ॥ धृ० ॥ संध्या मिथुन निषेध विधि मिथुन हे । अग्निमथन सत्कर्मा ॥ १ ॥ प्राणापान मिथुन हटसिद्धि । अर्केंदु मिथुन ती आमा ॥ २ ॥ कपाल कुहरीं जिव्हा मैथुनीं अमर देह सुखसीमा ॥ ३ ॥ जीवात्माऽरणी प्रणव उत्तरारणी । ज्ञानमथन निजधामा ॥ ४ ॥ आत्मलिंग शुभ शांभवी मैथुनी । देहीं प्रगटे शिवमहिमा ॥ ५ ॥ ब्रह्मस्फूर्ति मिथुन लीलाकृति । चिन्मार्तंड सुनामा ॥ ६ ॥

पद ५८

( राग–सोहनी. ताल–झपताल. )

मानी सुहाग जग सुभगा सुमंगला । जय रहो आनंदी राज हिमवाला । ब्रह्मादि विष्णु हर प्रेतासनी पंच, भूताशनी मोहिनी जगत् जाला ॥ धृ० ॥ धारेसुरी जंबुवादिनी अरुणिका । मीनाक्षी मधुशक्ति आदि यहि पांच है । दुर्गा रमा राधिकारानी सावित्री वागेसुरी शामला जपहुं माला ॥ १ ॥ आत्मसुख मधुपानीं दृश्य मांसाहारी । शिवजीव मिथुन सुखनंददा माता । सच्छास्त्रयोनि चिन्मुद्रा चिद्रतिप्रिया, अखिल भग मंत्र जप फलदानशीला ॥ २ ॥ धूतपट पूतमन कामनासन दीप धूप बलि भोज्य दे ध्यात सत गावे । सकल संकट हरे कामना दरस दे । चिज्ज्वलित मार्तांड तेज प्रतिपाला ॥ ३ ॥

पद ५९

( राग—खमाज जिल्हा. ताल—धुमाळी. )

ही शिवा प्रलय हुतभवा अचलवैभवा चंडिका धूमा । मनु यंत्र तंत्र शिवशक्ति पराक्रम सीमा ॥ धृ० ॥ धगधगित गात्र सुरचकित कुलाकुलनमित विश्व प्रलयांबा । अघ कृत्रिम भक्षिणी जीव प्राण शिवसांबा ।

किति वेष करिसि जगपोष देव जयघोष स्तविती रुद्राणी। कधिं विधवा कधिं सौभाग्य मुकुट महाराणी । मणिपदक हार शुभ तिलक रथध्वज काक हृत्कमलवासी जगत्रयवासी। किति शाकिनि डाकिनी पादसेवनीं दासी ॥ चाल ॥ सिंहासनिं श्री धूमावति सद्गुणशीला। वाम सव्य कामेश्वरि ललिता शामला। परिवार छिन्नमस्ता नवचंडी बगळा श्री बाला। अतिघोर घोर दुर्वार सृष्टिसंहार सहज करि लीला। उदयास्त मध्य प्रौढ वृद्ध मुग्धा बाला ॥ १ ॥ षट्चक्र अर्चनापात्र सुदीक्षा मंत्र हर्ष मधुधारा। सर्वात्म शक्ति लय शुद्ध शांभवी मुद्रा। गुरु वंदु अमृतपूर्णेंदु योनि चिद्बिंदु मनोन्मनीं कामा । गूढात्मशक्ति आलिंगन चिद्रति वामा। बलिहवन दृश्य पशुहनन बोध घटपूर्ण शाक्त सत्पूजा। महा स्मशानिं शिव प्रेतासनी प्रसन्न हुतजा ॥ चाल ॥ महाकाली त्रिकुट गिरिवासिनी ही शिवा। उच्छिष्ट सुधागमदायिनी ही शिवा। सौभाग्य वंशवर्धिनी ही शिवा। श्रीस्तवन धूप, जप मनन परांबा शरणचिज्ज्वल ज्वाला। प्रिय शंकर चिन्मार्तंड वीर्य प्रतिपाला ॥ २ ॥

---

## भजन

स्फुरद्रूपी श्री जगदंबे। सच्चिदानंद प्रतिबिंबे ॥

### पद ६० (आरती)

( राग—काफी. ताल—धुमाळी. )

व्यंके तुज मंगल हो। सन्माणिक श्री मंगल हो। शंकाकर भवपंका हरिसी कलंकाऽमर करि रंका माय तूं॥ धृ० ॥ यम नियमासन बिजे चिच्छाया सुंदरि सहजे। बिंब भास सदसन्मिथ्या भ्रम विषय भोग साधन आणि साक्षिणी ॥ १ ॥ मायाधृत शुभ षट्कमले प्रणवाकृति कुंडली विमले। हंसरूप अजपाजप धारिणी अमृतदानी नित्य दृश्य गर्भिणी ॥ २ ॥ अष्टपीठ मूलस्तंभे लीलाधृत विश्वकदंबे। सद्वितांड ब्रह्मांडा मांडिसी चिन्मार्तांड सुखाब्धि विवर्धिनी ॥ ३ ॥

# आरति

## पद ६१

( राग--खमाज जिल्हा. ताल--धुमाळी. )

आरती मधुमति त्र्यंबकेची । जननी हेरंब शामलेची ॥ धृ० ॥ स्वरूपीं केवळ जी सत्ता । सहज स्वप्रकाश भासकता । मोक्षसुखहेतु मूल जगता । तूंचि आनंदरूप माता ॥चाल॥ स्वसत्तें भूतपंच दावी । प्रथम अवकाशातें सजवी । तेथुनी स्फूर्तिवायु उठवी । स्फूर्तिमधें ज्ञानकला नटवी । सदा ते शक्त, चेतना चित्त, स्वधर्मीं सक्त, अहंकृति व्यक्त, करूनियां अनेक गुणग्रंथी । असंगा आणि दृश्यपंथीं ॥ १ ॥ प्रथम अवकाश ईशनामी । निर्मिली शिव ज्ञानधर्मी । ईश्वरा राजस तमऊर्मी । देउनि विविध जीव निर्मी ॥ चाल ॥ स्वभावकालकर्मरेषा । निर्मिली विश्वप्राज्ञ तैजसा । शब्द मतभेद तर्क भाषा । चित्रजग नटली विविधवेषा । नामगुणबद्ध, दैत्यसुरसिद्ध, मलिन मन शुद्ध, धर्मविधि निषिद्ध लीला न बोलवे वाणी । शिव अवधूत पट्टराणी ॥ २ ॥ निश्चल स्वात्मरूपीं महिमा । दावि लोपवी पूर्णकामा । शामला शामतनु वामा । नेइ या दीना निजधामा ॥ चाल॥ ज्ञान विज्ञान मूल योनी । पंचकोशात्मक सिंहासनीं । जीव शिव मिथुन सौख्यदानी । चिन्मधुपानीं मग्न गानीं । तोचि जगिं शाक्त भावना त्यक्त । सहजस्थिति मुक्त आत्मरतिसक्त । बाल मार्तंड पाद वंदी । जय जय उदो सदानंदी ॥ ३ ॥

---

# गणपतीचीं पदें

## पद ६२

( राग—यमन जिल्हा. ताल धुमाळी. )

गजवदन चित्प्रभूलीला । विजयप्रद हो या बालां प्रभू भूपाला आणि विश्वाला ॥ धृ० ॥ वाग्रत्नालंकृतमाला । जगपोषक या श्रीप्रभुला । नमुनी पदकमलां । कंठीं घाला ॥ १ ॥ मग नमूं स्फूर्ति चिद्बिंबा । त्र्यंबका जयतु जगदंबा । जननी हेरंबा । जी निरालंबा । शारदा मंगलारंभा । बिंबाधर

पृथुल नितंबा । हेमकुच कुंभा । विधृत स्वरतुंबा ॥ २ ॥ तो दत्त ती प्रभूसत्ता । गणपति सरस्वति माता । मार्तांड प्रभा सम समता । सुख स्वात्मानंदीं डुलता । नाचती तकता थैत्तततगिण झुण झुण तत किट् किट् धेत्ता ॥ ३ ॥

## पद ६३

( राग—अरभी दुर्गा. ताल—दादरा. )

गा तुम्ही हेरंबा । बिंबाधर सुनितंबा । शारदांब चिद्बिंबा । तत्तारक नाना धिन् धिन् त्रिक धिन् धिन्न धा । गन्न गन्न-धा गन्न हा ॥ धृ० ॥ सुखकर सकलारंभा । करधृत सुस्वर तुंबा ॥ १ ॥ ललिता शुंडादंडा । कलगर्जित मदगंडा । सुजनाल्हादक तुंडा । ज्ञान किरण मार्तांडा ॥ २ ॥

## पद ६४

( छक्कड. ताल—केहरवा. )

गुण अगुण गणेश सच्चिदानंद । स्मरा श्रीगंग म्हणा श्री गंग । माता भवानी, चिन्माता भवानी । रूप पाहोनि दंग ॥ धृ० ॥ मी चेतन ही चिन्माया हा । मी आनंद ही सुखकाया । चिन्मार्तंड ही चिच्छाया हा । शिवरूपासी हें रूप अभेद अभंग । स्मरा श्रीगंग ॥ १ ॥

## पद ६५

( राग—तिलककमोद. ताल—केहरवा. )

स्मर गजाननं मति विकासिनं सुखविलासिनं हर जय जय जय । महा मुगुट धारिन् सुरसंकट हारिन् नुत विजय कारिन् हर जय जय जय ॥धृ०॥ एकदंताय ते नमो नमोऽस्तु ते । कलिमलापहा श्रमकलापहा भवत्रितापहा॥ शिवसुताय ते मंगलाय ते सुरवरायते हर जय जय जय ॥ १ ॥ मद विगलित शुंडादंडं । खंडितारण्यपाखांडं । चित्प्रचुर किरणमार्तांडं । शिव हर जय जय जय ॥ २ ॥

---

## श्रीरामाचें पद

### पद ६६

( राग—जोगिया. ताल—धुमाळी. )

कोठवर धीर धरूं काय करूं हे रामा । स्फुंदु स्फुंदुं आळवीतें । आठवुनी तव नामा । चिन्मार्तांड वंश जानकीनिधि सुखचंद्रा । संकटीं सोडवी अबला ने तुझ्या निज धामा ॥ १ ॥

## श्रीहनुमानपर पदें

### पद ६७

( राग—अल्हैया बिलावल. ताल—झपताल. )

नमो घोरतर कालाग्निरूद्ररूपा । कोटि विद्युज्वलद्वीरभूपा ॥ धृ० ॥ रक्ताक्षि कटकटोल्हासकृत दंतरव । पुच्छकृत फटफटोड्डाणशूरा । भूतवेताल गण पादनख सेविता । सौमित्र जीवनाधार धीरा ॥ १ ॥ विश्वबल दैत्य सुर दानवां प्राण तूं । मंत्रफलदानैकबद्ध दीक्षा । वज्रांग वज्रनख कालकालांतका । अपमृत्यु दैन्य रोगारि भक्षा ॥ २ ॥ एकमुख पंच एकादशानन हरे । त्राहि मां पाहि अति संकट त्राता । माणिक क्षेत्राभिमान रक्षणदक्ष । पूर्ण चिन्मार्तांड कामफलदाता ॥ ३ ॥

### पद ६८

( राग–लंका सारंग ताल–धमार. )

घोर हनुमान महागड लंका जलावत लेत सारंगसुखतान ॥ धृ० ॥ तीख निनाद ज्वाला धडक उठी । स्वरित तारमों गान ॥ १ ॥ नादब्रह्म दैवत सब सिद्धि । ध्यान जोग गुरुमुख जोहि पावे । भुगति मुगति कैलासधाम मिले । चिन्मार्तांड प्रमाण ॥ २ ॥

### पद ६९

पंचरत्नरागमाला. ( ताल—ख्याल. )

विहाग । अवघा मीच रे आत्मा । मालकंस । सृष्टिस्थिति लय कारण । अनंत विश्वरूप धृत पंचभूत गुण साम्य ही माया ॥ धृ०॥ वसंत । जीव

शिवबंधन अवस्था। स्थूल सूक्ष्म कारण महाकारण पंचकोश। मालकंस। सकल चराचर दृश्यपूर्ण परब्रह्म सनातन ॥ १ ॥ परज। गणेश शारदा सूर्य सदाशिव विरंची मुनि गंधर्व सिद्धगण। सोहनी। ज्ञानरूप मार्तंड गुरु मार्तांड अवधूत स्वरूप चैतन्य सनातन ॥ २ ॥

पद ७०

( राग—तोडी. ताल—त्रिताल. )

तो सविता मी ध्यातों। जो कां सकल जीव जगसतिसी प्रेरक हा ॥ धृ० ॥ प्रणवस्वरूप सतज्ञान नित्य हा जो करी स्थिति लय घन निजसुख तमहर अति तेजस्वी स्वरूप गायत्री स्तवित गुरुमाणिक हा ॥ १ ॥

पद ७१

( राग—वसंत. ताल—त्रिताल. )

हा गे आला भगवंत वसंत ऋतु। त्रिकांड पूर्ण कर्मफलदाता। वनश्री या सुप्रसन्न बोलती। 'नाथ सखे त्वं विजय जयतु ते'॥ अंतरा ॥ धर्म अर्थ आणि काम त्रिविध पुरुपार्थप्रद ईशसुख निधान ज्ञानरूप मार्तांड अचल धन निजानंदबीज मंगलप्रभु ॥ १ ॥

---

## वेदांतपर पदें

पद ७२

( राग—पीलु. ताल—धुमाळी. )

आत्मा एकचि सर्वांतरीं हो। आम्हां कोण शैव वैष्णव हो। आम्ही सकलमतां वंदूं हो ॥ चाल ॥ चेतनीं त्रिविध भेदाचा लेशही नाहीं। हा स्वानुभव घेऊं आम्ही बाई ॥ १ ॥ आत्मा मतधर्मींही ( शैव भागवत ) नाहीं। या जडभूतां मीपण नाहीं। अवघा घातक भ्रम हा बाई ॥ चाल ॥ या कोशा सोडूं जसा कीटक सोडुनि जाई। तरि खचितचि मुक्त आम्ही बाई ॥ २ ॥ प्रिय ( जन ) हो, जो तुमचा प्रिय आत्मा। विठ्ठल शिव भगवति तो आत्मा। आम्हां तोचि वंद्य जगदात्मा ॥ चाल ॥ महावाक्या शोधूं जेथें भेदमत नाहीं। मग घेऊं आत्मसुख बाई ॥ ३ ॥ फळल्या

बहुपुण्याच्या गांठी । शिणले वेदशास्त्र यासाठीं । हें सुख नाहीं स्वर्गीं वैकुंठीं ॥ चाल ॥ चेतनीं दृश्य जड भेद हा वितळुनि जाई । जग अवघें चिन्मय बाई ॥ ४ ॥ जन हो हें जग आपणचि होऊं । आपणां आपणचि गाऊं ध्याऊं । निशिदिनिं हेंच गीत आम्ही गाऊं ॥ चाल ॥ तमनाशक चिन्मार्तांड उगवला बाई । या सौख्या अंतचि नाहीं ॥ ५ ॥

## पद ७३

(राग—मांड. ताल—केहरवा.)

स्वरूपीं हें मन सुख सेवो । सहज सुख सेवो । स्वरूप सुख सेवो । किं आत्मसुख सेवो । विषय त्यजुनी एकांत स्वरूपसुख सेवो ॥ धृ० ॥ विमल विपुल घन निजानंद हा नित्यप्राप्त स्वानंद । स्वरूप सुख सेवो ॥१॥ चिन्मार्तांडोदयानंद हा हाचि त्रिभुवनानंद । स्वरूपसुख सेवो ॥२॥

## पद ७४

(राग–अल्हैया बिलावल. ताल–झंपा.)

नमो पुर्ण सुखभरित चैतन्यधामा । सच्चिदानंद गुरु सार्वभौमा ॥धृ०॥ एक सद्वस्तु घन अविट अज निजरूप । अनृतमय जगदखिल भावशून्या । सिद्ध सिद्धांतपर सूक्ष्मतर निर्मला । निष्कला स्वानुभव वेदमान्या ॥ १ ॥ पंचभूत त्रिगुणरहित गुणसाम्यसम । विषम अति शांति गुज निर्विकारा । योगिजन साम्राज्यपट अतिमौनपद । भूत भवदृश्य संसारसारा ॥ २ ॥ निश्चल निरालंब निर्विकल्पाकाश । निगमनत नेति नेतीति शुद्धातिनित्य नूतन निजानंद गुरु अवधूत । निरतिशय ज्ञानमार्तांड बोधा ॥ ३ ॥

## पद ७५

(राग-भूप. ताल-दीपचंदी.)

जीव हा कलंक कधीं झडेल झडेल ॥धृ०॥ भेदबुद्धि घालवी हे दृश्य बंध तोडवी । तें गुरुवाक्य कानीं कधीं पडेल पडेल ॥ १ ॥ मायाकृत संसृति सुख दुःख जन्ममरण । भ्रांति सुमति मिथ्यत्व कधीं जडेल जडेल ॥ २ ॥ सच्चित्सुख घनानंद एकाकी निस्तरंग । स्वस्वरूपसंग कधीं घडेल घडेल ॥ ३ ॥ बहुत जन्म सुकृत पूर्वपुण्य फळेल । तरि दृष्टि ज्ञान ज्ञानरूप मार्तांड पडेल पडेल ॥ ४ ॥

पद ७६

( राग--बागेश्री बहार. ताल-एकका. )

कां तुला स्थूल हें पहाण्याची चटक लागली। नेति नेतीति श्रुति वदतां बहु भागली ॥ धृ० ॥ पहा कीं या पंचभूतां शोधुनी मनिं हें जाणा। आत्मसत्ता ही सकल नामरूपीं फांकली ॥ १ ॥ हृदयाकाशीं उठते त्रिपुटिसहित वासना। विषय साक्षित्व गुणें स्वरूपस्थिति ही झांकली ॥२॥ ज्ञानमार्तांडकृपें मीपण ग्रंथी खोला। देहिंच भेटेल निर्विकल्प माउली ॥३॥

पद ७७

( राग--यमन जिल्हा. ताल-त्रिताल. )

कोण समाधी कशी ही सांगा। यमनियमासन योग अष्टांगा ॥ धृ० ॥
मन प्राणा जो जाणुनी आवरी। तो तूं खरा कीं मायिक विवरी ॥ १ ॥
स्वप्नीं जरि हा इशहि झाला। कोण पुसे त्या तुच्छ सुखाला ॥ २ ॥
विना योगशक्ति हठ विद्या। स्वप्नीं कशा वळती ह्या सिध्या ॥ ३ ॥
विश्वरूप धरुनी जग रक्षी। सह त्रिपुटी भासक आणि साक्षी ॥ ४ ॥
निमिष काल युग मानुनी कामी। ब्रह्मलोक उत्तरपथ गामी ॥ ५ ॥
भ्रांतिमुखें धरी महाभिमाना। प्रेरक मी जग जीव हे नाना ॥ ६ ॥
दृश्य लोक मायागुण पाही। न्याहाळुनी पाहतां मुळींच नाहीं ॥ ७ ॥
जोंवरि हा भ्रममूळ तुटेना। निर्विकल्प मार्तांड दिसेना ॥ ८ ॥

पद ७८

( राग-छंद. ताल-धुमाळी. )

तुम्ही कसे हो सत्य ज्ञानसनंतं ब्रह्म ॥ धृ० ॥ कोणी कोणा जाणितलें। काय स्वरूपीं मन हें झालें। कवण धर्मीं कवणा आलें। ज्ञानरूप धर्म ॥१॥ जरि ज्ञानरूप तो असता। तरि आपणा अवलोकिता। मिथ्या त्रैकालिक जग म्हणतां। पहा हें वर्म ॥ २ ॥ जेथें अनुभवविना अनुभविता। अविद् विदिताहुनी तो परता। स्फूर्ति स्फोरक स्फुरण ही सत्ता। मायिक कर्म ॥३॥ निर्मलपणें ज्ञान जे म्हणती। सत्य अविनाशा बोलती। सुख दुःख सहित सांगती। सूक्ष्म तें परम ॥ ४ ॥ निमाला ज्ञानरूपमार्तांड। गेला मायादेवीचा बंड। सहज स्वस्वरूप अखंड। हा बोल चरम ॥ ५ ॥

## पद ७९

( राग–यमन जिल्हा. ताल केहरवा. )

अहा मति स्फुरली मजमाजीं ॥ धृ० ॥ श्रमुनि विषयभोग एकांतीं। महामौन निजल्यें पतिशेजीं ॥ १ ॥ हरिहर राजयोग हठसिद्धि। ईश-पदावरि मी इतराजी ॥ २ ॥ चिन्मंडल मार्तांड भुवनीं। निर्विकल्प पतिसी मी हो राजी ॥ ३ ॥

## पद ८०

( राग–काफी. ताल–धुमाळी. )

काय जीवा हा भ्रम आहे। मी ब्रह्म नव्हे तरि जीव आहे। मीपण हें चेतन आहे। परि व्यर्थ मूर्ख जन भ्रमलाहे ॥ धृ०॥ ब्रह्म नव्हे तूं कोण आहे। आणि विषय स्फूर्ति सुख कां आहे। मी म्हणतां जें सुख आहे। हें निजानंद ब्रह्मचि आहे ॥ १ ॥ नरनारी जग कोण आहे। तरि अस्ति भाति आणि प्रिय आहे। नामरूप कल्पित आहे। हा अनुभव सर्व जगां आहे ॥ २ ॥ माया जग कोठें आहे। हें चिन्मार्तांडोदयीं पाहे। भक्त जनांपरि नटलाहे। हा चिन्माणिक एकचि आहे ॥ ३ ॥

## पद ८१

( राग–पिलु. ताल–धुमाळी. )

मीपण गेल्या हा देह जावो वा चिर राहो। विकल्प गेल्या मग द्वैत पाहो अद्वैत होवो ॥ धृ० ॥ देहाभिमान गेल्या शैव नाहीं वा वैष्णव नाहीं। निःसंग ब्रह्मासी नाम नाहीं वा रूप नाहीं ॥ १ ॥ फलचि नाहीं तेथें कर्म नाहीं मूलधर्म नाहीं। झालाचि नाहीं त्या जन्म नाहीं वा मृत्यु नाहीं ॥ २ ॥ द्रष्टाचि नाहीं तेथें दृश्य नाहीं ना ज्ञान नाहीं। भ्रांति ही गेल्या कोणी बद्ध नाहीं ना मुक्त नाहीं ॥ ३ ॥ अनुभवीं या संन्यास नाहीं ना भोग नाहीं। लटक्या व्यवहारीं निषेध नाहीं ना विधि नाहीं ॥ ४ ॥ स्फूर्तिच नाहीं तेथें वेद नाहीं ना शास्त्र नाहीं। दुर्वाद घेतां अनुभव नाहीं ना सौख्य नाहीं ॥ ५ ॥ मुळींच नाहीं त्या नांव नाहीं ना रूप नाहीं। ज्ञानमार्तांडा उदय नाहीं ना अस्त नाहीं ॥ ६ ॥

## पद ८२

(राग–झिंझूटी. ताल–त्रिताल.)

दृश्य पाहूं जातां ब्रह्मचि हें दिसतें । खचित बाइ चिद्रूप हें दिसतें। खचित बाई सद्रूप हें दिसतें ॥ ख० ॥ प्रिय रूप हें दिसतें ॥ धृ० ॥ अमित गोल जडभूत शोधितां । चित्सत्ता कळते ॥ १ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति जाणतें । एकचि चेतन तें ॥ २ ॥ इन्द्रियभोग विषयीं जें सुख तें । निजानंद स्फुरतें ॥ ३ ॥ यापरि सकल जगासि शोधितां । चिदानंद गमतें ॥ ४ ॥ सत्सुख चिन्मार्तांड स्वरूपीं । मृगनल हें नटतें ॥ ५ ॥

## पद ८३

(राग–जोगिया. ताल–धुमाळी.)

किति जनासी भ्रम हा झाला । मी ब्रह्म न कळे जीवाला ॥ धृ० ॥ जे सच्चिदानंद म्हणती । ते अस्ति भाति आणि प्रीति । जन विषय हेचि अनुभविती । कल्पिती नामरूपाला ॥ १ ॥ सर्वांतरीं एकचि साक्षी । जो बंध मोक्ष अनुलक्षी । जो मूला ज्ञाना भक्षी । सिद्धांत पूर्वपक्षी । कोण लपवील मार्तांडाला ॥ २ ॥

## पद ८४

(राग–झिंझूटी. ताल–दादरा.)

नाहीं नाहीं हें जग, पूर्ण ब्रह्म रे । निरालंबीं कैंचा हा भ्रम बंध रे ॥धृ०॥ आहे भासे जें प्रिय पंचभूत रे । भूतरूपें नटतो अवधूत रे ॥ १ ॥ बोध मार्तांड हा संतां गोड रे । आहे आहे सुदैव लाभ जोड रे ॥ २ ॥

## पद ८५

(राग–परज. ताल–दादरा.)

नाहीं आम्हां दृश्यबंध हो । आम्ही ब्रह्म हो । अहं ब्रह्म हो ॥ धृ० ॥ सूक्ष्म देह जल कुंभ हो, आत्मबिंब हो । प्रतिबिंब हो बिंवा बंध मोक्ष दंभ हो, निरालंब हो, मोक्षस्तंभ हो ॥ चाल ॥ आत्मप्रकाशें शिव जीव भासे । वाच्यांश नासें लक्ष्यांश गवसे । हेंचि महावाक्य वर्म हो । आम्ही ब्रह्म हो ॥ १ ॥ बोध भाग्य झेंडा मिरविला, संत सोहळा, चिन्मार्तांड

हा उगवला । मोह फांकला हर्ष मातला ॥ चाल ॥ जलिं बुद्बुद बुद्बुदीं जल हें । ब्रह्मी दृश्य हें दृश्यीं ब्रह्म हें । सकलमता हाचि धर्म हो । आम्ही ब्रह्म हो ॥ २ ॥

## पद ८६

( राग—जोगिया. ताल—धुमाळी. )

एकमेवाद्वितीयं ब्रह्म । नाहीं जीवा बंध मोक्ष धर्म ॥ धृ० ॥ जीव दृश्या अनादि जे म्हणती । तर्क युक्त्या द्वैत स्थापिती । क्रोधें क्षोभोनि वेद शापीती । जन्म जन्मीं मरती घेती जन्म ॥ १ ॥ नाहीं साधन धन मेळविलें । संत चरणासी नाहीं आदरिलें । ब्रह्मनिष्ठा शरण नाहीं गेले । नाहीं शोधीले महावाक्यवर्म ॥ २ ॥ आम्ही सकलमती अवधूत । द्वैतीं नांदोनियां अद्वैत । विश्वप्रकाश आम्ही विश्वातीत । आम्हां नाहीं विकर्म कर्माकर्म ॥ ३ ॥ पिंड ब्रह्मांड उदंड भेद । नाहीं चैतन्य सत्ता विरोध । सत्य अवधूत मार्तंड बोध ब्रह्मीं भ्रम हे भ्रमचि पूर्ण ब्रह्म ॥ ४ ॥

## पद ८७

( राग—जोगिया. ताल—धुमाळी. )

गुज गुज गुज गुज आहे रे बा । हें संत मुखीं तुज कळेल बा ॥ धृ० ॥ एक चिदाकाश आहे रे बा । मग मायिक गारुड रचिलें रे बा । तिथें अनंत शरिरें दिसती रे बा । शुद्ध सत्व रज तामस बा । देहीं अहंपण मीपण बा । हेंचि जिवासी जीवपण बा ॥ १ ॥ कोण बद्ध कोण मुक्त रे बा । भूत ( तत्त्व ) जाल जग नटलें र बा । तम विलास बंध रे बा । शुद्ध सत्त्वगुण मोक्ष रे बा । बंध दुःख ब्रह्मानंद बा । स्वरूपीं हे मल ( स्वस्वरूपीं हे ) नाहींच बा ॥ २ ॥ मोहरात्र ही सरली रे बा । चिन्मार्तांडोदय झाला रे बा । नित्यमुक्त हें विश्व रे बा । नित्यमुक्त आम्हीं ब्रह्म रे बा । माया शब्द हे नाहींच बा । आदि अंतीं गुरु अवधूत बा । ( घन अखंड एक गुरु अवधूत बा ) ॥ ३ ॥

## पद ८८

( राग—कानडा. ताल—धीमा त्रिताल. )

किति सुख हें किती किति सुख हें । हरिहराचेंहि हितगुज हें ॥ धृ० ॥ कपिल जनक जडभरत दिगंबर । वामदेव शुक धन हें ॥ १ ॥ महावाक्य श्रवण मनन साधन । स्वानुभवसार निज हें ॥ २ ॥ तुर्या उन्मनि सुलीन समाधी । चरमवृत्ति भूषण हें ॥ ३ ॥ सच्चित्सुख माणिक मार्तांडा । पूर्ण गुरुकृपा फल हें ॥ ४ ॥

## पद ८९

( राग—कानडा. ताल—धीमा त्रिताल. )

अहा अहा अहाहा । अनादि एक घन अज अचल । मी एक घन अज अचल अमृतधाम, अकाम, नामरूप सोडुनियां, सदानंद सकल निगमाधार अपार पार सार निराकार परिपूर्णकाम झालों । स्वरूपीं निमालों । अविट धन ल्यालों, किति सुख अहा ॥ धृ० ॥ ज्ञानरूपचिन्मार्तांड गुरू कृपाही असुनी, पंचभूत दृश्य जगसंसार असार देह परी हे नाहींसे झाले स्वरूपचि उरले, काय हे हो फळले, भव सरले, भय हरले, गुजभरले, मन धाले, मन धाले, मन धाले, ॥ १ ॥

## पद ९०

( राग—पूर्वी. ताल—त्रिताल )

नाहीं स्वरूपीं मी ब्रह्म हा ताठा । वृत्तीच्या लाटा । जाशी घेण्या अनुभव या वाटा । तरि उरेल कांटा । स्फुर्ति स्फुरण स्फोरकता गाळुनी । निर्विकल्प स्वस्वरूप गांठा ॥ धृ० ॥ भागा त्यागुनी जरी चिदंश घेसी, मी ब्रह्म म्हणसी । घेतां अनुभव तूं आणीक होसी स्वस्वरूप नव्हसी । ब्रह्माकारवृत्तीनें अनुभव घेसी । तरि तो अनुभव खोटा ॥ १ ॥ बा रे जाणण्यांत स्वरूप अढळे जाणीवा वेगळें । स्वरूपीं वृत्ति ही कदापि न मिळे । स्वस्वरूप न ढळे । सहज नित्य स्वस्वरूप असती । जाळिसि जरि हा अनुभव फांटा ॥ २ ॥ आरोपिसी मायिक या स्फुरणासी, तरी साक्षी । होसी । जागा होउनि जरी विचार करिसी । निर्विकल्प असती । ज्ञानरूप मार्तांड प्रतापें वृत्ति सोडुनि वस्तुसी भेटा ॥ ३ ॥

## पद ९१

( राग–पिलु. ताल–धुमाळी. )

अरे अरे तूं या जगीं रहिवासी, सुखवासी। जीवा सोडी तूं अहंता ही रे फांशी ॥धृ०॥ जीवा रे जन्मदुःख जरी आठव करिसी। योनीमुखीं मलमूत्र भक्षिसी। प्राग रोधुनी बहु तळमळसी। मग तिथें जगदीशा स्मरसी। बहु दीनवाणी भाकिसी। बाहेर पडतां निज माता पितामुख पाहुनि त्वरित मग जगदीशा भुलसी ॥ १ ॥ जीवा रे धनमदगर्व सुखांत लुब्धसी। अस्थिमांसमय स्त्रिया पहासी। चंद्रमुखी ग तूं अतिप्रिय म्हणसी। मरणसमय संकट नाठविसी। दुर्मिळ वय हें घालविसी। यमसदनांतुनि मुक्त न होसी। जरि पतित निज बहु कष्ट योनि तूं पावसी ॥ २ ॥ जीवा रे कोण मी कैंचा कोठुनी आलों। किति जन्म भवदुःख सोशिलों। मनुष्य जन्म असार्थक केलों। या उपदेशा मानिसी। ज्ञानरूप मार्तांड प्रतापें, पूर्ण बोध अतितर घन निजसुख भोगिसी ॥ ३ ॥

## पद ९२

( राग–भैरवी. ताल–त्रिताल. पंजाबी. )

सख्या हा वैभव दो दिवसांचा। कनक कांति मदनाचा ॥ धृ० ॥ क्षणक्षणा आयुष्य जात हें वाया। समय कठिण मरणाचा ॥ १ ॥ नाशवंत जग क्षणिक दृश्य हें मनिं आठव धरी याचा ॥ २ ॥ ज्ञानरूप मार्तांड कृपेनें चिन्माणिक भेटेल साचा ॥ ३ ॥

## पद ९३

( राग–सारंग. ताल—धुमाळी. )

मी पूर्णकाम सच्चिदानंद जाहलों। मी आप्तकाज सच्चि०। कैवल्य धाम योगिविश्राम सच्चि०। मजमाजि मज पाहातां सहजीं सहज सच्चि० ॥ धृ० ॥ भूतपंचकीं पाहातां आहे अस्तिता। जीवशिवासी शोधितां भासे भास्यता। विषयानंदीं जी प्रेरता ती आत्मसत्ता। नाम रूपाचें वर्म पाहतां अवघें हें ब्रह्म ॥ १ ॥ माया दुर्घट लक्षण ऐका ती खूण। नसोनियां हि

भासणें भासे तें नसणें। जीवा हें जन्ममरण शिवमुक्त म्हणणें। मिथ्या मायेचा धर्म जाणोनियां गुजकर्म ॥ २ ॥ जाणीवा नेणुनीयां नेणीवा ग्रासुनियां पाहतां आपणां आपण तेंचि आपण। लेणें ना अनुभवणें ना मौनपण। निःसंग आत्माराम निर्विकल्प धाम ॥ ३ ॥ दृष्टि सृष्टींत मुरली सृष्टीच दृष्टि झाली। चिन्मार्तांड मंडल जेव्हां उगवलें, भ्रम तें ब्रह्म झालें। हें काय नवल द्वैताद्वैत तें सरलें। आहे तें उरलें। गेलें माणिक नाम, उरलें आनंद धाम। वाच्य तें अनिर्वाच्य, अनिर्वाच्य तें वाच्य ॥ ४ ॥

## पद ९४

( राग—परज. ताल—धुमाळी. )

जन चला चला गुज पाहण्या हो॥धृ०॥ पुनरपि जननमरण हे चुकवुनीं। स्वरूपीं निज सुख घेण्या हो ॥१॥ श्रीगुरूनीं त्या जनक शुका जे। लेवविले. प्रिय लेण्या हो ॥ २ ॥ ज्ञानरूप मार्तांड प्रभू। श्रीमाणिक आपणचि होण्या हो ॥ ३ ॥

## पद ९५

( राग—आनंदभैरवी. ताल—केरवा. )

ऐका सावध विद्वज्जन हो, महानुभव पंडित मुनिवर हो। ब्रह्मी सकल दृश्य जग भ्रम हो। हीच कथा सावध ऐका ॥ धृ० ॥ भ्रम सामुग्री बहुत विध जाणा। मत अद्वैत पूर्ण मनिं आणा। असत्ख्याति सत्ख्याति आत्मख्याति मानूं नका ॥ १ ॥ ख्याति अनिर्वचनीय हे माना। सदसद्रुप विलक्षण जाणा। मिथ्या त्रैकालिक जग उमजाना। तरि हो श्रुतिसच्छास्त्र पहाना ॥ २ ॥ विषयाच्या सामान्य ज्ञानें। आत्माश्रयता ज्ञान क्षोभानें। सर्वाकृति होउनिया दिसणें। आणिक जाणणें होत पहाना ॥ ३ ॥ अंतःकरण इंद्रिय द्वारा। विषयाकृतिकृत समानधारा। मग उद्बोधें पूर्व संस्कारा सह विषयाकृति होत पहा ॥ ४ ॥ ज्ञानासह ती सर्पाकृति हो। पूर्ण अविद्याजन्य पहा हो। म्हणुनि ज्ञान विरोधि भ्रम हो। हाचि मुख्य सिद्धांत पाहा ॥ ५ ॥ भ्रमस्थलीं जे पदार्थ दिसती। अधिष्ठान सत्तेनें स्फुरती। ज्ञान बोध सत्तेनें राहती। अधिष्ठान रूपचि सदा ॥ ६ ॥ चिद्वि-

वर्त जगपंचभूत हे । उपादान अज्ञानजन्य हे । ज्ञानें निखिल बोध होत हे । ब्रह्मरूप अद्वैत सदा ॥ ७ ॥ कवण शिष्य उपदेश गुरू हो । निर्विकल्प धन एक ब्रह्म हो । ज्ञानरूप मार्तांड गुरू हो । श्रीमाणिक अवधूत सदा ॥ ८ ॥

## पद ९६

( राग–पूर्वी. ताल–दीपचंदी. )

ब्रह्म रे जीवा ब्रह्म रे । तूंचि ब्रह्म म्हणुनि बोल ती श्रुति रे ॥ धृ० ॥ शब्द ज्ञान हें नेत्रासि नाहीं । रूप जाणणें श्रोत्रास नाहीं । शब्द रूप याली साक्षित्व नाहीं । तूंचि साक्षी अन्य साक्षी तो नाहीं ॥ १ ॥ स्वप्न भोग हा जागृतीं नाहीं । जागृती सुख दुःख स्वप्नींही नाहीं । जागृती स्वप्न सुषुप्तींत पाही ॥ २ ॥ नाद धर्म तो बिंदूसि नाहीं । बिंदु धर्म तो नादासी नाहीं । बिंदु कला नादी जाणणें नाहीं । तूंची साक्षी० ॥ ३ ॥ देव निजात्मा भक्त तो पाही । भक्तात्मा हा देवचि पाही । देवाभक्ता मुळीं भेद तो नाहीं । चिन्माणिक हा मार्तांड पाहीं । तूंची साक्षी० ॥ ४ ॥

## पद ९७

( ताल–धुमाळी. )

श्रुतिधर्म रक्षुनि सकल मतातें वंदा । सर्वांतरिं आत्मा नको कुणाची निंदा ॥ धृ० ॥ नाटकी जसा बहुवेष नटुनि करी छंदा । जगदीश ही नटतो निजप्रिय ध्याना नंदा ( भक्तांच्या आनंदा ) ॥ चाल ॥ किती तीर्थ अमंगल सरिता सागरीं । भिसळती शब्द बहु भाषा वैखरी । जग ब्रह्म ब्रह्म जग वेषा हो धरी । मृगजलीं रूप मार्तंड रूपांतरीं । अद्वैत बोधु आम्हीं हाचि हो आमुचा धंदा । हें सत्यासत्य तूं जाणशी हरि गोविंदा ॥ १ ॥

## पद ९८

( राग–पिलु. ताल––धुमाळी. )

कधिं पाहिन मीं माझ्या स्वस्वरूपाला । आनंदपूर्ण ब्रह्माला । कधिं बोधिल हा भवमोचक गुरू मजला । ऐकेन मी महावाक्याला ॥ धृ० ॥ आज दिपवाळी जन्म दिवस उगवला । भेटला कीं श्रीगुरु मजला ॥ १ ॥

बहु जन्माचा भाग्योदय हा झाला । जीव ब्रह्मरूप शिव झाला ॥ चाल ॥ किती वर्णूं मी सुख हें अहाहा । संगीत साम हा ऊ हा । धन्य धन्य बोधक गुरू हा । मिठि घालीन मीं पर शिवघन सच्चित्सुख रूपाला । ज्ञानरूप मार्तंडाला ॥ २ ॥

पद ९९

( राग—अल्हैया बिलावल. ताल—झंपा. )

दुःख स्थिर भोग हा नाहीं मजला । निद्रासुखें नित्य प्राणि रमला ॥ धृ०॥ वृत्ति दुःखाकार जोंवरी, तोंवरीं कुष्ठ व्रण दाहादि स्वानुभव सांगे। देहीं व्रण असुनियां वृत्तिलय झालिया, सहज स्वानंद सुखी शांत गमला ॥ १ ॥ काष्ठ कृत गोव्याघ्र पाहत ज्ञानाऽज्ञानि भयभीत ज्ञानिजन सानंद क्रीडे । ईश, सूर, मुनिजन्म, विश्व सौख्यादेत। मज मृत्यु मी देही मानुनी शिणला ॥ २ ॥ दुःख विपरीत सुख शांति क्रोधा वैर। तेज तमवैर हा स्पष्ट भासे । हीन बलि भयचकित रण वीर देह त्यजित वृत्ति गुण दोष हा पूर्ण ठसला ॥ ३ ॥ वृत्ति व्यापार सह, वृत्तिस्थिति लय जन्म । भासवी जाणता मी चिदात्मा । वृत्तिभोगी दुःख, ती क्षणिक मी अमर । नित्य निरपेक्ष चिन्मार्तांड स्फुरला ॥ ४ ॥

पद १००

( राग—जोगिया. ताल—धुमाळी. )

अहमस्मी ब्रह्माहमस्मी । महावाक्योपदेश विधि कस्मै ॥ धृ० ॥ ब्रह्म सच्चिद्घनानंद शीलं । नास्ति नासीदितिमाया जालं । यस्य बोधेच्छा ज्ञानमूलं । घटाटोपोयमर्थं दोतस्मै ॥ १ ॥ कस्य किमोपासको पास्यम् । एक मेवेति वेद सामरस्यम् । चिन्मार्तंडो व्यास्तेति हास्यम् । स्वस्मिन स्वरूप लाभोपि स्वस्मै ॥ २ ॥

पद १०१

( राग—जोगिया जिल्हा. ताल—दीपचंदी. )

न साक्षी नापि देहिनो वसिष्ठः । शिवोहं भोऽवधूतोहं शिवोहं ॥धृ०॥ न साक्षी नापि देहिनो वसिष्ठः । शिवोहं ... 

गुरु जंगम लिंगैक्यादि वेको । अविद्या धूलि तीर्थ साड वेको । प्रसादा

बोध कोंडु नीड बेको। तांइहु इह्लधांगे आग बेको। महा मंत्रार्थजपउ सोहं सोहं। शिवोहं भो ॥ १ ॥ न सालिक न आपक सालिक कु सुश्री कुफ्र है, खुदा है खुदा हैं तू। मुकामे लाहूत जबरूत मलकूत। फना है सब न महजीद कावा और बुतखाना है तूं। चिराग है तूं ॥ २ ॥

## पद १०२

(राग—पिलु. ताल—धुमाळी.)

आम्हीं चुकलों निज हित कामा। तूं चुकूं नको आत्मारामा ॥ धृ० ॥ निज प्रकाशें अखंड जळसी। मीपणीं स्वतेजें स्फुरसी। क्षितिभूत गोल हे सृजसी : या जीवा जागृति देशी। हा आत्मशक्तिचा महिमा ॥ १ ॥ विषयावर धांवे वृत्ति। जरि स्फुरे आत्म चित्स्फूर्ति। होतसे भोग संपूर्ति। वर्णिती वेद तव कीर्ति। तूं भोक्ता जगिं जगदात्मा ॥ २ ॥ जागृति भोग हा क्रमिला। कल्पीत प्रपंचीं रमला। बहुरूपीं एकच नटला। नोळखे आत्मशक्तीला। भोगत्रय एक चिदात्मा ॥ ३ ॥ कोण मी नकळे अज्ञानी। शरणागत विद्वच्चरणीं। बोधामृत पडलें श्रवणीं। मी धन्य मी ब्रह्मज्ञानी। बहुरंगी हा सर्वात्मा ॥ ४ ॥ श्री सकल मत प्रभु आले। स्मित हास्यें वचने वदले। कोण बद्ध मुक्त जगिं झाले। नसतेंचि नाहिंसें झाले। नित्य मुक्त सहज सुख सीमा ॥ ५ ॥ मंगलादि मंगलशक्ति। मंगल मुख मानसवृत्ति। मंगलशिव मायिक स्फूर्ति। मंगला हो सहज स्थिति मुक्ति। मंगलरूपी मंगलधामा ॥ ६ ॥ आळवी तूं चेतन देवा। हाक देई धांवा धांवा। घ्या सहज मुक्तिचा ठेवा। जरि जन्मांतरीं घ्या सेवा। पुर्णादि पूर्ण परमात्मा ॥ ७ ॥ मार्तंड प्रभें तम हरले। धुंडितां जीवभ्रम न मिळे। ब्रह्म गान श्रवणीं रुचलें। ज्ञानाब्धि सहजचि उसळे। सच्चित्सुख जगदभिरामा। तूं चुकूं नको आत्मारामा ॥ ८ ॥

## पद १०३

(राग—परज. ताल—केहरवा.)

नेति नेति नाहीं येथें शास्त्रप्रसंग। आत्मा असंग। नको कुसंग। साधुचा संग मन बुद्धि चित्त वागीचा नाहीं आम्हा संग ॥ धृ० ॥

आम्हीं कुटस्थ देहा जन्म आहे । जलीं आकाश अलिप्त राहे । ज्ञानरूपीं ज्ञातता न साहे । येथें पाहिजे जातीचे स्वानुभव अंग । साधुचा संग ॥१॥ आम्हीं जन्मोनि नाहीं जन्म आम्हां । वृद्धि सूतक नाहीं स्वप्न जन्मा । शब्द संबंध नाहीं परब्रह्मा । चिन्मार्तान्ड जलिं जग भासे तरंग । नको कुसंग ॥ २ ॥ बहुपुण्य हा दिन उगवला । शिव साम्राज्य पदीं जीव आला । आहा आनंदी आनंद झाला । खेळूं गुलाल श्रीगुरुपूर्ण बोधाचा रंग । आत्मा असंग ॥ ३ ॥

## पद १०४

( राग–काफी जिल्हा. ताल–केहरवा. )

एक चिदाकाश आत्मा आहे । प्रतिदेही मी मी म्हणताहे । मी पणीं भाग त्याग विवरा । याच देहीं जीव ब्रह्म करा । जीव कुटस्थ ईश ब्रह्मरूपा । नाहीं नाहीं नाहीं भेद बापा । वृत्ति मावळे दुजिया वृत्ति नाहीं । तंव तुझे साम्राज्य सुख स्पष्ट येई । ज्ञानमार्तांड जगीं प्रगटला । आत्मबोध सुखाचा सुकाळ झाला । संतबोध सुखाचा । ज्ञान बोध सु० ॥ १ ॥

## पद १०५

( राग–यमन जिल्हा. ताल–धुमाळी. )

अहा एकचि चेतन जगीं, पिंडीं व्यापक जीव म्हणती ब्रह्मांडीं ईश शिव योगी ॥ धृ० ॥ उठति स्फूर्ति वृत्ति ज्या मनीं ( मी मी ) । चेतन तुम्हीं वृत्तीसी जाणतां । मग म्हणतां आम्ही तुम्ही । अघटित सर्व शक्ति चेतनीं । चिदाकाशीं स्वस्वरूपें नटतां ( माया रूपें नटतां ) भूत पंच बहुगुणी । भूत रसें देह पुरुष कामिनीं । देहीं पूर्ण कुटस्थ म्हणती चैतन्य ब्रह्म त्रिभुवनीं ॥ चाल॥ तेजी तेजाचे देह निपजति । बुद्धि मन चित्त दंभ अहंकृती । वासना रज तम सत्वाकृती । कल्पना रज तम० । साक्षि तुम्हीं वृत्ति उदय लय स्थिती । मायाधीश तुम्हीं तुमच्या स्तवनीं, वेदही बसले उगी ॥१॥ अहाहा किती जग नाटक भुली (पडली तुम्हां कि०) । सिंह गर्जनें आपुल्या भितो, रवि बुडतो मृगजलीं । स्वप्नीं मृत पतिका

( सुवासिनी ) विधवा झाली । जाळील तेज काय आकाशा (अवकाशा)। तरंग सागर गिळी। सुवर्णची पूर्ण कटक कुंडली । सहज विनोदें चिदाकृति तुमची। विश्वाकृति उसळली ॥ चाल ॥ निद्रानंदीं प्रपंच बुडाला। तो चिद्रुपें जागृतीं नटला। पिंड ब्रह्मांड भेद हा गेला। ब्रह्म साम्राज्य पदिं जीव आला। बोध मार्तांड तप यज्ञामृता सकलमती फलभागी ॥ २ ॥

## पद १०६

( राग–झिंझूटी. ताल–धुमाळी. )

गुरुवचनाकानीं घेऊं । या जगीं अखंड ( आम्ही-तुम्ही ) मुक्तचि राहूं ॥ धृ० ॥ शरीर हें पंच भूतांचें बनलें। काल स्वभाव कर्में रचिले। स्वस्वरूपीं मायिक हे नटले । साक्षिपणें आम्हीं पाहूं ॥ १ ॥ जग हा पंचभुतांचा सांठा । कोण शैव वैष्णव हा ताठा। क्षणिक अहंवृत्तिच्या लाटा। निश्चलात्मक रूप गाऊं ॥ २ ॥ नको दृश्य जग नाश वासना। समाधि उन्मनी स्थिती ही नाना। स्वरूपीं भव संबंध कल्पना। सहज स्थिति सुख सेवूं ॥ ३ ॥ बोध ज्ञान मार्तांड उगवला। अभेद मति दे जडजीवाला । जय हो जो प्रभू सकल मताला। चिन्माणिक आम्ही होऊं ॥ ४ ॥

## पद १०७

( राग–यमन जिल्हा. ताल—धुमाळी. )

असा गुरुमंत्र। तुटे समुळ संसृतिसूत्र ॥ धृ० ॥ दिधले मंत्र हे वसिष्ठ रामा। सांदिपन तोहि घन:श्यामा । उद्धव गेला निजात्मधामा। हरि प्रिय पात्र ॥ १ ॥ मंत्र हे स्फुरले आदिब्रह्माला। नारायण उपदेशी विधिला ॥ ध्यानीं गवसे मुनि महाकपिला। वाक्य पवित्र ॥ २ ॥ मंत्रें चिन्मार्तांड प्रकाशे। विद्यालयीं ही अविद्या नासे॥ देहीं सहज मुक्ति ती गवसे। दिगंबर गात्र उरे चिन्मात्र ॥ ३ ॥

## पद १०८

( राग—पिलु. ताल—धुमाळी. )

कां कुणावरी कोप हा बाबा। कां मीपणीं प्रेमा जडला । नरनारी जगदाकृति एकचि । चेतन प्रभू शिवं.हा नटला ॥ धृ० ॥ अनंत प्रकृति

स्वभावरत जन अधमोत्तम विषयीं रमला। न्यायवाक्य श्रीकृष्ण वदे हो, मुनि योगी निग्रही फसला ॥ १ ॥ शुक वसिष्ठ सनकादिक गण हा, जीवन्मुक्ति सुखा शिणला। जीव जंतु निद्रा समयीं हो, सहज मुक्त ब्रह्मीं मुरला ॥ २ ॥ चित्त प्राणाकर्षणीं महंत, देह बुद्धि हटयोगी थकला। नित्य चिदार्पित जग जाणुनि, लय योगी ज्ञानीं बनला ॥ ३ ॥ विदेह मुक्ति प्रारब्धक्षय, वांच्छित ज्ञानीं बहु श्रमला। अलिप्त स्वस्वरूपीं जग स्थिती लय, मानुनि मुनी करी निज लीला ॥४॥ गुण स्वभाव बल काल ज्ञाता, जनहितधर्मा ज्या स्तविला। अन्य कालगुण स्वभावभेदें, अनहित जाणुनि तो त्यजिला ॥ ५ ॥ ईशकृपा वांच्छित स्वस्वमती, वंद्य निंद्य (विधिनिषेध) वचनीं श्रमला। सकल मत प्रभु एक जो जाणें, तो जगिं सकल मतीं नमिला (पूजिला स्तविला) ॥ ६ ॥ मोक्ष सिद्धि सत्कर्म धर्म गुरुशास्त्र जाल बंधनिं विटला। सकलमत स्थापक शिव माणिक, चिन्मार्तंड पदीं मुरला ॥ ७ ॥

## पद १०९

(राग–यमन कल्याण. ताल–धुमाळी)

पंत तुम्ही सच्चित्सुख राजसा। व्यापक सकल घटीं रवी जसा। नकळे तरि श्रीगुरूशीं पुसा। कोण मी सांगा–अहो सांगा ॥ धृ० ॥ अघटित चिन्माया प्रगटली। स्वरूपीं अवकाशा दाविली। तेथें जाणिव ही उमटली। जीव शीव भोगा (प्रकृतिगुण सांगा) ॥ १ ॥ लेणें पंच तत्त्वें घडविलें। ईश्वरा हो लेववुनि सजविले। जीव हें मद्यपान करविले। बनविलें सोंगा–अहो सोंगा ॥ २ ॥ ईश मी जीव मी जग साक्षि मी। सावध, साक्षेपी, दक्ष, मी। सेवक परब्रह्म संत मी। मातला दंगा-अहो दंगा ॥ ३ ॥ मींपण सकल जगीं व्यापिलें। वांचुनि ब्रह्म कोण जाणिले। गोडि गुळावीण अनुभवले। खरें विण रागा–अहो रागा ॥ ४ ॥ मीठ जसें जलांतरिं विघुरले। अभ्र जसें आकाशीं वितळले। मींपण परब्रह्मीं माव-ळलें। क्षुद्र जल गंगा–अहो गंगा ॥ ५ ॥ पर शिव चिन्माणिक माउली। स्फूर्ति ही स्वानुभवें वदविली। छक्कड जन्माची चुकविली। आनंदें गा गा अहो गा गा ॥ ६ ॥ मायेनें खेळ समुळ लपविला। मग अवघा

चिन्माणिक भासला । ( देहिच शिव माणिक भासला ) । ज्ञानघन चिन्मार्तांड उगवला । साधक हो जागा-श्रोते जन जागा ॥ ७ ॥

## पद ११०

( राग–यमन जिल्हा. ताल–धुमाळी. )

कोण जिवाजी सजलां । राव तुम्हीं । ईश जनित जड प्रपंच माझें मी म्हणुनीं फुगलां ॥ धु० ॥ पंत काय वंध्या पोटीं जन्मला । शकजातक जन्मोत्सव आपुला, आपण साजरा केला । पंत तुम्हीं जड कीं चेतन कला । जडासि मीपण चेतना मृत्यु, दिव्य न्याय निवडिला ॥ चाल ॥ मी जड कीं चेतन भ्रांति तुम्हां जरि असे, ( जरी मनिं वसे ) । जडिं क्षुधा तृषा हेतु ( धर्म जाणीव नसे ) वृत्ति जाणीव नसे । मन बुद्धि जाणते हें तरि कळलें कसें । पंत तुम्ही साक्षी जडबुद्धिला । चिज्जड विवेक पंत मिष हा भाष्यगर्भ उघडिला ॥ १ ॥ पंत शवाल जल झांकिलें । जसें हो शैवालें जल झांकिलें । नभिं धनुष्य मेघ रवि झांके स्वाप्निं स्थूल विसरलें । तेथें स्वात्मतेज पालटलें ( स्वस्वरूप पालटलें ) सुवर्णिं कटक कुंडल जैसें अवडंवर रचियलें । ईश्वरा चार देह वर्णिले । जागृति स्वप्न सुपुप्ति तूर्या पंत तुम्हां अनुभवलें ॥ चाल ॥ जरी आहे अहंपण तरिच दुःखभावना । निद्रिता न मीपण मग कैंची यातना । भासक तुम्हीं देहत्रय सहसाक्षीपणा । पंत साक्षिपणही तुर्येला । नको ही जाणिव नेणिव पंत हो लोह हेम शृंखला ॥ २ ॥ पंत कुणी ( कधीं ) स्वात्मनाश पाहिला । सुपुप्ति मीपण जाण रे ऐसा कोण तुम्हां वर दिला । पंत कधिं आत्मा न्याहाळिला । स्वतःसिद्ध प्रेमास्पद आत्मा वेदांतीं वर्णिला । शोधा हितकर महावाक्याला । चिन्मार्तांड पंत रे ऐसा निगम-घोप गर्जला ॥ चाल ॥ तुम्हीं सकलमत प्रेरक प्रतिपादितां । अद्वैत त्रिभुवनानंद श्रीद गाजतां । पंत परब्रह्म भेद मावळला । ऐका पंतोत्सव सत्कीर्तन पुण्य दिवस उगवला ॥ ३ ॥

## पद १११

( राग—यमन जिल्हा. ताल—केहरवा (छक्कड. )

शीवजीवाच रूप आम्हीं फायल ग, ब्रह्म अपन, धनि येकुचि, नाव दिलं वायलं । द्वाड द्वैताच वांग, पंच भुताच ढोंग, बाइल मायेचं सोंग,

आमच्या धन्यान वळच दावलं। गुरू गारुडीच ढोल माजल, वाजल ग, हो सामवेदानच खोट गायल ॥ १ ॥ फांकडु धन्याच खेळ किती वानूं, ग। अपन येकचि दिसे कायनु, बायनु । सांब विष्णु गणेश शक्तिभानू ग । जनीं वनी व्यापक अणुरेणु। लटक आपन तुपन चटकन फुंकून कान। ज्ञान मार्तांडान छक्कड महावाक्य ऐकविल। वाहवा ( अहा ) भ्रमाचा भोंपला फुटल ग । शिव जीवाच गिव्यान सूटलं ॥ २ ॥

## पद ११२

( राग—जोगिया. ताल—धुमाळी. )

धन्य धन्य अति धन्य आम्हीं झालों पूर्णानंद। बंध मोक्ष भ्रम कोण तो जाणें अवघा ब्रह्मानंद ॥ धृ० ॥ जागृति विषयिं सुख जें होतें तोचि विषयानंद। स्वप्नीं अनेक रूपें नटतो तोची वासनानंद ॥ १ ॥ घनींभूत वृत्ति ती सुषुप्ति तोचि योगानंद। मायिक भोग अवस्था पाहतां एकचि निजानंद ॥ २ ॥ महावाक्य बोधें अनुभव जो तोचि विद्यानंद। समाधि-सुख निर्विकल्प योगि तोचि सहजानंद ॥ ३ ॥ वृत्ति स्फूर्ति विरहित जें उरलें तोचि स्वरूपानंद। भुतभेदभ्रम मायिक पाहतां घन अद्वैतानंद ॥ ४ ॥ अनेक क्षण मन उपाधि भेदें अनेक सुख गमलें। शांत रजतम वृत्ति निवृत्ति एकचि सुख भरलें ॥ ५ ॥ ज्ञानरूप मार्तांड उगवतां संशयतम हरलें। चिन्माणिक आम्हीं सर्वही झालों आनंदी आनंद ॥ ६ ॥

## पद ११३

( राग—कालगंडा. ताल—धुमाळी. )

अभाग्याच्या हृदयीं मीपणीं परब्रह्म स्फुरले। परि त्या लोटुनि या जडदेहीं मीपण हें जडलें ॥ धृ० ॥ मी देही जड जीव ज्ञान हें केविं होत समजा। जागृति स्वप्न सुषुप्ति जाणते कोण तुम्हीं उमजा। मन इंद्रिय मुरडोनि प्रेरितां स्वहित विषय काजा। आत्मशक्ति बल सर्व जाणतां म्हणतां मज न कळे ॥ १ ॥ आत्मतेज मन विवर्त कीटक, दृश्य जाल स्फुरवी। ऊर्णनाभि मृगवारी अभ्र जसें कोश पंच नटवी। स्वात्मशक्ति वृत्ति प्राण निपजुनि विषयीं मना रिझवी। ज्ञानसिंधु लाटा पाहुनी जन स्वात्मरूपा

भुलले ॥ २ ॥ श्रुति प्रज्ञानंब्रह्म हे गर्जंति विषयीं हो ऐका । शब्द रूप रस गंध ज्ञान हे ब्रह्मतेज कणिका । मीं तूं पण सुख दुःखाकृति ही माया भव क्षणिका । ईश जीव जड दृश्याकृति हीं ब्रह्म तेज भरलें ॥ ३ ॥ कोण बद्ध कोण मुक्त ज्ञानि अनुभविं हो बोला । अमत ब्रह्म तोचि मुक्त सहजिं वेद पुरुष वदला । वसिष्ठ रामा वदे स्वप्निं जशी कथा जननि वाला । चिन्मार्तांड प्रसादें मींपणीं ब्रह्म पूर्ण ठसलें ॥ ४ ॥

## पद ११४

( राग—कालगंडा. ताल—धुमाळी. )

अस्ति नास्ति कुणि म्हणा परंतु, तें आहे बा तें आहे । चेतन जड कुणि म्हणा परंतु० ईश जीव जड म्हणा परंतु तें आहे० ॥ धृ० ॥ ज्यामुळें हें मिथ्या म्हणती । मौन वाच्य प्रतिपादिती । निश्चय अनुभव असो नसो परी । तें आहे० ॥ १ ॥ जो शुन्य निधि शोषवि । मींपणीं रूप प्रगटवी । नास्तिका प्राण जीववी । नेती नेति श्रुति सौभाग्यप्रद । तें आहे० ॥ २ ॥ जाणिवे क्रिये नातुडे । वाच्य लक्ष तर्कही खुडे । वेदहि थकती बापुडे । नाहीं पण वृत्तिही बुडे । तें आहे० ॥ ३ ॥ निरपेक्ष स्फुर्तिचें स्फुरणें । निःशंक स्वानुभव वदणें । सत्यानृत हें आपणें । ब्रह्म जीव शून्य साक्षि अवघें । तें आहे० ॥ ४ ॥ स्वरूप चिन्मार्तांड प्रकाशे । शब्द मौनपणही ग्रासे । अस्ति नाति विकल्प नासे । अनंत नामे भजा परंतु । तें आहे० ॥ ५ ॥

## पद ११५

( राग—कालगंडा. ताल—धुमाळी. )

संत ( भक्त ) शिरोमणी खरा परंतु, तें नाहीं बा तें नाहीं ॥ धृ० ॥ देवता सिद्धि साधणें । जग मायिक हें जाणणें । अवघें ब्रह्मरूप अनुभवणें । जोंवरी हें बोलणें तोंवरी । तें नाहीं० ॥ १ ॥ नवविधा भक्ति स्थापिती । एकनिष्ठ देह झिजविती । नाचती उडती डोलती, सत्यलोक ( स्वर्गलोक ) वैकुंठ (कैलास) मिळे परि । तें नाहीं० ॥ २ ॥ देह हा पंढरपूर शोधिला । विठ्ठल रखमाई चित्कला । स्नान प्रेम चंद्र भागेला । ( नाहणें ज्ञानचंद्र

भागेला )। अशी यात्रा न घडे वैष्णव परि हो। तें नाहीं० ॥ ३ ॥ भजा आत्माचिन्मातांडा । लाविला मुक्त पदीं झेंडा । सोडा अनंत मत पाखांडा । सकल मति शिव तुम्हा नको जरि । तें नाहीं० ॥ ४ ॥

## पद ११६

( राग—जोगिया कालंगडा. ताल—धुमाळी )

वृत्ति जगिं स्फुरली वा मनिं ( मज ) स्फुरली । स्फुरली तेथें गुरुळी ॥ धृ० ॥ चिदाकाश अमित आत्मा । दर्पणिं अणु दिसे मायिक महिमा ॥ १ ॥ उपाधि गुणावलंबी । बिंब स्थिर चंचल प्रतिबिंबी ॥ २ ॥ निमित्त परिणामी जगचित्र । आत्म-माया दावि स्वतंत्र ॥ ३ ॥ शक्ति नसे जरि ब्रह्मीं । तरि तें ब्रह्म नव्हे जड धर्मी ॥ ४ ॥ निरापेक्ष मी सहजीं । स्फुरतों तद्रूप विषय समाधि ॥ ५ ॥ इंद्रियसुख संपत्ति । प्रगटे अस्ति भाति आणि प्रीति ॥ ६ ॥ जागृतिं दरिद्री रोगी । स्वप्नीं सार्वभौम सुख भोगी ॥ ७ ॥ निरुपाधिक मज पाहतां । नाहीं ज्ञान ज्ञेय आणि ज्ञाता ॥ ८ ॥ ज्ञान किरण मार्तंड । व्यापक पूर्ण सकल ब्रह्मांड ॥ ९ ॥

## पद ११७

( राग—अल्हैया. ताल—धृपद. )

मना सोडीं नामरूप, स्वरूप सत्य पाहिं वेई निजानंद ॥ धृ० ॥ हेमकटक मृन्मय घट भ्रमकल्पित ज्ञानमार्तंडरूपीं अनृत पाहि सत्य एक चिदानंद, मना० ॥ १ ॥

## पद ११८

( राग—वसंत. ताल—एक्का. )

नेति नेति नाहीं जीवा भवबंध । आत्मा प्रचंड, उदंड, अखंड दंडाय-मान । विमल, विपुल, अचल, सकल निगम (वेद) सिंह गर्जनाही । सहज मुक्त जीव वृंद ॥ धृ० ॥ अस्ति भाति ब्रह्मरूप दृश्य लोटी अंध कूप । गुरु-वचन ज्ञान दीप । ऐक कानिं मूढ मंद ॥ १ ॥ श्रुति चिन्मार्तांड किरण । अहमस्मि आत्म स्फुरण । वेद धिक्कार प्रविण । दत्त सदानंद कंद ॥ २ ॥

## पद ११९

(राग—जोगी, मांड. ताल—धुमाळी.)

गुज बोलवेना बाई । सुख सांगवेना बाई । स्फुर्ति आवरेना । एकोऽहमात्मा ॥ गुज ० ॥धृ०॥ नको उपदेश नाना । भाग त्याग लक्षण जाणा । ब्रह्मचि भेटे ब्रह्मा ॥ स्फूर्ति० ॥१॥ अहमन्नमन्नादः । वेद बोले भेद निंदा । कुणी आम्हां वंदा निंदा ॥ स्फूर्ति० ॥ २ ॥ आत्म प्रकाश अखंड । मृगजल माया बंड । सदानंद चिन्मार्तांड ॥ स्फूर्ति० ॥ ३ ॥

## पद १२०

( राग—जोगी मांड. ताल.—धुमाळी. )

हा दिसे स्फुरे जो आनंद । हा विपयीं स्फुरे जो आनंद न्याहाळितां तोचि ब्रह्मानंद (चित्सुखानंद) ॥धु०॥ आत्मतेजा, वृत्तितेजा, विषयप्रकाशा, भेदचि नाहीं । चित्सिंधु विषयाकृति उसळे । स्वात्मशक्तिचा हा छंद ॥१॥ आत्मभावा सृष्टिभावा । त्रिपुटीभावा मूल तो आत्मा । आत्मज्योति नामरूप दावी । चिद्विलास सहजानंद ॥ २ ॥ चिन्मार्तांड किरणीं बहुरंग हें । नाटकि चित्र नटे हा आत्मा । एक पूर्ण जवळीच प्रभू हा । सहज मुक्त सहजानंद ॥ ३ ॥

## पद १२१

( राग—यमन जिल्हा. ताल—केहरवा. )

मी चेतन, चंचल नाहीं । मला समाधि नको ग बाई ॥ धृ० ॥ आत्मशक्ति हें मन । शांति विक्षेप मन । बंधमोक्ष हें मन । या मनाशीं नामरूप नाहीं । मला समाधि० ॥ १ ॥ चिन्मार्तांड प्रचंड । सिंधुलहरी उदंड । मन आत्म्याशीं भेदची नाहीं । मला समाधि ॥ २ ॥

## पद १२२

( राग—कालगंडा. ताल—धुमाळी. )

ऐका विनवणी तुम्ही संतभूप । भेदनामरूप एक तो आत्मा ॥ १ ॥ रामकृष्ण संत सज्जन महंत । भक्त भगवंत एकरूप ॥ २ ॥ भक्ताचिया धूळी भगवंत लोळे । ऐक्याचे सोहळे व्यास तो वदला ॥ ३ ॥ बोधमार्तांड हा आज उगवला । भेदभाव गेला आत्मानंदी ॥ ४ ॥

## पद १२३

( राग—खमाज जिल्हा. ताल—धुमाळी. )

राजयोगामार्जीं राजा । करा आत्मलिंग पूजा ॥ १ ॥ नामघोष हे उत्तम । मुखी म्हणा अहंब्रह्म ॥ २ ॥ साक्ष साक्षी उपासना । मिथ्या पंच-भूत जाणा ॥ ३ ॥ मिथ्यापण हे पूर्ण ब्रह्म । गुरुज्ञानाचें हें वर्म ॥ ४ ॥ रामकृष्णानंत रूप । अवघा चिदात्मा तो एक ॥ ५ ॥ द्वैत न साहे जगदीशा । जावें वैकुंठकैलासा ॥ ६ ॥ गेला उपासनेचा भेदू । झाला आनंदीआनंदू ॥ ७ ॥ शिवमार्तांड माणिक । पूर्ण परब्रह्म एक ॥ ८ ॥

## पद १२४

( राग—खमाज जिल्हा. ताल—धुमाळी. )

गुरुज्ञानाचें हें वर्म । सहज ब्रह्मची आपण ॥ १ ॥ वृत्ति उसळली मावळली । साक्षि तुम्हां कळों आली ॥ २ ॥ भाव भक्ति रागद्वेष । तुम्ही ज्ञाते सावकाश ॥ ३ ॥ देह मन जड चंचल । तुम्हीं ज्ञाते हो निश्चल ॥ ४ ॥ बोध मार्तांड हा सुगम । साक्षि तुम्ही परब्रह्म ॥ ५ ॥

## पद १२५

( राग—खमाज जिल्हा. ताल—धुमाळी. )

तोचि धन्य जन्मा आला । जो कां सकल संतीं वंदिला ॥१॥ एका देवा आदरावें । अन्य देवा कां निंदावें ॥ २ ॥ विश्वरूपीं देवराजा । नाना वेषीं भक्तकाजा ॥ ३ ॥ जलिं तरंग नभीं वारा । नामरूपाचा पसारा ॥ ४ ॥ दिवस घटिका पळ पळ जाणा । जन्म नाश मनीं आणा ॥ ५ ॥ विश्वरूपीं पांडुरंग । घडि घडी पालटे रंग ॥ ६ ॥ गुण उपासना अनंत । एक चालक चेतन संत ॥ ७ ॥ विषय सर्व विठ्ठलार्पित । जगिं तोचि सहज मुक्त ॥८॥ ज्ञान मार्तांडीं हा भाव । सकल घटीं माणिक देव ॥ ९ ॥

## पद १२६

( राग—खमाज जिल्हा. ताल—धुमाळी. )

ब्रह्म डोळियाचा डोळा । सर्व जीवाचा जिव्हाळा ॥ १ ॥ ज्ञान स्वरूप ब्रह्म म्हणा । महावाक्य मनीं आणा ॥ २ ॥ पाहे ऐके बोले वाणी ।

ब्रह्मशक्तिची ही करणीं ॥ ३ ॥ आत्मप्रकाश निश्चल स्थिति । प्रखर तेजीं निपजे गति ॥ ४ ॥ प्राण वाहे इंद्रिय वाटा । स्फूर्ण शक्तिच्या ह्या लाटा ॥ ५ ॥ समुद्र स्वभाव प्रगटे क्षारीं । ज्ञान सिंधु जाणिव लहरी ॥ ६ ॥ आपणां भोगणें ना करणें । प्राण धर्म उठणें बसणें ॥ ७ ॥ स्वप्न सुषुप्ति जागृति । जाणें आत्मलहरी वृत्ति ॥ ८ ॥ पंच भूत तत्त्व मूळ । आत्मशक्तीचा हा खेळ ॥ ९ ॥ जड मन करीं कर्मा । आत्मसंयोगाचा महिमा ॥ १० ॥ सकलमतीं माणिक तेज । अर्थज्ञानें मुक्ति सहज ॥ ११ ॥ भजा ज्ञानमार्तांडा । सोडा अनेक मत पाखांडा ॥ १२ ॥

## पद १२७

(राग—खमाज जिल्हा. ताल—धुमाळी.)

ऐका तुम्हीं संत अनाथाच्या बोला । तुम्हीं अवतरलां जग कल्याणा ॥१॥
ऐकणें पाहणें बोलणें चालणें । उपजणें मरणें चेतनशक्ति ॥ २ ॥
योग भक्ति ज्ञान प्रेम आलिंगन । सिद्धि ओलंगणें शक्ति चेतनाची ॥ ३ ॥
शरीरा चेतवी भक्तिभाव दावी । अनंत लाघवी चेतनात्मा ॥ ४ ॥
देवा विसरावें नाशिवंत घ्यावें । जनीं मिरवावें जाणिव आपुली ॥ ५ ॥
नथ दिल्या वंदा नाक दिल्या निंदा । अज्ञानाचा धंदा सोडवि देवा ॥ ६ ॥
अन्य मतीं द्वेष वरीं भजन घोष । सर्वांतरि ईश वेद मुखिं ज्ञापि ॥ ७ ॥
सकलमती व्हावें सर्वांशीं वंदावें । आत्मा ओळखावें क्षणोक्षणीं ॥ ८ ॥
ज्ञानमार्तांड हा सर्वां मनीं स्फुरला । धन्य तो पावला सहज मुक्ति ॥ ९ ॥

## पद १२८

(राग—खमाज जिल्हा. ताल—धुमाळी.)

भक्त देऊळाशीं गेला । हृदयीं देव विसरला ॥ १ ॥ देव चालक शरिरांतरी । भक्त देवा हाका मारी ॥ २ ॥ भक्त ठेवी नैवेद्यासीं । देव अंतरें उपवासी ॥ ३ ॥ भक्त देवा लागी शिणे । देवा वाटे लाजिरवाणें ॥ ४ ॥ झाली देवा भक्ता भेटी । तुटे जीवपणाची गांठी ॥ ५ ॥ ज्ञान मार्तांडाची लीला । भक्त अवघा देव झाला ॥ ६ ॥

## पद १२९

( राग-पिलु जिल्हा. ताल-धुमाळी. )

प्रेमा जाणा प्रेमा जाणा । प्रेम परब्रह्म म्हणा ॥ १ ॥ अस्तिभाति प्रिय जो आत्मा । प्रेमा जगाचा जगदात्मा ॥ २ ॥ मरे उपजेना हा प्रेमा । सर्व विषयीं याचा महिमा ॥ ३ ॥ उच्च नीच कर्म बंध । प्रेमा नाहीं हा संबंध ॥ ४ ॥ ज्ञाति वृत्ति प्रेमा प्रगटे । वृत्ति क्षोभे समुळीं आटे ॥ ५ ॥ जेविं हो आरसा फुटला । अवघा प्रतिबिंब नासला ॥ ६ ॥ प्रेमशक्ति स्फूर्ति उसळे । भोगी विषयाचे सोहाळे ॥ ७ ॥ प्रेमा निश्चल ना चंचल । प्रेमशक्ति दावी खेळ ॥ ८ ॥ शक्ति ज्ञान नुमजे मनीं । व्यर्थ शिणतो ब्रह्मज्ञानी ॥ ९ ॥ शक्ति ओळखा आपुली । सहज मुक्ति हातीं आली ॥ १० ॥ विषया लोटुनि प्रेमा भजा । मायाधीश हा आत्मा उमजा ॥११॥ जडला चिन्मातांडीं प्रेमा । तोची मुक्त पूर्ण कामा ॥ १२ ॥

## पद १३०

( राग-मांड. ताल-धुमाळी. )

संत तुमची अगाध करणी । जगा प्रकाश जेवीं तरणीं ॥ १ ॥ जड जडाशीं न ओळखे । भेटी होतां न सुखे दुःखे ॥२॥ जड पदार्थ परतंत्र । तुम्ही चेतन स्वार्थ स्वतंत्र ॥३॥ स्वप्न जागृती होय नाश । तुम्ही जाणते अविनाश ॥ ४ ॥ हेंचि ओळखा ओळखा। अक्रिय अलिप्त सुखदुःखा ॥ ५ ॥ जड क्रिया चेतन ज्ञान। सत्ता स्फोरक असंग पूर्ण ॥ ६ ॥ सत्य-बोध चिन्मार्तांड । सकलमतीं माणिक अखंड ॥ ७ ॥

## पद १३१

( राग-कालंगडा. ताल-धुमाळी. )

कोण विपरीत प्रसंग ओढवला । सार्वभौम आला भिक्षा मागे ॥ १ ॥ जन्ममरण शिक्षा अज्ञान संगे ॥ २ ॥ पूर्ण परब्रह्म मागे विषय भिक्षा । जन्ममरण शिक्षा अज्ञान संगे ॥ २ ॥ स्वप्निं गेल्या जीवा, सति गेली विधवा। मूर्ख संशय भावा सोडवी देवी ॥ ३ ॥ आत्मा अविनाशी विषय प्रकाशी । इंद्रियं भोग प्रासी

जागृति स्वप्नि ॥ ४ ॥ विषय भोग नाना चिदात्मा मळेना। जन्मेना नासेना मानस धर्मे ॥ ५ ॥ जड ना संसारीं आत्मा निर्विकारी। भोग भ्रांति वारी गुरु बोध वचने ॥ ६ ॥ ईश जीव मी, मी, विषय भोगी मी मी। मजमाजीं मी मी स्फुरतो आत्मा ॥ ७ ॥ सकल मती भेटे, अस्तिनास्ति प्रगटे। लोटितां न लोटे ज्ञानमार्तांड हा ॥ ८ ॥

## पद १३२

(राग–खमाज जिल्हा. ताल–धुमाळी.)

क्षमा करा क्षमा करा। जड भूता कृति ईश्वरा ॥ धृ० ॥ अस्तिभाति प्रेम ज्वाला। निपजवि नभाऽनिल जल शीला ॥ १ ॥ जड म्हणोनि करि जो निंदा। ईश्वर नरका भोगवि सदा ॥ २ ॥ भूत कृतिहीं आत्मसत्ता। नाहीं मायिक मिथ्या (द्वैत) वार्ता ॥ ३ ॥ सत्य मिथ्या तर्क वाद। नुपजे कल्पांति हा भेद ॥ ४ ॥ भेदाभेदा भासवि राजा। स्फुरवि (मिरवी) अखंड आत्म तेजा ॥ ५ ॥ निमित्त उपादान शास्त्र। भ्रांत मतां पाशुपतास्त्र ॥ ६ ॥ जागा जागा पंडित जागा। वेद शास्त्रें देतिल दगा ॥ ७ ॥ करी-चिन्मार्तांड प्रमाण। एक पूर्ण शिव चैतन्य ॥ ८ ॥

## पद १३३

(राग–जोगी मांड. ताल–धुमाळी.)

अहा गुरुबोध महा वाक्य वर्म। ईश शक्ति लाभ घडे अनायासें ॥ धृ० ॥ जीव परतंत्र ईश तो स्वतंत्र। शास्त्र (वाक्य) अपवित्र करीं आत्मघाता ॥१॥ एक तें चैतन्य तोचि जगदात्मा। कीटकादि ब्रह्मा चालक तोची ॥ २ ॥ हीन दीन पापी ईश्वर प्रतापी। बहु नामरूपीं शक्तिच्या प्रभावें ॥ ३ ॥ सज्जन दुर्जन एकस्फूर्ति ज्ञान। ईश शक्तिगुण सत्य त्रिवाचा ॥ ४ ॥ क्रोध विषय भ्रांति सात्विक संपत्ति। दावि आत्मज्योति अखंड प्रकाशें ॥ ५ ॥ भासें वृत्ति नासे नासे चित्र भासे। ईश शक्ति विलसे अनंत ब्रह्मांडीं ॥६॥ मूळ ज्योति नाश सांगा विद्याधीश। विना धी प्रकाश घडेना कल्पांति ॥७॥ ईश ज्ञानामृत सेवा साधुसंत। रहा शक्तिवंत भगवंत-रूपें ॥ ८ ॥ चिन्मार्तांड वदे आत्मविद्या। मूळ अविद्या सावळे ब्रह्मीं ॥९॥

## पद १३४

( राग–पुर्या. ताल–धुमाळी. )

संतन्याय-नीती खाणीं । ऐका ऐका दीनवाणीं ॥ धृ० ॥ जळे दुःखेना आकाश । दावि खेळ भूतविलास ॥ १ ॥ वीज, वारा, पाणी, फेस । मेघ, छाया लोपवि दिवस ॥ २ ॥ विकार झाला आत्म तेजीं । होती जाती सहजासहजीं ॥ ३ ॥ आत्मरूपा विटाळ नाहीं । सर्वभोगी असंग ( अलिप्त ) पाहीं ॥ ४ ॥ उच्चनीच जन्मनाश । एक चिन्मार्तंड प्रकाश ॥ ५ ॥

## पद १३५

( राग–पिलुजी. ताल–धुमाळी. )

माझा चेतन प्राण जिवलग ग । आधिं आधिं डोळा झळकतो ग । मन प्राणेंद्रिय जीवन ग । मी असे दिसे प्रिय जगत्स्फोरक जगदात्मा । हा प्राणेश्वर परमात्मा ॥ धृ० ॥ जड नोहे कुणां उपकारी ग । परतंत्र( स्वार्थ ) आत्म सहकारी ग । मी शक्तिनाथ संसारी ग । जोंवरी विषयीं मी आत्मा, आत्मा ( प्रकाश ) न स्फुरे बाई । तोंवरीं भोग सुख नाहीं ॥ १ ॥ बोलणें, चालणें, रतिप्रेमा ग । जो भोग विषयसुख महिमा ग । स्थिर मनीं प्रगटें मी आत्मा ग । मानसीं न उजळे आत्मज्योति ही बाई । आनंद भोग सुख नाहीं ॥ २ ॥ तामस रज सात्त्विक ज्या ऊर्मि । ( ज्या तम रज सात्त्विक ऊर्मि, । त्या निजानंद ( चित्प्रकाश ) सहज धर्मी । मी नित्य असंग अकामी । त्यागुनी विषय, भज चिन्मार्तंड सुखात्मा । तो सत्य नेई निजधामा, ( नेईल ग निजधामा ) ॥ ३ ॥

## पद १३६

( राग–परज. ताल–धुमाळी. )

पाहा पाहा आमचा खेळ । नाहीं विकार वृत्ति मळ ॥ धृ० ॥ रज तम ( तामस ) सात्त्विक वृत्ति । आत्मतेजीं होती जाती ॥ १ ॥ पूर्ण शक्ति नाटकी आत्मा । स्वप्नसृष्टी याचा महिमा ॥ २ ॥ क्षण अनंत युगसें भासे ।

माया मोह शक्ति विलासे ॥ ३ ॥ दूर समीप रविमंडळ । कांच मणि दावी खेळ ॥ ४ ॥ स्थिरचंचल विकार भास । विद्या अविद्या चित्र विलास ॥ ५ ॥ अभेदात्मक प्रत्यय दावी । अनंत चिच्छक्ति लाघवी ॥ ६ ॥ अहं प्रकाश स्फुरण शक्ति । स्थिर चंचल भासवी वृत्ति ॥ ७ ॥ स्थिर दावी या चंचला । चंचलीं चंचला नाहीं थारा ॥ ८ ॥ एक निश्चल चिन्मार्तांड । दावी सप्रपंच थोतांड ॥ ९ ॥

## पद १३७

(राग—खमाज. ताल—तिताल.)

अहं अहं या स्फुरणीं रमा । मति, गति, रति, सुखविषयीं प्रकाशा, हालवी, डोलवी, जडधी, प्रेरक आम्हां ॥ धृ० ॥ रूप ना, नाम ना, अमतिमति वाचना । ना जाणा, ना शिणा, ना म्हणा, ना खुणा, ना गुणा, ना ऊणा, ना दुणा ॥ १ ॥

## पद १३८

(राग—खमाज. ताल—तिताल.)

जय हो सकलमतीं, तुम्हां जगिं मान्यता । पूज्यता, सज्जन सुवंद्यता, ॥ धृ० ॥ स्वतंत्रता, अखिल जनीं बोध सत्ता । धीमता अनुपम शम शांत चित्तीं निरहंता ॥ १ ॥

## पद १३९

(राग—परज. ताल—धुमाळी.)

अहमन्नं हे चित्रजग ( दृश्य ) मी हो । अहमन्नादभक्षक मी हो ॥ धृ० ॥ जड जडा नोळखे नोपकारी । सर्व भोगा ( विषया ) भासवी अंगिकारी । महाप्रपंची विश्वसंसारी । पुण्य पापिष्ट बद्ध मुक्त मी हो ॥ १ ॥ भोग-विषया विस्मरण, स्मरण आहे । स्वात्मसंबंधीं भ्रांति बोध नोहे । मी नव्हे म्हणे तोची आहे । शून्य सौभाग्य शक्ति मी हो ॥ २ ॥ आत्म-शक्तीचा चोज सांगवेना । मी चैतन्य परि उमजेना । हतभाग्या हा लाभ जोडवेना । चिन्मार्तांड शिष्य गुरु मी हो ॥ ३ ॥

## पद् १४०

( राग—खमाज. ताल—त्रिताल. )

स्वरूपा स्मर कीं मी तसा कसा असा। भ्रमसि गड्या ॥ धृ० ॥ गुरु बोधिती तत्त्वमसि। वाचना, वाचना, गुणना गुणना सच्चिद्वेदनुत अखंडित सदोदित आनंदित अससी गड्या ॥ १ ॥

## पद् १४१

( राग—झिंझूटी. ताल—त्रिताल जलद. )

हा सोहं हंसराट् ह्मणे मी मी मज पहा ॥धृ०॥ ज्या सत्तें वायु मिरवे। भय कंपे सूर्य उगवे। इंद्राग्नि मृत्यु धांवे। रौद्राभा उग्रतम, अतिदृग् भूता प्रकाश हा ॥ १ ॥ नभशक्त्या मेघ वृष्टि। वेदांतीं दृष्टि सृष्टी। नकळे जे होती कष्टी। ब्रह्मादि स्तंब भासे, शिव चिन्मार्तांड हा ॥ १ ॥

## पद् १४२

(अभंग )

कोणा सुटलें हें मीपण। ब्रह्म ह्मणे आहे ब्रह्म ॥ धृ० ॥ आहेपणीं माया दिसे। न्याहाळितां ब्रह्म विलसे ॥ १ ॥ अस्ति· भाति प्रिय ब्रह्म। नामरूप मायिक धर्म ॥२॥ बिंब प्रतिबिंब हा भाव। उपाधि गेल्या नाहीं ठाव ॥ ३ ॥ सर्वरूपीं चिन्मार्तांड, वितळे चिन्मार्तांडीं हा भेद,। झाला आनंदी आनंद ॥ ४ ॥

## पद् १४३

( चाल- कोठवरी धीर धरूं. )

वेद गुरु मज ब्रह्म म्हणती परि काय करूं उमजेना। विषय सुखेंद्रिय भोगा समजुनि, विषयभोग सुख नित्य मानुनि। निजानंद सुख गवसेना. निजानंदें मति ठसवेना ॥ धृ० ॥ इंद्रिय चालक मानस वृत्ति, इंद्रियाधिपति मानसवृत्ति। आत्मदीपाविण प्रगटेना, उजळेना। विश्वप्रकाश ( निजप्रकाश ) आदि ज्योति ( तेज ); ममसत्तेविण घट तृण जल पर्णही हालेचना ॥ १ ॥ ( अपूर्ण )

## पद १४४

( चाल—अहमस्मि. )

शिष्य पुसे कोण मी कोण, ब्रह्म । मज माजीं मी मी स्फुरे न कळे खुण वर्म ॥धृ०॥ कामक्रोधादि संकल्प उठती । स्वात्मतेजीं भासती । भोग देती गुण विरोधें होती, मावळती । जन्महया जाणतो मी सत्यब्रह्म (ज्ञानधर्म) ॥ १ ॥ आत्मस्थळीं शक्ति ही कार्यकारी । कर्मजाळें उभडी संहारी । विषयभोगी ही बुद्धि स्वात्मलहरी । स्वार्थी विषयाकर्षी तो तो मी ब्रह्म ॥ २ ॥ निविड स्वरुपींच चित्र भासे । सर्व विषयीं संकल्प मी मी महिमा ॥ ( अपूर्ण )

## दोहरा

माणिकज्योती, हरी किरण रुचि मनोहर ब्राह्मांड । नामरूप अनंत हो, एकहि चिन्मार्तांड, सिंहमहीपति मुक्तकुलजन भासक-चिन्मार्तांड ॥ १ ॥

## १४४ अ. स्फूट

ऐका ऐका प्रेमळ भक्त शिरोमणि । महाधिकारी बंधू भगिनी । हा उपदेश ठसवूं मनीं । नित्य मुक्त, मरणभय टाकुनी । संसार खेळ खेळूं या ब्रह्मानंदें । उड्या घेऊं या ब्रह्मानंदें ॥ १ ॥ आत्मा गाऊं आत्माचि पाहूं । आत्मरूपें देवता ध्याऊं । नामरूपाकृति गाळुनि । सुखी राहूं चैतन्य भुवनीं ॥ २ ॥ सकल मती अखंड सुखी । शपथ घेतली याची लाज राखी । तूं शिवदत्त चैतन्य देवा । प्रत्यक्ष प्रगटोनि मस्तकीं वरदहस्त ठेवा ॥ ३ ॥ आत्मतेज महिमा विसरोनी । कैलास वैकुंठ सुख मानोनी, ध्यातो मनीं ॥

श्रीमाणिक जय माणिक । हंसः सोहं सोहं हंसः ॥
सोहं हंसाचें उडणे । सोहं सोहं ॐ मुक्तिपद देणें ॥ १ ॥

# कानडी पदें

## पद १४५

( राग–आनंदभैरव. ताल–धुमाळी. )

मुक्ता ना गिद्दो अण्णा, मुक्ता नी इद्दो तम्मा । नी मुक्ता नानु मुक्ता जगसहीत जंगम मुक्ता ॥ धृ० ॥ पंचभुतादिगळु सुळ्ळुनें काणवंदु ॥ ऊरु इल्लदे शींवी इल्लि काप्यादो तम्मा ॥ १ ॥ वंध्याना पुत्रागळु मुगुल पुष्पवु हाकी । प्राण इल्लदे कणशी राज्या माड्यादो तम्मा ॥ २ ॥ अज्ञानकत्तलदल्लीं ना नोनु बद्धा मुक्ता । ज्ञानमार्तांड बळगी सुमने नी आगो तम्मा ॥ ३ ॥

## पद १४६

( राग–छक्कड. ताल–केहरवा. )

छीः होगोनि मूढा इदे निंदु तिळवक्की । दृश्य देहग नोडी नाने देह अंदु सोक्की । ब्रह्म हुली नी इदु मायि कुरी हिंद सिक्की । सुखसाम्राज्य निधि नी, बिडु ई विषय सुख भिक्की । ई माया केळो यारक्की । ता शुन्यवागी काणक्की । निजआत्मदल्ली हूट्की । शिवभक्तरिगे सण्णकी । अज्ञानी जनके दोड्डकी । आगी चलवक्की बिळुताळतक्की । चिन्मार्तांड ब्येळगिगे मायितो मायद चुक्की ॥ १ ॥

# हिंदी पदें

## पद १४७

( राग–भूप जिल्हा. ताल–धीमा त्रिताल. )

जय हो मनोहर नंदन की जय ॥ धृ० ॥ मातापिता भू धन्य देस, कुल । जहाँ प्रगटी छब मोहन की जय ॥ १ ॥ कौन भाग्य और कौन सुकृत, जिन आस कथा रस श्रवणन की जय ॥ २ ॥ जिन प्रताप इह विश्व रचा है । सुखनिधान ऊन नयनन की जय ॥ ३ ॥ जो श्रीप्रभुमत सकल उधारन । नाम रटत ऊन भक्तन की जय ॥ ४ ॥ मनोहरानुज कहत सुनीयो प्रभु । राखो लाज हम पतितन की जय ॥ ५ ॥

## पद १४८

( राग–यमन. ताल–धृपद. )

पंचभूत त्रिगुण भाव सबमील होत आठ, ज्या सो भयो जगत जाल जनन मरण मौंच बंध ॥ धृ० ॥ त्रिविध धाम तनुतेज लिख ज्ञानघन चिन्मार्तांड आपनो रूप आनंद नंद कंद ॥ १ ॥

## पद १४९

( राग–देस. ताल—दादरा. )

देखो हर हर शीव शीव कहिले रे तुं जियेरा। नहीं तेरा कछू, झुटी झुटी धन संपत् समजा है मेरा ॥ धृ० ॥ झूटा जग झूटी प्रीत झूटा है पसारा। एक साच मानिक गुरुसाहेब है हमारा ॥ १ ॥

## पद १५०

( राग–सारंग. ताल–चौताल. )

भज हो शिवरूप अखिल भूप, आतम सुखनिधान जगत भान महामौन सताकाश निजप्रकाश, एक सघन ॥ धृ० ॥ तूं है ब्रह्म निराकार, संतन सुख सुनले सार, महावाक्य दे अधार निगम ज्ञान ॥ १ ॥ अस्ति भाति प्रिय उदंड, महामौन सुख अखंड, चिन्मय गुरुमार्तांड सा रे म प नी सा रे म प रे सा नी राबरन ॥ २ ॥

## पद १५१

( राग–बहार. ताल–त्रिताल. )

लाडला बालमा निंदरिया जगाये, छबिला रसीला मोहे छांड कित गयामा ॥धृ०॥ हा हा करतीहूं पीहुसे ध्यान लगाये निसदीन रटत रटत ज्ञानघन मार्तांड प्रभूरूप पिहुं स्वरूप बनगयो मा ॥ १ ॥

## १५२

( राग–मांड. ताल–धुमाळी. )

शाम कठे जाशीरे संतनके चित्तचोर ॥ धृ० ॥ अनादिमाया भवप्रवाह जल उचक उचक लहराय। तामें बसे जीव जगसारा डुबडुब मरजाय ॥१॥

दिना नाथ ब्रीद अपनीं राखो; तुम पतितनके सर ताज। कैसे छांड जावोगे हमको बहा पकरिसो लाज ॥ २ ॥ यहि अरज है सब पतितनकी हृदयकमल रहजाव। ज्ञानरूप मार्तांड प्रभू तुम एकरूप दरसाव ॥ ३ ॥

पद १५३

( राग–खमाज ताल–जलद त्रिताल. )

देखो धीट हटक मरोरी मोरी बयाँ। मटक छटक आन परत मोरी पैयां। ऐसो ठिठोरी करत जमुनाके पनघटतट ॥ धृ० ॥ अधर मधुर बन्सीधर सुंदर लटक चाल अलबेली चलत दैयाँ। छेल छबेली छबे ब्रिज बन हरलेत मनोहर अनुज बलै याँ ॥ १ ॥

पद १५४

( राग—कानडा. ताल—जलद त्रिताल. )

प्रीतमकी झलक देख उठीमा। उचक बैठी मा। पिहुंन देखीमा। ये सपनोमें, निंदरियामे दचक उचक अचानक चौक परी ॥ धृ० ॥ वारबार पिहुं मोरे मन आवे छबदेखन ललचावे,जिया ललचावे याकहूं सोंच सोंच मानिक मुख देखे मोहे भूल परी ॥ १ ॥

पद १५५

( राग–बिहाग. ताल–धिमा त्रिताल. )

कोई तो समझावो, मनावो पीतमको। वेगी जावो कर जोर जोर पग सिस निवायके मनमोहन ले आवो ॥ धृ० ॥ विरहदुःख मोहेको नस-हावत, बडिपल छन दिन कठीन दिखावत, अब प्राण निकल जात समयको, मानिक मुख दरसावो ॥ १ ॥

पद १५६

(राग– सोहनी. ताल–झंपा.)

सच्चिदानंद गुरु एकहि साच और, इतर गुरु झुठ पैछानले हो मना। माया विलास सब नाम और रूप त्यज, सकल जग परब्रह्म देखले

हो मना ॥ धृ० ॥ ओही जगरूप और वोही गुरुभूप मन, जीव शिवभूत पंचक त्रिगुण सारा । एकहि सतूंरूप बहुविधा होत है, श्रुतिवाक्य वेदांत मान ले हो मना ॥ १ ॥ शबलार्थ छांड और शुध्थ सो ग्राह्य कर भाग लछन महावाक्य साधे । ब्रह्मजो जाने सो ब्रह्मही होत है, निगम डंकार सुन, बुझले हो मना ॥ २ ॥ नित्यसो सत्य, ज्ञानसो चैतन्य परम सुख अतहि आनंद पद साजे । अचल अविनास, अज एक गुरू अवधूत ज्ञान घन मार्तांड जान ले हो मना ॥ ३ ॥

## पद १५७

(राग –भीमपलासी. ताल–त्रिताल.)

ब्रह्म मूल जग ब्रह्म ब्रह्म जग अहं ब्रह्म मतवालाहै । ब्रह्म भास माया विद्या सब ब्रह्मवृक्ष फल फूला है ॥१॥ अनादि अनंत जीवातमका भेद बाद भ्रम जाला है । ज्ञान स्फूरण अज्ञान तर्कमत, चेतनका उजियाला है ॥ २॥ चार मुक्ति महावाक्य बोधसुख, शब्द मौन गुरु चेला है । आपनी माया जान मिटाई, तब गुरु आपही आप एकला है ॥ ३ ॥ चिन्माणिक मार्तांड शिष्यगुरु, अभेद हरी शिवभोला है । बढो भाग बैकुंठ धाम सुख आज सकलमत मेला है ॥ ४ ॥

## पद १५८

(राग–झिंझूटी. ताल–धुमाळी.)

हम असंग चेतन सांई । ये दुःख प्रवाह ( जन्म दुखः प्रवाह ) हम संग नाहीं ॥ धृ० ॥ हम आकाश नित जगको अधारा । अचानक मेघ उठत जलधारा । दिखत छुपत अंधियार उजाला । हम न किये न मिटाई ॥१॥ इह संसार खिलोना मनका । मन कंजाल है चेतन जलका । जलकि न हानी न लाभ है तिनका । जूं नट दिप नचाई ॥ २ ॥ जल चाहत नहीं तरंग फेसा । घटत बढत जूं दिन दिन सांसां । होत जात भूतनमे तमासा । हम न रिझे न रिझाई ॥ ३ ॥ आद ब्रह्म गुरु मानक हंसा । सोगुरु चिन्मार्तांड प्रकासा । निराकार अरु दे उपदेसा । ये चेतन चतराई ॥ ४ ॥

## पद १५९

( राग–जोगिया. ताल–त्रिताल. )

हात जोर बिनती यहि करहूं सब जीवनको भाई।जीव तुम नही ब्रह्मरूप सांई ॥ धृ० ॥ चिदाकास आतमकी संगती पंचतत्व वन आइ। तेज सो रूप रूप दरसाइ। मान, वृत्ति इंद्रिय द्वारे ये भोगनको ललचाई। चौऱ्याशी लख् योनि फिरवाई। कामिनी धनसुत महाल मंदिर देख जगत चतराई। अविद्या आतम सुख बिसराई। अलख निरंजन गुरुका ढंका सुनले देत दुहाई। जीव तुम नहीं ॥ १ ॥ पंचभूत ब्रंह्माड पींड अरु माया मोह बढाई। ब्रह्म तुम दृश्य की मौज मचाई। जूं सपनामों राज-भोग अरु संपत झूट लुटाई। कौन मृगजलसो प्यास बुझाई। निरंकार शिव शक्ति एक अवधूत सकल जगमाई। नामरूप ब्रह्मविना कछु नहीं, तुमहि जीव ईश परमात्मा महिमा बरनीन जाई। कहो कब निशीनें सूरज छाई। ज्ञानरूपमार्तांड गुरू सत् बेदबानी समझाई। जीव तुम नही ॥ २ ॥

## पद १६०

( राग—मारवा. ताल—एक्का. )

साधक सुध सब मिल ये विचार लेहों, मायामय मन निजाध्यान करीं बहुविधा रूप गुण, जग महाभूत अरु नाना बंध मोछ महावाक्य साधन सकल, श्रवन मनन समाधी आतम सगुण ध्यान॥ धृ० ॥ तूं जनन मरन भ्रमन करत, ज्ञानरूप मार्तांड कहत, दुख भोगनही जागे त्यागे हो पामर, मदांध करत करम मानत मैं पडत ग्यानीं जानत नहीं निगम गूढ, मानत बाधक ॥ १ ॥

## पद १६१

( राग–जोगिया. ताल–धुमाळी. )

ग्यान गुरु उपदेसा सुनले हरदम। जडचेतन की गुडिया बोले तुम हम। जपति अजपा माला सोहं सोहं ॥ धृ० ॥ जड भूतनका पिंजरा

महाराजानाम। जीवपंचि गारोडा फिरता सबधाम। फीर फीर जनमको धाया मिठु आत्माराम। सबद गुरू मुख जाना एक राम ही राम ॥ १ ॥ जडचेतन बीन जगमे कोई जना नरा। मनभटका भंडवाडा मै तूं तेरा मेरा। सुगति मुगति जूं सपना क्या भला बुरा। लटकी चौसर बाजी ना जिता हरा ॥ २ ॥ क्यौं डर लंडी माया दीलकी धुल झडक। उठ सुन वेद ढंडोरा ब्रह्म हो फडक। सकल मती हम संतोबोली बेधडक। चिन्मार्तांड प्रकाशा दृश्यकी झलक ॥ ३ ॥

## पद १६२

(राग–जोगिया. ताल–धुमाळी.)

दिवाना आपकु नहि धुंडा ॥ धृ०॥ विद्या सीखी जोग कमाया। भगवा सीर मुंडा ॥ १ ॥ ग्यानी बन चित भोगकी आशा। साधु जग भोंडा ॥ २ ॥ बंध मुगति नहीं ब्रह्म तूं साचा। क्यौं रोता रंडा ॥ ३ ॥ आतम भुमी वाला मन फल फुली। शरिर जडकुंडा ॥ ४ ॥ त्यज विरोध मत, सकल मती हो। तबहो दील थंडा ॥ ५ ॥ चिन्मार्तांड वचन जो भूला। खावे जम दंडा ॥ ६ ॥

## पद १६३

(राग–पिलु. ताल–दिपचंदी.)

हम समझे तुम समझो रे भाई। समज छांड विन समजत नाहीं ॥ धृ० ॥ जो नाहीं समझे सो वाकोहि समझे। समझ बखाना सो मुरख साई ॥ १ ॥ समझ फाड आतमकू समझे। ताकीलो महिमा बरनीन जाई ॥ २ ॥ दीपप्रभा दिपक नाही समझे। बीन प्रकाश दिप न जगमाई ॥ ३ ॥ हंस गुरु मुखब्रह्महो समझा। औरश्रुति बैन करत बढाई ॥ ४ ॥ ज्ञान रूप मार्तांड प्रभूबिन। ना कोई समझे और समजाई ॥ ५ ॥

## पद १६४

(राग–काफी. ताल–दीपचंदी.)

साध साधन संग होरी। सखी मै खेलूं निगम बिचार फागनमे ॥ धृ० ॥ बहुत जन्मकृत पूर्वसुकृत तैं नित साधन करचारी। गुरु

वसंत प्रेम ऋतु आयो तीन देह बलहारी। गयी मै पुछूं निगम० ॥ १ ॥ केसर सत्व ज्ञान रंग कीन्ही वृत्तिनें भरी पिचकारी। स्वस्वरूप पीतम मुखमारी तव आतम कोही विसारी ॥ २ ॥ भ्रमहि गुलाल लाल उडछाये, महावाक्यनकी गारी। स्वानुभुति सखियन मिल खेलत समरस धूम मचोरी ॥ ३ ॥ ज्ञान रूप मार्तांडप्रभू संग खेलत खेलत हारी। निर्विकल्प सुख स्वस्वरूप मैं आपही मौन भई री ॥ ४ ॥

## पद १६५

( राग–जोगिया. ताल–धुमाळी. )

ग्यानन के संग जावोरी तेरी सुधी बनेगी ॥ धृ० ॥ दृश्य जगत सब त्यजहो आसा। आये सोपग पाछे जावोरी ॥ १ ॥ गुरु उपदेश पछान ध्यान धर। सुख निधान पद पावोरी ॥ २ ॥ ज्ञानरूपमार्तांडप्रभू को अति सुप्रेमे मनावोरी ॥ ३ ॥

## पद १६६

( राग–हमीर. ताल–धमार. )

सघन सुखधाम अकास अरूप रूपनहि रंग वरन कछु रक्तपीत अस्साम ॥ धृ० ॥ चिन्मार्तांड अखंड प्रचंड निजानंद अनाम ॥ १ ॥

## पद १६७

( राग–ललत. ताल–ध्रुपद. )

तुं है तुं परशिव परब्रह्म निर्विकार ॥ धृ० ॥ सत्यरूप सत्य बीज एकाकी सकल विश्वाधार। अभोग शिव जीव विद्या अविद्या पंचभूत परम पुरूख निगम अगोचर मानीक नाम चिदानंद शाश्वत अखिलाधार ॥ १ ॥

## पद १६८

( राग–जोगिया. ताल–धुमाळी. )

सुरत खुब अजब दर सायो। राजा चेतन हरघट अपनि। सताकास चित्प्रकास प्रिय नित आतमज्ञान ज्योती। कुदरतसे तन महल बनाकर

घटघट आंख ( नेत्र ) बसायो ॥१॥ ज्ञानी बन मुगतिपद पधारे अज्ञानी बन फंदा । खेल खेल पट खोल खडा तब नहीं मुरख नहीं पंडा ॥ २ ॥ एकहि प्रेमभाव नचावत नाचे मरद लुगाई । नाता गोता करमधरम सुध मुरखमन समझाई ॥ ३ ॥ सुख कारन तुम सृष्टी मचाई भुल परत संसारा । वेद भाट तुमहिको रिझाने महावाक्य ललकारा ॥ ४ ॥ आपहि अनंत मतधारी बन भटकत अजब तमासा । दीनदुखहर श्रीप्रभू आपही चिन्मार्तांडा प्रकासा ॥ ५ ॥

## पद १६९

( राग–खमाज जिल्हा. ताल–धुमाळी. )

हंसः सोहं सोहं हंसः । अजपा जप सद्ब्रह्म प्रकासा ॥धृ०॥ ध्यात जपत जो अजपामाला । सहज खेल जगस्थितिलय लीला ॥१॥ सिद्धमंत्र बल ज्योतिप्रचंडा । दे उपदेस ग्यानमार्तांडा ॥ २ ॥ अस्त समय शिव नाचत प्यारा । शांभवगण शिव हर ललकारा ॥३॥ अखिल कोटि दिपक ब्रह्मांडा । ज्योतिरूप शिव चिन्मार्तांडा ॥४॥ निजानंद ईशभूतिदायक । अभेद शिव माणिक जय माणिक ॥ ५ ॥

# उर्दू पदें

## पद १७०

( राग–खमाज जिल्हा. ताल–दीपचंदी. )

झलक मूं दिखा झट् छुपा चाहते हो । मिले हो जो दिलसे कहां जाते हो ॥ १ ॥ मै बंदा हूं दुष्मन या आपक तुम्हारा । मैं मैहुं या तुमहो जुदा जानत हो ॥ २ ॥ खुदाई खुदाको न छोडेगी हरगीज । पक्ल हम नहो कुच तो क्या जानते हो ॥ ३ ॥ मोहमद या अहमद या मानीक बंदा । तुमहि जो चाहे सो बन आते हो ॥ ४ ॥

## पद १७१

( राग—मांड. ताल—धुमाळी. )

तूं पाहवली माषूक दीन दुनियाका । ला षरिक रब्ब मालिक है कुल्लू शय्यन् का ॥ १ ॥ आपकके लिये माषुक बनके आते हो । परदे मे छुपा

तसबीर बता जाते हो ॥ २ ॥ टुक झलक बताके मुंकू फिरा लेते हो। मुरदोंको नीम बिसमिलही बना दे ते हो ॥ ३ ॥ क्या गजब है सुरत देख हात मलत हो। सद हजार घायल तेरे गलीं रोते है ॥ ४ ॥ एक नजर देख आपक तो यहिं मरते हैं। जो फिदा हैं तुमपर कहो कभी बचते है ॥ ६ ॥ जो इष्कका मारा येही शेर पडता है। जो मुरषदकांमील होसो रमज पाता है ॥ ७ ॥ ये बंदा मानिक सच तो यहि कहता है। आपक कू कभि आराम नही मिलता है ॥ ८ ॥

## पद १७२

( राग—जोगिया. ताल—केहरवा. )

तूं षाहवली मुरषद होजी, कहीं जाहिर हो कहिं बातीन् हो ॥ ध्रु० ॥ कहिं रामबने कहिं रहिम बने। यहवजूद उलट पुलट होजी ॥ १ ॥ कहीं नबी, अलि, महबुब बने। कहिं षाह, गरीब, अमीर, बने ॥ २ ॥ कहिं बुतपरस्त, कहीं खुदपरस्त, कहिं मुरषद मानिक बंदा बने ॥ ३ ॥

## पद १७३

( राग—बिहाग. ताल—गजल ठेका लंगडी. )

इस इष्कमे कोइ दम को आराम नहीं देखा। तादम् बदम् ओ बिकल दिल आराम नही देखा ॥ धृ० ॥ बदनाम हो बेदील बेपरा, बेपकहो बुत् परस्त। इसपर भी हक् बोला सो बदन को दारपर देखा ॥ १ ॥ आपक हो बेदरद् के इष्क आपकसे गाफील। आपक को किसी माषुक से हुशियार नहीं देखा ॥ २ ॥ षब होतो ऐसी हो के हम वसल हो माहेरू। उस ख्वाब से किसी आपकको बेदार नहि देखा ॥ ३ ॥ खुदी सेहि खुदा कहते हैं मगर खुदा है खुदीसे दूर। लेकीन सिवा खुदीके खुदा खुदकु नही देखा ॥ ४ ॥ कहनावो बेजबां का समझना वो बेकियास। । अपनेमे आप समझा सो तो फिर खामोश नही देखा ॥ ५ ॥ जो चष्म पुर आबसे ओ नूर देखते हैं मजनु। तब गोहरे लैला के सिवा कुछ नही देखा ॥ ६ ॥ क्या पाकरू वे आइना माषुक को मजा दे। यह रमज मह-

मंदीको खुद अहमदीने देखा ॥ ७ ॥ ता मुरीद न हो मुरषद बे मुरषदन हो मुरीद । इस बंदे मानिकनें कभीं जुदा नहीं देखा ॥ ८ ॥

## पद १७४

( राग—यमन जिल्हा. ताल—दीपचंदी )

सुनो एक जात है और तुम कहां हो । वोही हो या उसी मे हो । कहां हो ॥ धृ० ॥ नही है जात वो मै नही हूं । तो क्या हो कौन हो कैसे कहां हो ॥ १ ॥ समझ ते हो आपने को मै वंदा । खुदाके वास्ते तुमही खुदा हो ॥ २ ॥ जो है सो है नही सो नही है । ये समझो या न समझो है सो हि है ॥ ३ ॥

## पद १७५

( राग—पिलु. ताल—गजल लंगडी. )

हाय गफलतमे हूं मै कैसा मुझे मै भूल गया हूं । खायपे दिल की मिटाने हरसु दौड रहा हूं ॥ धृ० ॥ षाह वजीर है दिल मै हूं मालिक दिलका । दिलसेही दीन दुनिया तावे दिलके हुवाहूं ॥१॥ हुबाब नूर है दिल, मैहुं दरयाय जलाल । मौज दरयाका तमाशा मै खुदी को खोदिया हूं ॥ २ ॥ आखोंमें नूर महमद दिलतो है खाने खुदा । मैपनेका ढंग मचाके मन्नते मॉंग रहा हूं ॥३॥ खुल गया चष्म हकीकी कल्मे गयब्ब को समझा । लाइलाहइल्लिला से खुद वखुद फना हुवाहूं ॥४॥ मै न हिंदू न मुसलमान हूं मै मानिक का प्यारा । मजहवे सूफीका वयान कोई कहान मै कहा हूं ॥५॥

## पद १७६

( राग—मांड जिल्हा. ताल—दीपचंदी. )

मै पना वोहि एकपनेके साथ है ॥ है पना तूं सोंच मुतलकजात है हरषक्त हरजा व हरहर रंगमे, लाइलाअलाह जाते पाक है ॥ १ ॥ वाहद वल्ला लाषरिक अल्लागफूर । फिर हुवा जलवे महमदका जहूर

कोइ बना बंदा, कोई कहलाता हुजूर, कही ह्यमत करामतका गुरूर। हाय वजुज अल्ला न कोइ स्रात है ॥२॥ दीन दुनिया वजूद अल्लाहि जान, कोइ कहे रब्ब वे जबाँ वो बेनिशान । मैपना होता तो कुछ करता बयान्, मैफना, सुरषद्फना वो कुलफना । मेहरमानीक दो जहांकी आंख है ॥ ३ ॥

## पद १७७

( राग–परज. ताल–धुमाळी. )

बुतौं के महफील मे अपना माषुक, नजर से देखा मगर न समझा। होके पखाना जलगया दिल, जों उसको नुरे खुदाहि समझा। या पाक आइना मस्तगुल हो, या चांद बदलीमे रूख हो यारव। ये लोंच बोसा जो लेके देखा, तो सचही आवे हयात समझा ॥१॥ ये खुरप सुरषीद या फूल नरगिस या जोडा माहे या कान गोहर। ये सोच मिषगां को खुब देखा, तो सचही तीरे हदफ़ ही समझा ॥ २ ॥ ये नूर बिजली या हो सितारा या होवे रिंदोकी जाय मसजिद्। या आषकोंकी ये हुसन निय्यत या दीन दुनियाका फलहीं देखा ॥ ३ ॥ जो उसके नाजोअदा को देखा खुदाकी कुदरत भुलरहि है। जो उसके नाखून को खुब देखा तो सचही माहे हिलाल समझा ॥ ४ ॥ मैं इस गजल को हदीस समझा मे उसका मिलना मेराज समझा ॥ ५ ॥ जो रमज पाया सो हमवस्ल मगर हो कामील मुरीद मुरपद। ये बंदा मानीकनें खुब समझा मगर न दुनिया मे कोइ समझा ॥ ६ ॥

## पद १७८

( राग–झिंझूटी. ताल–दादरा. )

खुदाके वास्ते मुझमे खुदा बतादेना। ये मैका गफलत परदा जरा उठालेना ॥ ध्रु० ॥ ये नूर किसका है हर चप्पमे चमकता है। रसूल, महल मुबारक तवाफ करलेना ॥ १ ॥ तुम्हे नसीबहो मेराज षबे मुबारक हो। ये जिब्रइल है दिल आपसा बनालेना ॥ २ ॥ वो लाषरिक हु

अल्लामे खुद फना भी फना है। ये जोष वस्ल निशामे खुदी मिटा देना ॥ ३ ॥ न बंदाहूं न मानिक हर रंग मे खुदाही खुदा है। फकीर सुफीका नाजुक बयान सुन लेना ॥ ४ ॥

## पद १७९

( राग–मांड. ताल–धुमाळी. )

खुदा गर दे नजर तुमको, तो हर सूरत खुदाकी है। जमरूद गोहरों शमशीर, मगर एक आबदारी है। न आतिष जातसे रोषन न सुरज चांद तारे है। ये सिफते जिससे है रोषन वो एक नुरे जलाली है ॥ २ ॥ न मादर खालवो हमशीर न दुलहन दुखतरो माषुक। जिसम है एक जो इनसानी ये सब दील की दलाली है ॥ ३ ॥ खुदा गर तुम नही होते तो क्यों होती खुदी पैदा ॥ खुदीमे है जो खुद मस्ती खुदाकी ये निशानी है ॥ ४ ॥ खुदाइका ये जल्व ये नूर महिबूब मानिको बंदा । फनाकर खुदकु वल्लाह्मे तूं वाहद जात बारी है ॥ ५ ॥

## पद १८०

( राग—आनंदभैरव. ताल—दीपचंदी. )

वोहलाशरिक अल्ला हर दिल जगा रहा है। माषुक इष्क आषक जल्वा दिखा रहा है ॥ ध्र० ॥ क्या खुब है वहाना दुनिया में मर्दव जनका। इष्के मजा खुदीका अल्लाह ( खुदही ) लुटा रहा है ॥ १ ॥ मंदर मे बऱ्हेमन मसजिद्मे अहले इस्लाम। नाजो अदा से अपनें माषुक बना हुवा है ॥ २ ॥ आषक हुवा जो मजनु लैला मे खुदफना। तू हो फना खुदा मे देखो तो क्या मजा है ॥ ३ ॥ अय बंदे पाह अहमद मानीक चिराग दुनिया। रोषन है कुफरो इस्लाम अल्लाहसे क्या जुदा है ॥ ४ ॥

## पद १८१

( राग—भिलु. जि. ताल—धुमाळी )

वाहद जात पाक है अल्ला। हरषय जुल्वे नूर हुवल्ला। बोलो लाइलाह इल्लिला। खुद आषक खुद माषूक इष्क दिवाना। हर शक्ल बनाजी

मस्ताना ॥ १ ॥ दरया इष्क जोष लहराया। आपकू मस्त अनलहक् गाया। हुबाव दरया हू ( ही ) मे समाया। अजाद खुदा आबाद किया मैखाना। मसजिदो दैर बुतखाना ॥ २ ॥ आदम अक्सनूर है रबका। हरदम सुनुत उस कुदरतका। खालीं सब झगडा मन ( मैं ) तूका। वोही मालीक खालीक पीर खाजा और बंदा ॥ ३ ॥ समझो वजुद कावेबैतुल्ला। हर दिल महल मुबारक अल्ला। पीवे कामील मुरषद प्याला। कुलफना बाकी रब मानीक बंदा साचा। बस करो सबक दीवाचा ॥ ४ ॥

---

## १८२ आरति

जयदेव जयदेव मनोहर गुरु स्वामिन्। तव विरहा न दृष्टासि मच्छासि स्वामिन् ॥ धृ० ॥ माया जाले गोले भाले संबद्धान्। तव पद विमले कमले जलबिंदु लग्नान् ॥ १ ॥ मात्रोदर कुहरे विवरे त्वतिपच्यान्। सौरे नीरे गहने भूरि बहुशोच्यान् ॥ २ ॥ एके नेके नाके सर्वे संबद्धान् ॥ मार्तंडोदय गुरुपद गुरुजात श्रद्धान् ॥ ३ ॥

## १८३ आरति

(राग—खमाज जिल्हा. ताल—धुमाळी)

माणिका लोकपालका दैन्यहारका सुरासुरवंद्या। मां पाहि दयाकुल विश्वप्रिय गुरुआद्या ॥ धृ० ॥ जो सत्य निजसुखें नृत्य सकल करि कृत्य जयाची सत्ता। अस्ति भाति प्रियरूप सकल जडाजडवेत्ता। परिपूर्ण अगुण आणि सगुण भासवी त्रिगुण रूप आणि नामा। मन शब्द रूप रस गंध भौतिक ग्रामा ॥ चाल ॥ जो एकचि अनंत विश्वा चेतवी। चिच्छक्ति भूत गुण साम्या नाचवी। निश्चल आणि चंचल हरि हा लाघवी। जो संत योगी विश्रांत अखिल वेदांत शोधिती ज्याला। दातृत्वें आत्मा देइ अत्रि ग्रहाला ॥ १ ॥ सकुमार ब्रह्म सुखसार मूर्ति अवतार प्रगट कल्याणीं। स्वच्छंदें क्रीडे भक्तवराभय पाणी। जो खेळ रची भूगोल म्हणे लडि-वाळपणें जा ताता। तो धन्य पिता आणि जगज्जननी ती माता। नरहरी

मोह निशि हरी दुष्ट गज हरी अनुज हो त्याचा । ज्या वर्णनीं थकली शेष बृहस्पति वाचा ॥ चाल ॥ हनुमंत सहित गुरु त्रिगुण मूर्ति प्रगटवी । जय प्रताप श्री यश भक्तां वाढवी । पाडुनि अमृत निजलीला चाखवी । निःसार दृश्य संसार सफल उच्चार करी जो नामा । गणगोत सखा कुलदेव इष्ट तो आम्हा ॥ २ ॥ निजनाम योगिविश्राम आत्मप्रिय धाम मुक्ति दे चारी । स्थापुनी क्षेत्र आणि सकल मता उद्धरी । गुरुभूप तेज गुण अमुप मनोहर रूप दावि भक्तांसी । स्पर्शनें धन्य वैकुंठपुरी आणि काशी । आनंद अचल निस्पंद महासुखकंद त्रिविध हरि तापा । अज अव्यय घन तुज नमो दृश्य कुल दीपा ॥ चाल ॥ निजरूप ज्ञानमार्तांडा द्योतवी । अज्ञान शोक विश्वाचा लोपवी । सच्चिदानंदपदें भक्तां नांदवी । या पदां गर्जि हो सदा अढळ निजपदा स्थिर करि प्रज्ञा । जी भक्त प्रतिज्ञा तीच श्रीगुरू आज्ञा ॥ ३ ॥

## श्री माणिकप्रभु महामंत्र

### १८४ आर्या

श्री प्रभुकृपा विनोदें, होईल जगबद्ध मुक्त नित्य पहा ।
जाळिल भ्रम प्रमासह, छेदुनि भव विधिनिषेध पादप हा ॥ १ ॥
गुह्यात्म लाभ देहीं, श्रीगुरु बोधां जनेंचि शोधावा ।
अतितर तत्त्व विवेकें, प्रत्ययरूपें सुजीव बोधावा ॥ २ ॥
रूप रहित घन ब्रह्मीं, मायिक अवकाश बहुगुणी गमला ।
तेथुनि मन जाणिव हे, चित्त अहंकार मीपणें भरला ॥ ३ ॥
मायिक सूक्ष्म भूतीं हो, स्वाभाविक सकल अंश जाणावा ।
नसता क्रम स्वार्धांशीं, कॆंवी पर अष्टमांश मिळवावा ॥ ४ ॥
णी बिंब जीव ईश, स्वरूपा म्हणती परंतु हें न घडे ।
वंध्यासुतकृत घटिं त्या, मृगजळिं हें सूर्यबिंब केंवि पडे ॥ ५ ॥
कल्पित स्वप्नीं व्याघ्रा, माराया सत्य शस्त्र नच लागे ।
तेंवी तत्त्वमसि या बोधेंविण, स्वस्वरूप नच जागे ॥ ६ ॥

जहति असंभव अजहति, जाणुनि मग भाग त्याग करुनि पहा।
टाकुनिया वाच्यांशा, लक्ष्यांशाशीं जीव पूर्णब्रह्म पहा ॥ ७ ॥
यजमानत्व स्वदेहत्रयीं दावी बंध मोक्ष जीवा या।
सदसद्विवरण करि जरि, तरि हरी गुरु शास्त्र होत जीवा या ॥ ८ ॥
गुज हें ऐक सख्या, नभ नील सदृश तुच्छ दिसे पाहीं।
श्रुति नेति-नेति वाक्यें, बोधिति भवदृश्य हें मुळीं नाहीं ॥ ९ ॥
रुक्मवर्ण सुख भूमा, निज तेजें निखिल भास भासवितो।
सविता हा जग साक्षी, सह त्रिपुटी विश्वधी नियामक तो ॥ १० ॥
मान मेय सह माता, भ्रम कल्पित वृत्ति व्याप्ति निजबोधा।
आनंद भोग ब्रह्म, स्फूर्तिरहित निर्विकल्प ते शोधा ॥ ११ ॥
णीत्वपणा व्यतिरेकें, पाहतां पाहणें न जाणणें कांहीं।
जरि अज्ञाना जाळी, शाब्दिक हें ज्ञान स्वानुभविं नाहीं ॥ १२ ॥
कर्ता योग्य नसे तरि, कार्य कसें पूर्ण सत्य मानावें।
नसोनि जरि भासतसे, मायिक हें अनृत व्यर्थ जाणावें ॥ १३ ॥
जन्य सुख क्षणिक हें, शोधा उन्मनि समाधि ही त्यागा।
शांत उदास सहज स्थिति, निर्मल निःसंग होउनी भोगा ॥ १४ ॥
यक्षरूप धरितो प्रभु, श्रीमाणिक नामरूप अपवादा।
भासवुनी सकलमतां, स्वमत पथें नेइ शीघ्र जो स्वपदा ॥ १५ ॥
जय जय हो जनक निजानंद जरा जन्म जर्जरीकृत भो।
नभतलमल सदृश, अखिलजगज्जालमूलनाशक भो ॥ १६ ॥
यज्ज्ञानामृत सेवुनि, हरिहर घनचित्सुखांत वुचकळती।
दृश्यात्मक जग आपणचि, हें सुख घेण्या पुन्हा उचंबळती ॥ १७ ॥
मा मा गा अन्य कथा, पुनरागमनार्थ शुष्क हे श्रम कां।
सकल मतां प्रभु हा तारि, स्वाश्रमस्तुति निंद्य अन्य आश्रम कां ॥ १८ ॥
णीस्वरूप ( णः ) इ माया, मः शंभ हा अकार विष्णु पहा।

क ब्रह्मदेव ऐसा सर्वात्मक एक पूर्ण माणिक हा ॥ १९ ॥ ॥
कल्पवृक्ष हा दृश्या, साधक सर्वार्थ वृत्ति भासवितो ।
तन्नाम ग्रहण करी जो, त्यासि सुखें निर्विकल्पि नांदवितो ॥ २० ॥
मनन करी स्तोत्रा जो, श्रद्धेनें त्या मिळेल गुप्त पथ ।
अनृत वदो तरी, हो कां निर्दय तो प्रभु अह्मास ही शपथ ॥ २१ ॥
ज्ञानरूप मार्तंड स्फूर्ति ही निज सुखांत अवतरली ।
निश्चित जनक पाहुनि सद्भक्तातें स्वयंवरें वरिली ॥ २२ ॥

## श्रीप्रभुचरित्र

### १८५ श्लोक

श्री दत्तात्रय रामतीर्थ नगरीं गर्भांत आले पहा ।
माता देवि बया, मनोहर पिता, लाडाख्य सिद्धाचिया ।
ग्रामीं बालचरित्र दावुनि जना कल्याण क्षेत्रासि ये ।
तो हा दत्त प्रभु निजात्म भुवनीं माणीक क्षेत्रीं असे ॥ १ ॥
गादीं बैसुनि ब्रीद गाजवि सदा म्लेच्छांसि बोधी निकीं ।
भक्त प्रार्थित भालचंद्र प्रभु हा आला हलीखेटकीं ।
भूत प्रेत पिशाच्च मुक्त करुनी भिक्षेसि प्रारंभिले ।
तो हा दत्त प्रभू० ॥ २ ॥
मैलारीं करुनी मखाप्रति निघे श्रीगाणगाख्यापुरा ।
नामें शरण सुशैव बंधन हरी स्थापी अखंडेश्वरा ।
यंत्रोनी निजस्थान जीवनपुरा जावोनिया येतसे ।
तो हा दत्त प्रभू० ॥ ३ ॥
कनकींसंगमीं राक्षसा वर दिले माहात्म्य ग्रंथांतरीं ।
विदुरग्रामक म्लेंच्छ सिद्ध सुजनीं प्रार्थीयला तो हरी ।
पाहोनी शरणी नृसिंह सदना आनंद मानीतसे ।
तो हा दत्त प्रभू० ॥ ४ ॥

भक्त प्रार्थित विश्वरूप धरुनी सर्वांगृहीं प्रगटला ।
पूजा घेउनि गुप्त होउनि पुन्हा नित्याश्रमीं परतला ।
म्लेंच्छें आणिलीं मद्यमांस, कुसुमें दुग्धाकृती होतसे ।
तो हा दत्त प्रभू ॥ ५ ॥

ऐका प्रेम पुरीं दरिद्र द्विज तो यात्रार्थ रामेश्वरीं ।
होता स्वप्न, प्रभूस बैसउनियां रुद्राभिषेका करी ।
आली भागिरथी जलांत पाहता खालींच सेतु दिसे ।
तो हा दत्तप्रभू० ॥ ६ ॥

राहे गुप्त वनीं पवित्र माणीक तीर्थास्वयें ।
श्री भद्रेश्वर ग्राम पाहुनि पुन्हा माणीक क्षेत्रासि ये ।
केला यज्ञ सुसर्वतोमुख सदा द्रव्यासि जो देतसे ।
तो हा दत्तप्रभू० ॥ ७ ॥

पापी भक्त यमालयांतुनि निजाज्ञेनें तया आणुनी ।
तीर्थीं संगमीं हो पवित्र म्हणुनीं आज्ञा तया देउनी ।
केलें मुक्त युगासि पाहुनि रूपासि आच्छादिलें ।
तो हा दत्तप्रभू० ॥ ८ ॥

जे कां बद्ध सुभक्त मुक्त असती या अष्टका वाचिती ।
होती दिव्य तनू अनेक विभवानंदें सुखें डोलती ।
नासोनी तम, ज्ञानपुंजवर जो मार्तंड तो सर्वदा ।
भासे होवुनि निर्विकल्प प्रभु हा नोहे कधीं आपदा ॥ ९ ॥

## मुक्तानंद लहरी

### १८६ श्लोक

जगीं पाहे नासाकृति पुरुष अती सुंदर स्त्रिया ।
सुवेषीं आभरणें नटति परि तें चित्रचि तया ।
स्वयें साक्षी क्रीडा करित असता आणि रमता ।
मुनी तो मोहेना निजगुरुकृपें ज्ञान पदवी ॥ १ ॥

क ब्रह्मदेव ऐसा सर्वात्मक एक पूर्ण माणिक हा ॥ १९ ॥ ॥
कल्पवृक्ष हा इश्या, साधक सर्वार्थ वृत्ति भासवितो ।
तन्नाम ग्रहण करी जो, त्यासि सुखें निर्विकल्पि नांदवितो ॥ २० ॥
मनन करी स्तोत्रा जो, श्रद्धेनें त्या मिळेल गुप्त पथ ।
अनृत वदो तरी, हो कां निर्दय तो प्रभु अह्मास ही शपथ ॥ २१ ॥
ज्ञानरूप मार्तंड स्फूर्ति ही निज सुखांत अवतरली ।
निश्चित जनक पाहुनि सद्भक्तातें स्वयंवरें वरिली ॥ २२ ॥

## श्रीप्रभुचरित्र

### १८५ श्लोक

श्री दत्तात्रय रामतीर्थ नगरीं गर्भांत आले पहा ।
माता देवि बया, मनोहर पिता, लाडाख्य सिद्धान्विया ।
ग्रामीं बालचरित्र दावुनि जना कल्याण क्षेत्रासि ये ।
तो हा दत्त प्रभु निजात्म भुवनीं माणीक क्षेत्रीं असे ॥ १ ॥
गादीं बैसुनि ब्रीद गाजवि सदा म्लेच्छांसि बोधी निकीं ।
भक्त प्रार्थित भालचंद्र प्रभु हा आला हळीखेटकीं ।
भूत प्रेत पिशाच्च मुक्त करुनी भिक्षेसि प्रारंभिले ।
तो हा दत्त प्रभू० ॥ २ ॥
मैलारीं करुनी मखाप्रति निघे श्रीगाणगाख्यापुरा ।
नामें शरण सुशैव बंधन हरी स्थापी अखंडेश्वरा ।
येवोनी निजस्थान जीवनपुरा जावोनिया येतसे ।
तो हा दत्त प्रभू० ॥ ३ ॥
केतकींसंगमीं राक्षसा वर-दिले माहात्म्य ग्रंथांतरीं ।
विदुरग्रामक म्लेंच्छ सिद्ध सुजनीं प्रार्थीयला तो हरी ।
पाहोनी झरणी नृसिंह सदना आनंद मानीतसे ।
तो हा दत्त प्रभू० ॥ ४ ॥

भक्त प्रार्थित विश्वरूप धरुनी सर्वांगृहीं प्रगटला।
पूजा घेउनि गुप्त होउनि पुन्हा नित्याश्रमीं परतला।
म्लेंच्छें आणिलीं मद्यमांस, कुसुमें दुग्धाकृती होतसे।
तो हा दत्त प्रभू॥ ५॥

ऐका प्रेम पुरीं दरिद्र द्विज तो यात्रार्थ रामेश्वरीं।
होता स्वप्न, प्रभूस बैसउनियां रुद्राभिषेका करी।
आली भागिरथी जलांत पाहता खालींच सेतु दिसे।
तो हा दत्तप्रभू०॥ ६॥

राहे गुप्त वनीं पवित्र माणीक तीर्थास्वयें।
श्री भद्रेश्वर ग्राम पाहुनि पुन्हा माणीक क्षेत्रासि ये।
केला यज्ञ सुसर्वतोमुख सदा द्रव्यासि जो देतसे।
तो हा दत्तप्रभू०॥ ७॥

पापी भक्त यमालयांतुनि निजाज्ञेनें तया आणुनी।
तीर्थीं संगमीं हो पवित्र म्हणुनीं आज्ञा तया देउनी।
केलें मुक्त युगासि पाहुनि रूपासि आच्छादिलें।
तो हा दत्तप्रभू०॥ ८॥

जे कां बद्ध सुभक्त मुक्त असती या अष्टका वाचिती।
होती दिव्य तनू अनेक विभवानंदें सुखें डोलती।
नासोनी तम, ज्ञानपुंजवर जो मार्तंड तो सर्वदा।
भासे होवुनि निर्विकल्प प्रभु हा नोहे कधीं आपदा॥ ९॥

## मुक्तानंद लहरी

### १८६ श्लोक

जगीं पाहे नामाकृति पुरुष अती सुंदर स्त्रिया।
सुवेषीं आभरणें नटति परि तें चित्रचि तया।
स्वयें साक्षी क्रीडा करित असता आणि रमता।
मुनी तो मोहेना निजगुरुकृपें ज्ञान पदवी॥ १॥

कधीं देवालयीं हो कधिं घरिंच माडीवरीं वसे ।
कधीं शैलाग्रीं हा कधिं क्वचित खेळे नदितटीं ।
कधीं संतोषानें वसत ऋषिच्या पर्णकुटकीं ।
मुनी तो मोहेना० ॥ २ ॥

वनीं वृक्षा पाहे दलफलभरें नम्र दिसती ॥
बहुच्छायापक्षीगण मधुर शब्दें सुखविती ।
वसे रात्रीं दिवसा शयन करि भूमंचकिं सुखी ।
मुनी तो मोहेना० ॥ ३ ॥

कधीं विद्वासांसी अति सुरस आनंद रसिकीं ।
कदाचित् काव्यालंकृत मधुर वाणी सुखविती ।
वदे तर्का युक्ती श्रुति बहु सुतर्कैंच हटवी ।
मुनि तो० ॥ ४ ॥

कधीं दिव्य स्त्रीच्या मुखकमलिं ग्रासाप्रति स्वयें ।
सुखें घाली घेई स्वसुखिं मग ठेवी मुख मुखीं ॥
अभेदाद्वैताचा स्वरुप महिमा तो प्रगटवी ।
मुनी तो० ॥ ५ ॥

मौनामौन दिसे गुणींत गुणि हा पंडिति पंडितसा ।
दीना दीन दिसे सुखींत सुखि हा भोगींत भोगी दिसे ।
मूर्खीं मूर्ख असा स्त्रियां तरुणसा वक्त्यासि वक्ता दिसे ।
तो हा धन्य जगीं सुखी त्रिभुवनीं जोऽवधूताऽवधूत ॥ ६ ॥

## उपदेशरत्नमाला

### १८७ ओव्या

श्रीमाणिक जयमाणिक । हरमाणिक हरिमाणिक । चिन्माणिक सन्माणिक । जयजयहो सकलमता विजय हो ॥ १ ॥ चैतन्यदेवा हीच

प्रार्थना। एकचि तूं दिससी नाना। प्रगटुनि आमुचिया भजना। सिद्धि द्यावी ॥ २ ॥ सकल मता प्रेरक। चैतन्य एक गुरुमाणिक। हा सिद्धांत मोक्षदायक। सत्य सत्य ॥ ३ ॥ मनीं सकल मतीं द्वेष। वरी करूं भजन घोष। तरी कल्पकोटि नरकवास। घडो आम्हां ॥ ४ ॥ रामकृष्ण संतसज्जन। शिव शक्ति सूर्य नारायण। गुरुउपदेश महावाक्य श्रवण जाण। सकलमता अनुसरती ॥ ५ ॥ सूर्यकिरणीं मेघमंडळ। जल वर्षोनि होती निर्मल। तैसे जातिधर्म विविधमतें सकळ। चिदाकाशीं सावळती ॥ ६ ॥ मतमतांतरीं अनुचित (अनहित) जें जें। निरसोनि सुख साम्राज्य भोगिजे। तरीं कायावाचा मनें सेविजे। सकलमतीं ईश जो ॥ ७ ॥ तूं गा भक्तकार्यकल्पद्रुम। सकलमता विजय हो स्वस्वधर्म। हा राजमार्ग उत्तमोत्तम। साक्षी श्रीशिवदत्त ॥ ८ ॥ अनंत वेद अनंत आचार्य जाण। परा पश्यंती वैखरी स्फुरण। सिद्धवचन भूत भविष्य वर्तमान। अनंतानंत नमितों आम्हीं ॥ ९ ॥ धर्म कर्म त्यागाचरण आचार विचार पाप पुण्य। सर्व कर्मे श्रीमाणिकार्पण। हीच आमुची प्रतिज्ञा ॥ १० ॥ जिव शिव शास्त्र षट् प्रमाण। पंचभूत इंद्रिय प्राण। सकल मतस्थ शरीर जाण। विषय भोगिती अभेदपणें ॥ ११ ॥ सकल मतीं हा आत्मा ईश्वरु। आम्हीं सकल मतां जाणोनी आदरूं। तोचि हो आमुचा सद्गुरु। जो कां श्री सकलमताचार्य ॥ १२ ॥ जे कां वंदिती निंदिती। स्वभाव नास्तिक भेदमत स्थापिती। तेही आदरली या सकलमती। सर्वांतरीं श्रीमाणिक ॥ १३ ॥ धन्य माता धन्य पिता। धन्य उपासना धर्म दैवता। जो आदरी या सकलमता। तोचि धन्य धन्य ॥ १४ ॥ स्वरूप प्रकाश आनंद चैतन्य। शिष्य गुरू मी तूं पण। सर्वरूपें हा श्रीप्रभु जाण। म्हणे ज्ञान मार्तंड ॥ १५ ॥

## आर्या

अस्ति भाति प्रिय जग हें सकलमतीं चित्प्रभू दुजा नाहीं।
जाणुनि सकलमता मी स्थापक हें ब्रीद गाजवी पाहीं ॥ १ ॥

## साकी

श्रीपीठा वामांगीं प्रभु व्यंकट मारुती मार्ताण्डा ।
दक्षिण दत्तात्रय शिवपार्वती गणसह नवचामुंडा ।
ध्या तुम्ही सकलमती, सोडा भवभय भीति ॥ १ ॥

## श्लोक

गुरु दत्तात्रय, सव्यभागीं शिव हा, श्रीचित्कला पार्वती ।
वामांगीं प्रिय श्रीनिवासप्रभुहा, रुद्रप्रभु मारुति ।
अज्ञानांध वितंड नाशक पहा, मल्लारिमार्तंड हा ।
अंतीं विठ्ठल पांडुरंग भजनीं लाभें सुखें मोक्ष हा ॥ १ ॥



॥ श्री ॥

# श्री थोर मनोहर महाराजांचीं पदें

ये केशवा झडकरी मम आश्रमातें। नारायणा[2] परिहरी आमुच्या श्रमातें। श्रीमाधवा[3] परमधीर उदार लोकीं। गोविंद[4] विष्णु[5] मज आज कृपे विलोकीं ॥ १ ॥ आपन्न रक्षित सदा मधुसूदना[6] तूं। हे सांगतो त्रिभुवनांत तुझाच नातु। श्रीवत्सलांच्छित त्रिविक्रम[7] वामनाचे[8]। नामें सदाशिव अखंड प्रचंड नाचे ॥ २ ॥ कृपा श्रीधरा[9] येउंद्या जी मनासी। हृषिकेशजी[10] सत्वरी दैन्य नाशी। मला पद्मनाभाविणें[11] कोण हातीं। धरूनीं असे कष्ट वारूं पाहाती ॥ ३ ॥ दामोदरा[12] निगमवंद्य भवान्धि देवा। संकर्पणा[13] कमललोचन वासुदेवा[14]। प्रद्युम्न[15] प्राज्ञ अनिरुद्ध[16] वलानुजारे। पुरुषोत्तमात्म[17] सुखदाखिल वैभवा रे ॥ ४ ॥ रक्षी सुसंकटिं अधोक्षज[18] नारसिंहा[19]। होशील कीं दुरित वारण घातसिंहा। सर्वांतरीं वससि अच्युत[20] देवराया। वेगीं जनार्दन[21] पदद्वय देवराय ॥ ५ ॥ दिनानाथ उपेन्द्रसान्द्र[22] हरये[23] श्रीकृष्ण[24] श्रीद्वारका। नाथा शाश्वत भक्तवत्सल महापापी दिनोद्धारका। आतां अंत न पाहणें जलधिजाकांता अनंता हरि। प्रार्थी दीनमनोहरा हृदिं धरी चिंता हरी लौकरीं ॥ ६ ॥

## पद

( राग—मालकंस. ताल—त्रिताल. )

दत्त नाम तूं जपले प्राणी। जबलग तनमें सांसीहै। नहीं भरोसा घडि पल छनका। आगे जन्मकी फांसी है ॥ धृ० ॥ पकड गरीबी, छोड गुरूरी। गुरबत जगमो खासी है। कहे मनोहर आज नेकी कर। क्या जाने कल कैसी है ॥ १ ॥

---

॥ श्री ॥

# श्री नृसिंह महाराजांचीं पदें.

## पद १

( राग—सोहनी. ताल—धुमाळी. )

प्रभु माझा काय करील तें खरें ॥ धृ० ॥ इतर चिंतिल्या व्यर्थ तें काई । वाईट अथवा बरें ॥ १ ॥ वाहुनि चिंता कांहीं एक नोहे । ठेवी मनाला स्थिर रे ॥ २ ॥ ठेवुनि भार प्रभूच्या चरणीं । नरहरि धरितो धीर रे ॥ ३ ॥

## पद २

श्री आदि देवी रेणुके भवानी ग पाव मला तूं तुके ॥ धृ० ॥ संसार घोर खवळलों । त्रिविध तापें तापूनि पोळलों । षड्गण वैऱ्यांनीं आवळलों । मोह महाममतेमध्यें पिवळलों । मदमस्तीमध्यें मी झुके ॥ १ ॥ परधन परदारावरी । बहु सायासें ध्यास मनीं धरी । वैभवा भोगी परोपरी । विषयमय वृत्ती बाह्य अंतरीं । मी माझें मानुनी सुखें ॥ २ ॥ नच धर्म कर्म विधिनिकीं । नसे तव नाम प्रेम कधीं मुखीं । कटु भाषण शब्दें तिखीं । साधु सत्पुरुष केले बहु दुःखी । नाहीं जेवविले द्विज भुके ॥ ३ ॥ ऐसें मी अघ करकरूं । त्रासलों चौऱ्यांशीं फिरफिरूं । आतां कोठवरी तरी धीर धरूं । नको हा जन्म पुन्हा खरोखरूं । भवपाश नाशी चंडिके ॥ ४ ॥ अन्यायी अधम मी खरा । परंतु शरण आलों सुंदरा । तुजवांचुनी जगीं आसरा । नाहीं नरहरिली दूसरा । निजपदीं ठेवी अंबिके ॥ ५ ॥

# श्री बक्कप्रभु पंचपदी

## पद ३

जग झालें मतिमंद अनिवार । म्हणोनी अवतार बक्कप्रभू ॥ धृ० ॥ कैलासाचा नाथ आला भुमीवरी । परोपरी तारी शरणांगत ॥ १ ॥ आली-याची तसे हा लाज । पुरविता काज वांच्छियेल्या ॥ २ ॥ सिद्धाचाही सिद्ध । योग्यांचे मुगुट । श्रेष्टाहूनी श्रेष्ठ जगामाजी ॥ ३ ॥ जयाचें प्रभुत्व जगामाजी गाजे । नरहरि ओझें घाली तया ॥ ४ ॥

भजन

जयगुरु वक्का श्रीगुरु वक्का । वारी माझ्या भवभय दुःखा ॥

पद ४

शिवभक्ताचिये पोटीं । आला प्रभुभक्तिसाठीं ॥ धृ० ॥ बाळपणीं त्यजी गेह सदा वनामाजीं राहे ॥ १ ॥ वनचरा समप्रीति । नाहीं मनुष्याची गति ॥ २ ॥ सिद्ध क्रिया योग बळें । एकलाची वनीं खेळे ॥ ३ ॥ काया वाचा मनें कोणी । शरण जाय भक्त वनीं ॥ ४ ॥ तया गृहाप्रति जाय । देई वांच्छियले काय न ॥ ५ ॥ भूत प्रेत रोग सारे । स्पर्श मात्रें सर्व वारें ॥ ६ ॥ सुख संपत्ति देवोनी । पुन्हा जाई निजस्थानी ॥ ७ ॥ ऐसा प्रभू वक्क पाहे । नरसिंह तया ध्याये ॥ ८ ॥

भजन

जिव्हे वद श्रीगुरु वक्काशी । तारील वारूनी भवभय फांशी ॥

पद ५

जाई पाही गाई ध्यायी लाही श्रीगुरू वक्क हो ॥ धृ० ॥ जाउनी गुरु, पाहूं लीला, व्हा मनीं बहू लक्‌ हो । तोषुनि त्वरें मुक्ति देतो नासुनि भव-दुःख हो ॥ १ ॥ मंदमति बधिरांध कुष्ठी, मंदवाचा मूक हो ॥ २ ॥ रोग नाना भोग वारूनी अमोघ देई सुख हो ॥ १ ॥ शरण गेल्या मरण मारुनी ज्ञान देई वक्क हो । तारी तारी दास तूझा नरहरी माणिक हो ॥ २ ॥

भजन

धांव सख्या श्री प्रभुराया । दाखवि मज तव निजपाया ॥

पद ६

मना रे ध्याई त्वरेनें श्रीगुरु वक्क सदा । स्मरतां नाम जयाचें वाचें वारिल दंभ मदा ॥ धृ० ॥ अभय करानें तारुनी नेई शेवटिं अपुल्या पदां । नरहर प्रभु वक्काचे ध्यानीं राही गायी ब्रीदा ॥ १ ॥

भजन

धांवुनि येई प्रभुराया । वारी माझी हीमाया॥

## पद ७

धांव सख्या बक्केशा ॥ धृ० ॥ प्रभु योगी गुरु अविनाशा । तापलों मी त्रिविध तापातें । जाचूं पाहती सहा बहू माते । सोसवेना आतां या दुःखातें येई लवकरी श्रीगुरु बक्का ॥ १ ॥ तुजवांचुनीं कोणीच नाहीं । दीन नरसिंहा पाहा ॥ २ ॥

## भजन

सांबचि हा बक्क प्रभू झाला । भेद नाहीं सांवा बक्काला ॥

## आरती ८

जयदेव जयदेव जय गुरु बक्केशा । सद्गुरु बक्केशा । आरति ओंवाळूं तुजला योगीशा ॥ जय० ॥ मतिमंद जग विषयांध नाना । साधुसंतां कोणा कोणी मानीना । माया मोहें भुलले देहाभिमाना । संकट पडलें तुजला कैलासराणा ॥ १ ॥ टाकुनि कैलासातें येशी भूमीवरी । घेशी अवतारहि तूं शिवभक्ताउदरीं । सांगुनि सर्वांलागीं जाशी वनांतरीं । स्वच्छंदें वर्तुनियां इच्छा मात्र करी ॥ २ ॥ लीन होतां चरणा कृपें अवलोकीं । संतति संपति देउनि करिसी त्यासी सुखी । भूतप्रेतबाधा जाती रोग निकीं । बक्कप्रभु या नामा सरस सुखीं ॥ ३ ॥ भक्त येती देशोदेशींचे सर्व । इच्छित पुरवुनि देशी आलिंगन बरवें । अनन्यभावें शरण तुजला नरसिंह । श्रीगुरुराया देई निजचरणठाव ॥ ४ ॥

## अष्टक ९

मनें ध्यायी नेत्रीं पाहीं वाचे गायी हो सदा । बक्कप्रभु बक्कप्रभु बक्कप्रभू या श्रीदा ॥ १ ॥ जया वाटे दारा धन पुत्र पौत्रादिक । प्राप्त होउनियां पावे सर्वपरीचें सुख । मनें ध्यायी० ॥ २ ॥ जया वाटे पाप जावें पुण्य व्हावें बहुपरी। स्वर्गवास सदोदित येउनियां जगांतरीं । मनें ध्यायी० ॥ ३ ॥ जया वाटे भूत प्रेत रोग सर्व नासुनी । चिरंजीव वज्रदेह व्हावें मीं या क्षणीं । मनें ध्यायी० ॥ ४ ॥ जया वाटे माया हरो ब्रह्म स्फुरो निर्गुण । देह असे तातविधें हस्ततीस भोगणें । मनें ध्यायीं० ॥ ५ ॥ जया वाटे इच्छितमन प्राप्त होय कां सदा । इहपरादि

साधुनियां व्हावें सुखसंपदा । मनें ध्यायी० ॥ ६ ॥ जया वाटे करावेंच जन्म हाचि सार्थक । राहुनियां काय व्यर्थ देह हा निरर्थक । मनें ध्यायी० ॥ ७ ॥ ज्ञान ध्यान सर्व जाण सांडुनिया यापरी । रात्रंदिन क्षणक्षणासी हेंचि करी नरहरी । मनें ध्यायी० ॥ ८ ॥

## शेजारति १०

निद्रा करी रे आतां, प्रभुराया । निजविति सख्या आदिमाया ॥ धृ० ॥ अहं ब्रह्मध्वनीं उठतांची । शिणलासि तयास्तव सांची ॥ १ ॥ सर्व साक्षी करोनी अकर्ता । ज्याची वाढे त्रिभुवनिं सत्ता ॥ २ ॥ ज्यासी जागृती निद्राचि नाहीं । भवहरासि नरसिंह गाई ॥ ३ ॥

## अष्टक ११

ननसु नेनसु महारुद्र वीरभद्रगे । दुःखहारक सुखकारक दायक भद्रगे । पूर्वदक्ष शिवगे अभ्युत्थान वेडिदा । कुडवलदर कुमतिइंद कुटिल आडिदा । शिवनिंदा आडि शैव भक्त काडिदा । सदाशिवग बिट्टु मखारंभ माडिदा ॥ १ ॥ यज्ञदोळगे देवि तंदि मनिगे होदळु । दक्ष मदादिंद अंदा याके बंदळु । अवमान कंडु शक्ति शिट्टु आदळु । कोपव्यरदु अग्निकुंडदोळग बिद्दळु ॥ २ ॥ देवी अग्नि ऐक्य नोडि कहरवायिते । स्वर्ग मृत्यु पाताळ सुदि होइते । दक्षसह ऋत्विजगण मोरि मायिते । कठीण काणि भूमि कंपवागि काणते ॥ ३ ॥ दूतमुखदि वृत्तांत केळि-पेट्टिगे । त्रिपुरारि त्रिनयन बंदा शिट्टिगे । अश्वरथा हस्ति आदि माडिवट्टिगे । मंदि न्यरदु दूतगणवु महाघट्टिगे ॥ ४ ॥ रूद्र आगि भूमि म्याल जटा विट्टिदा । प्रलयरुद्र वीरभद्र अवतार हुट्टिदा ॥ क्रूर तीव्र महातेज कवच तोट्टिदा । सेना बिट्टु दक्षमखके बंदु मुट्टिदा ॥ ५ ॥ वीरभद्र नोडि ग्रहगणवु देवरु । पक्षिरूप हिडदु प्राण दक्कि होदरू । यष्टु मूगु मीशि किंवी कडदु बिद्दरु । यष्टु देह बिट्टु स्वर्ग हादि हिडदरु ॥ ६ ॥ कुंड भग्न माडि द्वेषि दंड व्हडदने । तीव्र खड्ग तेगेदु दक्षतली कडदने । अमित लोक हिडदु त्रिशुलदिंद बडदने ।

विजयचागी हर हर हर न्यनसि नडदने ॥ ७ ॥ दुष्टदमन सुष्टसरक्षणार्थगे । बिट्टु कैलास बंदा मृत्युलोकगे । दूर माडुतान प्रभु भक्त आर्तगे । नरहरिगे दारु इल्ला अवन व्हरतुगे ॥ ८ ॥

## अष्टक १३

(वृत्त कामदा)

प्रभु तुझ्यापरी कोण मान्य रे । धरुनि कांसहि काय दैन्य रे । शरण वारि तूं संकट प्रभो । उघडि नेत्र तूं व्यंकट प्रभो ॥ १ ॥ सहज पाहतां तूं रमापते । मम विनाश पावेल पाप तें । कृपण दीन वाणीसि भाकितां । कळवळा नये कां उपेक्षिता ॥ २ ॥ धरिल कोण बा लाज रे हरे ॥ कृपणवत्सला तार्क्ष्यवाहरे ॥ पाप मी असें काय जोडिलें । म्हणुनियां तुम्ही मजसिं सोडिलें ॥ ३ ॥ परम पातकी तारिले असे । विमल नाम त्वां जोडिलें असे । असुनि तूझिया सारखा पति । मज विपन्नता कां प्रकोपती ॥ ४ ॥ तुजवरी प्रभो भार ठेवुनी ॥ सबळ मी आलों कार्य घेउनी । जरि मला इथें सोडिलें तरी । तरुनि जावया कोणची परी ॥५॥ बहुत दीन मी दास आपुला । सकलरक्षका कां प्रकोपला । करुनियां क्षमा कोटि दूषणें । यशद तीं मला द्यावि भूषणें ॥ ६ ॥ त्यजुनि राग ठेवा कृपा वरी । कुपित व्हावया कां बरोबरी । लघु जनांत मी किंकरापरी । उचित लेंकरा ती करा परी ॥ ७ ॥ नरहरी तुझें यश स्तवीतसें । तेंचि तूं करी योग्य जें दिसे । स्वशिर वाहिलें तूझिया पदीं । लोटि ना तरी बैसवा पदीं ॥ ८ ॥

## श्लोक

केली मीं प्रभुची बरी विनवणी या अष्टकाभीतरीं ।
वाटे ही भवसागरीं सुगमता तारावया वैखरी ।
त्याचा तोचि निजाष्टकाप्रति करी संचारुनी अंतरीं ।
नाहीं साह्य जरी जगत्पति हरी वाणी न चाले तरी ॥ १ ॥

॥ श्रीसद्गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥

# श्रीमहामौनशतक.

## ॥ ॐ निर्विकल्पपरब्रह्मणे नमः ॥

भक्तकार्यकल्पद्रुम गुरुसार्वभौम श्रीमद्राजाधिराज योगिमहाराज त्रिभुवनानंद अद्वैत अभेद निरंजन निर्गुण निरालंब परिपूर्ण सदोदित सकलमतस्थापित सद्गुरुमाणिक-प्रभुमहाराजकी जय ॥

### ( १ ) स्वरूपनिर्देश

नमो श्रीप्रभो माणिका निर्विकल्पा। नमो सिद्धसिद्धांत शुद्धस्वरूपा। नमो नेतिनेतीति वेदांतवेद्या। नमो निश्चला ब्रह्मरूपैकआद्या ॥ १ ॥ महामौनदुर्बोधश्रीमाणिकाच्या। पदां वर्णितां खुंटली मूळ वाचा। वळें भावितां भावनाही गळाली। स्तवूं श्रीप्रभू ही दुराशा जळाली ॥ २ ॥ मनें कल्पिजे रूप तें तों तगेना। विना कल्पितां कल्पनाही गळेना। म्हणोनी जरी द्वैतभावें स्तवावें। वृथा कल्पना दृश्य डोहीं बुडावें ॥ ३ ॥ अनिर्वाच्य हा श्रीप्रभू बोलवेना। बहू बोलतां बोलण्या आकळेना। म्हणोनी जरी मौनभावा धरावें। तरी तेहि वृत्तींत आलें स्वभावें ॥ ४ ॥ जरी सर्व दृश्या गुरूरूप पाहूं। तरी नित्य निःसंग कैसेनि होऊं। जगीं ब्रह्म ब्रह्माकृती विश्व आहे। अशी स्फूर्ति ही त्या स्वरूपीं न साहे ॥ ५ ॥ मुळीं दोर हा सर्प नाहींच झाला। तरी सर्व हा शब्द वायांच गेला। अपवाद देण्या वळें आळ दावी। अशी जी स्तुती तीच निंदा म्हणावी ॥ ६ ॥ नभाच्या मिषें नीलरूपा स्तवावें। प्रभूच्या मिषें भास दृश्यासि गावें। दिसे नीलिमा ती जशी सत्य नाहीं। तसें वाच्य लक्ष्यांश निर्मूळ पाहीं ॥ ७ ॥

### ( २ ) षट्प्रमाणनिरास.

नसे रूप त्या केविं प्रत्यक्ष दावूं। अनूमान ना लिंगदृष्टांत देऊं। वैधर्म्य-साधर्म्य उपमान नाहीं। अनिर्वाच्य तें शाब्द होईल काई ॥ ८ ॥ न

संपाद्य संपादकाची कथाही। म्हणोनी न दृष्टश्रुतार्थप्रसाही। अभावा जरी पूर्ण ब्रह्मत्व आलें। अभावप्रमामूल निर्मूल झालें ॥ ९ ॥ अशा षट्प्रमाणांसिही जें निराळें। नव्हे तें परिच्छिन्न दिग्देश काळें। अशा निर्विकल्पा कसें आकळावें। नये वृत्तिधर्मा कसें हो स्तवावें ॥ १० ॥

## ( ३ ) स्वसंवेद्यताखंडन–आणि अहंब्रह्मास्मिनिरासपूर्वक वृत्तिव्याप्तीचा निरास.

स्वसंवेद्यता ज्याचि त्याला कळेना। स्वयें अग्नि तोही स्वतेजें जळेना। असा बोध झाला तिला तीच तुर्या। म्हणें मीच हो चित्सुख ब्रह्म भार्या ॥ ११ ॥ महत्कल्पितां कल्पना ती पुरेना। म्हणोनी दिली ब्रह्मनामाभिधाना। स्वयें श्रीप्रभू शोधितां नाशभावी। म्हणोनी तया सत्य हें नाम ठेवी ॥ १२ ॥ अरे जाणतां जाणतां जाणिजे तें। म्हणोनी तया ज्ञान हें नाम येतें। पहा कल्पितां त्या महानंद होतो। म्हणोनी चिदानंद हा आळ येतो ॥ १३ ॥ जरी वृत्ति ही त्या स्थळीं शून्यभावी। महाशून्य हें नाम कल्पोनि ठेवी। जिया सूक्ष्म वृत्तींत जें बिंबलें हो। तसें नाम त्या कल्पुनी ठेविलें हो ॥ १४ पदां गाळुनी तत्वमूळार्थ घेई। नसे नाम ना रूप शोधोनि पाहीं। मना वाणिसी सर्वथा आकळेना। महामौन तो श्रीप्रभू बोलवेना ॥ १५ ॥ जरी ब्रह्मही ब्रह्म मी बोलिलें हो। वृथा जल्पती स्फूर्ति मिथ्या पहा हो। अहंता मनुष्यासवें आणि कोपा। परब्रह्मि ती केंवि मानेल बापा ॥ १६ ॥ जया जाणणें हेंचि त्या नेणणें हो। न जाणीतल्या तोचि होतो पहा हो। श्रुती नेतिनेतीति महिमा न जाणें। विना श्रीगुरू केलिया कोण जाणें ॥ १७ ॥ अतर्क्यासि तर्कूं नये सर्वथाही। विनातर्किल्या बोध तो होत नाहीं। तरी श्रीप्रभूसी सुतर्कें भजावें ॥ पुढें हो महामौनरूपें असावें ॥ १८ ॥ सुतर्कें सदा दुष्ट तर्कांसि वारी। महाकल्पनेनें विकल्पासि मारी। महाकल्पना श्रीप्रभूसीच कल्पी। बळें कल्पुनी

* अकराव्या श्लोकाचा पूर्वार्ध–स्वसंवेद्यताखंडन समजावें. आणि उत्तरार्धापासून अहंब्रह्मास्मि निरासपूर्वक वृत्तिव्याप्तीचा निरास समजावा.

मावळे निर्विकल्पीं ॥ १९ ॥ गुरूरूप मी ब्रह्म मी विश्व तो मी। अशा ऊठती ज्या महाज्ञानऊर्मी। प्रभूसेवनीं सर्वही त्या त्यजा हो। महामौन या श्रीपदीं लीन व्हा हो ॥ २० ॥ अहं देहि उच्चारितां पाप जैसें। अहं ब्रह्म म्हणतां अहा पुण्य तैसें। पहा शृंखला लोहहेमाचि घाली। नव्हे मुक्तसा बंधना मूळ झाली ॥ २१ ॥ जसी निंद्य ती काम्यकर्मप्रतिष्ठा ॥ स्वरूपीं तसीही अहंब्रह्मनिष्ठा । अहंतागुणें ईशही बद्ध होतो । अहाहा कसा जीव हा मुक्त होतो ॥ २२ ॥ अहंताबळें सर्वही दुष्ट झालें। मुळीं पाहिजे तेंचि निर्मूळ केलें। मुळीं राखितां वृक्ष नोहे न जाणा । अहंतागुणें मुक्त तो बद्ध माना ॥ २३ ॥ तथापी जरी ही भ्रमाज्ञान जाळी। परी पाहिजे पूर्णब्रह्मीं मुराली। जसें अन्न तें पुष्टि तुष्टीस खावें। परी जेविल्या पक्व-जीर्णेंचि व्हावें ॥ २४ ॥ मनोवृत्ति जी शुद्ध ब्रह्मासि भावी। स्वरूपस्थिती तीच बोलोनि दावी । नसे ज्ञानस्फूर्ति स्वरूपीं कदा हो । महामौन एकांत बोधें पहा हो ॥ २५ ॥ जिहीं पावले ते न जन्मोनि आले। बरे जाहले तेचि होवोनि ठेले। परंधामि त्या जाणिवेनेंचि जावें। परी जाणिवा टाकुनी तेंचि व्हावें ॥ २६ ॥ नसे ना दिसे ब्रह्म ही हो अविद्या। दिसे सर्वही ब्रह्म ही हो सुविद्या। जसा स्वप्निचा शूर व्याघ्रासि मारी। तसी ही सुविद्या अविद्येसि वारी ॥ २७ ॥

## (४) साक्षित्वनिरसन.

जिचा हा भ्रमाकार आकार झाला। तशा भ्रांतिचा बोधही तीस झाला। जसा सर्प तो भ्रांतिजन्यचि आहे। तसा बोधही भ्रांतिमूळासि पाहे ॥ २८ ॥ अधिष्ठान हें भ्रांतिकाळीं दिसेना । निराधार भ्रांतीहि कोठें वसेना। परी ज्ञान अज्ञानही भ्रांति पाहीं। अधिष्ठान त्या लेशही स्पर्श नाहीं ॥ २९ ॥ जसी स्वस्वरूपींही मायीक स्फूर्ती। तसी ती पहा साक्षिणी अन्यवृत्ती। स्वरूपीं पहा स्फूर्ति साक्षित्व नाहीं। म्हणोनी सदा ते महामौन पाहीं ॥ ३० ॥

## ( ५ ) साधकास स्वरूपनिश्चय प्रकार.

सुषुप्तींत जो भोग आनंद झाला । स्वयें भोगुनी तो न जाणें तयाला । परी जागृतीच्या अवस्थेंत पाहीं । विना भोग झाल्या स्मृती होत नाहीं ॥ ३१ ॥ तदाकार वृत्तींत जो भोग होतो । स्वस्वानुभव तोचि उच्चार होतो । स्वरूपीं जरी स्फूर्तिलेशांश नाहीं । स्वस्वानुभव तोहि मिथ्या न पाहीं ॥ ३२ ॥

## ( ६ ) आभासविचारपूर्वक मिथ्यात्वसाधन तथा उपदेशव्यवस्था ( सदृष्टांत )

असा बोध ज्या वृत्ति विंबासि झाला । विचारें पहा तोहि मिथ्यांत आला । म्हणोनी खरें हें जसें दृश्य नाहीं । तसा सर्व द्रष्टाहि मिथ्याच पाहीं ॥ ३३ ॥ जशी नित्यही नीलिमा सत्य वाटे । विचारें पहा सर्वथा रूप खोटें । त्रिकालीं नभा नील संबंध जैसें । नसे नील रूपासिही नाश तैसें ॥ ३४ ॥ जया अंतरीं शुद्ध सज्ज्ञान जागे । अशा भ्रांतिचा लेशही त्या न लागे । त्रिकालीं नभा पूर्ण सत्यत्व जाणा । तसी नीलिमाही असत्याचि माना ॥ ३५ ॥ जिला प्रातिभासीक सत्यत्व आहे । तिला पारमार्थिक मिथ्यात्व पाहें । जसें नीलरूपासि मिथ्या पहावें । असोनी तसें दृश्य जाणोनि घ्यावें ॥ ३६ ॥ विना नीलिमा त्या नभासी न पाहे । विना वृत्ति त्या ब्रह्म सौख्या न लाहे । दिसे नीलिमा ती मुळीं सत्य नाहीं । तसें चाखिलें तेंहि मिथ्याच पाहीं ॥ ३७ ॥ अजन्मा जसा स्वप्निं स्वप्नास भोगी । तसा हो पहा जीव संसार भोगी । जशी स्वप्निंची हाक त्या जागवीते । गुरूवाक्य तैसें भ्रमा घालवीतें ॥ ३८ ॥ जरी स्वप्निंची हाक ती पूर्ण मिथ्या । परी जागण्या होतसे तीच सत्या । जसें जागृता स्वप्न-संस्कार होती । तसें ज्ञानियाही अहंब्रह्मस्फूर्ति ॥ ३९ ॥

## ( ७ ) मायावर्णनपूर्वक स्वानुभवकथन.

पहा पां नसोनीच आभास भासे । नसे भास तें हें विचारें प्रकाशे । म्हणोनीच दुर्बोध ही ईशमाया । बहू तर्कितां तर्कही होत वाया ॥ ४० ॥

स्वयें नासुनी स्वस्वरूपासि दावी । स्वयें तर्क तर्कोनि ब्रह्मासि भावी । अहो वाणिनें मौनरूपा वदावें । परी शब्दत्यागें स्वयें मौन व्हावें ॥ ४१ ॥ जशी शर्करा गोडि वाचे वदावी । चवी चाखण्या तीच खायास द्यावी । विना भक्षिल्या गोडि तीही कळेना । जिला भक्षिली तीच गोडी असेना ॥४२॥ पहा गोडि ती शर्करारूप नाहीं । तसी शर्करा गोडि ती एक नाहीं । विना शर्करा गोडि तीही असेना । म्हणोनि विना भक्षिल्या ती कळेना ॥ ४३ ॥ कळे गोडि ती बोलतां बोलवेना । मुखें बोलतां त्यांत गोडी असेना । स्वरूपाकृती वृत्ति ती शर्करा हो । तिसी भक्षुनी गोडि ती वस्तु ध्याहो ॥ ४४ ॥ पहा भ्रांतिनें खांब हा चोर झाला । तसा ईश हा जीव भावास आला । विचारें तया बाध देवोनि पाहें । त्रिकालीं खरा खांबची एक आहे ॥ ४५ ॥ मुळीं खांब हा चोर झालाचि नाहीं । तया बाध देणें वृथा कष्ट पाहीं । जया भ्रांतिज्ञानें पडे मोहफांशी । तया ज्ञान हें स्वात्म-बोधें प्रकाशी ॥ ४६ ॥ स्वयें आपणा जाळि कर्पूर जैसा । अरे जाळिजे आपणा तूंहि तैसा । स्वरूपीं कदा द्वैतभावें नसावें । नसोनी सदा सर्वदा हो असावें ॥ ४७ ॥ मुखें श्रीप्रभू स्वस्वरूपा म्हणावें । तरी स्वस्वरूपीं कसें द्वैत ध्यावें । विनाद्वैत ना जाणणें नेणणें हो । म्हणूनी सदा स्वस्वरूपीं रहा हो ॥ ४८ ॥ मनेंवीण जाणीव कोठें असेना । मनेंवीण नेणीव ही हो वसेना । परी त्या मना मूळ सत्यत्व नाहीं । अरे नीलिमा ही विचारूनि पाहीं ॥ ४९ ॥ असा श्रीगुरुबोध संकेत झाला । स्वयें नाहिंसा होउनी पूर्ण ठेला । कृपा श्रीप्रभूची जया पूर्ण झाली । कळे ही तयाला महामौन-बोली ॥ ५० ॥ जयाची कृपा ही मुखें बोलवेना । असा श्रीप्रभूही कदा वर्णवेना । बळें जाणतां त्या अहंभाव येतो । अहंतागुणें देवही दूर होतो ॥ ५१ ॥ गुरूच्या कृपें मी गुरुरूप झालों । जगा ब्रह्म भावूनि ब्रह्मीं मिळालों । दिसे ज्यामुळें दृश्य जाणें जगासी । तया चित्प्रकाशा न कोणी प्रकाशी ॥ ५२ ॥ असा बोध ज्या शुद्ध जिवांसि झाला । परी पाहतां तोहि मिथ्यांत आला । पहा स्वप्निं दारिद्र्यदुःखें दुणावे । मृषाद्रव्यलाभें महा-सौख्य पावे ॥५३॥ महाज्ञान ब्रह्मस्वरूपासि लक्षी । अवस्थात्रयी जाणता

सर्वसाक्षी। स्वयें मुक्त होवोनि जीवासि तारी। स्वयें जाणुनी स्वात्मबंधा निवारी ॥ ५४ ॥ जगीं ईश तो जीव तो सर्वभोक्ता। महायोगि तो भोगि तो सर्वकर्ता। स्वयें आपणा जाण जाणोनि पाहे। स्वरूपीं सदा मुक्त होवोनि राहे ॥५५॥ म्हणे मीच हो श्रीगुरू पूर्ण झालों। विचारें महामौन होवोनि ठेलों। असा सर्वही तो चिदाभास पाहीं। तयावीण बोधासि ठावाचि नाहीं ॥ ५६ ॥ महाज्ञान अज्ञान हें वैर धर्मी। जरी भासती त्या अधिष्ठान ब्रह्मीं। परी तें अधिष्ठान निःसंग आहे। नसे स्पर्शही त्यामुळें त्यासि पाहें ॥ ५७ ॥ स्वरूपीं जरी सर्वही दृश्य भासे। अभासे असे जीव इशासि भासे। जिच्यापासुनी ईश हे जीव नाना। स्वरूपाकडे धांवताती उरेना ॥ ५८ ॥

## (८) आभासवाद अंगीकारपूर्वक जीवईशरूपकथन तथा पारमार्थिक प्रातिभासिक सत्तानिर्णय.

अशी ही बया जी महाज्ञानस्फूर्ती। तिणें निर्मिली जीव ही ईशमूर्ती। जरी ही परब्रह्म सत्ता म्हणावी। सती नासती तुच्छ मिथ्या पहावी ॥ ५९ ॥ स्वयें निर्मिलें दृश्य हें व्यर्थ होतें। असें मानुनी निर्मिलें या जिवातें। अशा या जिवां सर्वदा कोण रक्षी। धनी निर्मिला ईश हा सर्वसाक्षी ॥ ६० ॥ स्वयें निर्मिले जे असे दोन पक्षी। चिदाभास कल्पोनियां त्यासि रक्षी। नको या स्थळीं घेउं संदेह कांहीं। असे वेदसिद्धांत शोधोनि पाहीं ॥ ६१ ॥ चिदाभास हा ज्ञानअज्ञानभर्ता। तसा ईश हा सर्वनिर्माणकर्ता। पहा कोण हा भ्रांतिनें बद्ध झाला। विचारेंचि जो आपणां मुक्त केला ॥ ६२ ॥ तदाकार होवोनियां बोध सांगे। म्हणे ब्रह्म मी जाहलों संतसंगें। स्वरूपस्थिती सर्व बोलोनि दावी। स्वयें स्वस्वरूपा परब्रह्म भावी ॥ ६३ ॥ अहो स्वप्निचा शूर व्याघ्रासि मारी। महासंकटीं धांउनी विघ्न वारी। खरा व्याघ्र तो स्वप्नशूरा न पाहे। खरा शूर तो स्वप्नव्याघ्रा न लाहे ॥ ६४ ॥ जसा बद्ध होता तसा मुक्त झाला। चुकूनी पुन्हा मूळ स्थानासि आला। जसा हो तसा स्वस्वरूपचि आहे। शिरीं बद्धता मुक्तता

व्यर्थ वाहे ॥ ६५ ॥ महास्वप्न हें विश्व ब्रह्मांड जाणा । तयामाजि हे स्वप्न संसार माना । नव्हे दृश्य हें पूर्ण ब्रह्मचि आहे । असा बोलका तोहि स्वप्नींच पाहे ॥ ६६ ॥ जरी या मना उन्मनी पूर्ण झाली । परी जागृती त्यासि नाहींच आली । सदा वृत्ति त्यागें स्वरूपीं मिळाला । विचारें पहा तोहि स्वप्नांत आला ॥ ६७ ॥ अनिर्वाच्य ती जागृती बोलवेना । विना जागृती जागृती ती कळेना । जसी स्वप्निची हाक स्वप्ना निवारी । तसा बोध हा शुद्ध जीवास तारी ॥ ६८ ॥

## ( ९ ) सच्चिदानंदस्वरूपनामविवेचन.

स्वरूपा चिदानंद भावें भजावें । तरी तेंही वृत्तींत आलें स्वभावें । नसे नामसंबंध ना लक्षणाही । विना केलिया श्रीगुरू होत नाहीं ॥ ६९ ॥ पहा सत्ववृत्तींत जें ब्रह्म आलें । तया ज्ञान हें नाम वेदेंचि बोलें । विना वृत्ति आनंद ही जाणवेना । म्हणोनी चिदानंद हे बोलवेना ॥ ७० ॥ अविद्या जडा दुःखदा हीं असावी । स्वरूपा चिदानंद हें नाम ठेवी । अपवाद हा व्यर्थ ब्रह्मीं वदावा । तरी सर्व नामें परब्रह्म गावा ॥ ७१ ॥ नसे स्वस्वरूपत्व उल्लेख पाहीं । तरी स्वस्वरूपास्वरूपत्व नाहीं । पदातीत वाक्यार्थ शोधोनि घेसी । तरी तूं महामौन तात्काळ होसी ॥ ७२ ॥

## ( १० ) अध्यारोप अपवादकथनपूर्वक श्रुतिवाक्यांचा वास्तविक अर्थ.

म्हणों श्रीप्रभू तो करोनी अकर्ता । स्वयें भोगुनी श्रीप्रभू हा अभोक्ता । मना इंद्रियां वांचुनी सर्व भोगी । परी भोग भोगूनियां तो न भोगी ॥ ७३ ॥ जसें सर्व भूतांतरीं व्योम आहे । परी भूतभावा कदापी न साहे । जळेना भिजेना उडे तें कदाही । तसा श्रीप्रभू दृश्यबंधांत नाहीं ॥ ७४ ॥ अशा ज्या श्रुती स्थापिती मुक्तधर्मा । पहा त्या श्रुती वर्णिती ईशकर्मा । तसें ज्ञानिया वर्णिती त्या श्रुतीही । स्वरूपाकडे अर्थसंबंध नाहीं ॥ ७५ ॥ जरी त्या श्रुती वर्णिती स्वस्वरूपा । तरी हाचि गा मुख्य आरोप बापा । परी ज्ञानिया हेंचि ऐश्वर्य पाहीं । बळें भोगुनी स्वल्पही लिप्त नाहीं ॥ ७६ ॥

श्रुती या जगा जी असंभाव दावी । परब्रह्म संबंधिनी ती म्हणावी । असो । दृश्य हें मूळ झालेंचि नाहीं । तरी भोगणें तें मृषापूर्ण पाहीं ॥ ७७ ॥

## ( ११ ) मुक्तिस्वरूपकथनपूर्वक तुरीयबोधनिरास.

वळें कल्पितां त्या महादोष लागे । म्हणोनी श्रुती नेतिनेतीति सांगे । आहे नाहिं त्यासी कदा बोलवेना । विधी ना निषेधासि तो आतळेना ॥ ७८ ॥ अहंब्रह्मबोधें जरी हो सुखावे । परी तो स्वरूपस्थिती ती न पावे । स्वरूपासि त्यागोनि ब्रह्मास्मि गातां । अहा मुक्तता केंवि येईल हाता ॥ ७९ ॥ स्थिती त्यागुनी वृत्ति सौख्यचि ध्यावें । तरी हो सुखें बद्धरूपें असावें । दिसे कामुका कामिनी ब्रह्मलीला । तिला तापसी तो महातुच्छ केला ॥ ८० ॥ जया बद्ध मी दृश्य हें तुच्छ वाटे । अहंब्रह्म बोधें तया सौख्य दाटे । अरे ज्या स्थळीं स्फूर्ति वार्ताहि नाहीं । अहंब्रह्म वा बद्ध-निर्मुल पाहीं ॥ ८१ ॥ पहा द्रव्यलाभास जो आड आला । मृषा सर्प तो युक्तिनें दूर केला । महालाभ हाता न येतां पहा हो । वृथा विघ्न नासे धणी तोषला हो ॥ ८२ ॥ अहंब्रह्मबोधें जरी भ्रांति गेली । स्वरूप-स्थिती पूर्ण हाता न आली । उदया न आदित्य अद्याप आला । परी कुक्कुटा तो महानंद झाला ॥ ८३ ॥

## ( १२ ) मुख्य भक्ति.

पदा पावण्या ज्ञान हें द्वार मोठें । महाद्वार ओलांडितां वस्तु भेटे । महाद्वार ओलांडुनी आंत जावें । स्वयें नासुनी मुख्य देवा भजावें ॥ ८४ ॥ अरे सत्य हें सत्यसत्य त्रिवाचा । विनाभक्ति हा श्रीप्रभूलाभ कैंचा । म्हणोनी प्रभूपादपद्मा नमावें । कृपा केलिया तत्पदीं लीन व्हावें ॥ ८५ ॥ कृपा ती अहंब्रह्मस्फूर्तीसि मारी । कृपा ती महासंशयांतूनि तारी । कृपा ती महाकल्पना घालवी हो । कृपा श्रीप्रभूच्या पदीं बैसवी हो ॥ ८६ ॥ कृपा ती अनिर्वाच्यही बोलवीते । कृपा ती महागुह्यही दाखवीते । कृपेनें पहा दृश्य मिथ्याच भासे । कृपा झालिया काळही त्या न ग्रासे ॥८७॥ सदा श्रीप्रभू लीनभावें भजावा । प्रभूसन्निधीं मीपणा तो नसावा । अहंतागुणें श्रीगुरू मीच मानी । महारौरवा भोगितो नीच योनी ॥ ८८ ॥ जनीं दंभ-

योगें मुखें नाम घेतो। सदा जन्मजन्मोनियां बद्ध होतो। अरे हें महावाक्य घे नीट कानीं। स्वरूपीं अहंता कदापी न आणीं ॥ ८९ ॥

## ( १३ ) मुख्य उपदेश.

अहो श्रीप्रभू निर्विकल्पा म्हणावें। विकल्पासि त्यागोनियां त्या भजावें॥ अहा निर्विकल्पीं विकल्पचि नाहीं। विकल्पें विकल्पासि मारूनि पाहीं ॥ ९० ॥ वळें घेतलीया विकल्पासि पाहीं। विकल्पीं विकल्पासि थाराचि नाहीं। विकल्पें विकल्पाश्रयीं हो नसावें। महामौन त्या निर्विकल्पीं असावें ॥ ९१ ॥ असा बोध ज्या भाग्यवंतासि झाला। सदा तो महामौन होवोनि ठेला। महामौन सौख्या स्वयें तो न जाणे। अशा त्या स्वरूपा दुजा कोण जाणे ॥ ९२ ॥

## ( १४) सकलसिद्धांतरहस्यकथनपूर्वक मुमुक्षूस मुख्य आज्ञा

नको जाणणें नेणणें रे तुला हें। जशाचा तसा होउनी स्तब्ध राहें। नको शास्त्र वेदार्थ हा बोधफांसा। स्वयें तूं जसा आहेसी राहें तैसा ॥९३॥ बहू शास्त्र अभ्यासितां काय झालें। बहु शोधितां काय हातासि आलें। दुजा लाभ ना हानि कांहींच नाहीं। वृथा सत्य हें मानिलें सर्व कांहीं॥९४॥ उपदेश हा ऐक रे नीट मोठा। नको रे धरूं बद्ध मी मुक्त ताठा। नको रे पुसूं कोण मी दीनवाचा। तुझा तूं तुला रे दुजा लाभ कैंचा ॥ ९५ ॥ जरी या स्थळीं स्वल्प संदेह घेसी। तरी मूढ वा तूं महाज्ञानि होसी। नको होउं रे मूढ वा ज्ञानि कांहीं। जसा तूं तसा स्वस्वरूपींच राहीं ॥ ९६ ॥ पुरे बोलणें शब्द वाक्यार्थ जाणा। पुरे शास्त्रसिद्धांत दृष्टांत नाना। नको रे नको ऐकुं सिद्धांत कांहीं। स्वरूपीं स्वरूपची होवोनी राहीं ॥ ९७ ॥ अरे जें दिसे दृश्य कोठोनि झालें। जिथें भासलें जें तिथें तें निमालें। जगीं बद्ध ना मुक्त ना कोणि कांहीं। मुळीं हें खरें दृश्य झालेंचि नाहीं ॥ ९८ ॥ नको रे नको हें मृषा दृश्य पाहूं। नको रे नको बोध हा कानिं घेऊं॥ जरी इच्छिसी ब्रह्म आतांचि व्हावें। मना गाळुनी मौन त्वां हो बसावें ॥९९॥ जरी अर्थ संपूर्ण हा बोध झाला। बहू जन्मिचें पुण्य आलें फळाला। तुजां राहिजे मौन होवोनि तेथें। श्रुती बोलती नेतिनेतीति जेथें ॥१००॥

स्वरूपस्थिती झालिया ती न सोडी। कधींही नको घेउं दृश्याचि गोडी। स्थिती टाकुनी बाह्य दृश्यांत येसी। सदा दृश्यदुःखें बहू कष्टि होसी ॥१॥ वृथा रे वृथा भोगिसी इंद्रियार्थां। मना सोडुनी जाइं रे मुक्तिपंथा। मिळे मोक्ष आतां नको वेळ कांहीं। तुझा तूंच रे स्वस्थळीं स्वस्थ राहीं ॥ २ ॥ जरी आमुचे शब्दही व्यर्थ होती। परी रोकडी घेइं तूं ब्रह्मप्राप्ती। पहा नित्यकर्मीं तसे यज्ञयागा। स्वयें नासुनी देतसे स्वर्गभोगा ॥ ३ ॥ अतां सांगणें बोलणें शांत झालें। गुरूगम्य तें सर्व हातासि आलें। जसा साधु शांती न सोडी कदाही। तसा तूं महामौन होवोनि राहीं ॥ ४ ॥

## ( १५ ) महामौनअभ्यास.

महामौन बोधें महामौन व्हावें। जगीं हो महामौन शोधोनि घ्यावें। महामौन हा शब्द त्यागोनि जाणा। महामौन अर्था मनीं पूर्ण आणा ॥ ५ ॥ महामौन अभ्यास तो वाढवावा। महामौन एकांत सेवीत जावा। महामौन रूपा बळें नित्य ध्यावें। नसोनी महामौनरूपें असावें ॥ ६ ॥ महामौन जो त्या गुरुरूप माना। महामौन जो तोचि सच्छिष्य जाणा। महामौन हें निर्भयस्थान पाहीं। पदा सोडितां सौख्य होणार नाहीं ॥७॥ महामौन विद्या महामौन भक्ती। महामौन आज्ञा महामौन मुक्ती॥ महामौन हें द्रव्य मौनेचि घ्यावें। महामौन जाणोनियां मौन व्हावें ॥८॥ महामौन ही उन्मनीहि विराली। महामौन ती खूण बाणोनि गेली। पुढें शब्दही स्वस्वरूपीं विराला। म्हणोनी महामौन होवोनि ठेला ॥ ९ ॥ आहे तें आहे तें कदापी नसेना। नसे नाहिं ना तें कदापी असेना। असा बोध मार्तांड ही तो निमाला। स्वयें निर्विकल्पीं महामौन ठेला ॥११०॥

## ( १६ ) ग्रंथकर्त्याची प्रतिज्ञा.

सदा सार्थ जो मौनग्रंथा विवेची। सुखें भेट होईल त्या माणिकाची। असी सत्य जी पूर्णभक्तप्रतिज्ञा। खरी तीचहो श्रीप्रभू मुख्य आज्ञा ॥११॥

## ( १७ ) ग्रंथार्पण.

नको न्यायव्युपत्ति दृष्टांत देणें। रिझती न जे हो महाशब्दज्ञानें। महाभक्त कीं मुक्त जे संत ज्ञानी। तयां अर्पिली ही महामौनवाणी॥१२॥

इति श्रीगुरुमार्तांडप्रभुविरचितं श्रीमहामौनशतक समाप्त ॥

# श्रीमाणिकप्रभु संप्रदाय ग्रंथ

| | | रु. आ. |
|---|---|---|
| १ | श्रीज्ञानमार्तंड | १—४ |
| २ | श्रीमाणिकप्रभुचरित्र | २—८ |
| ३ | पद्यमाला | १—० |
| ४ | सातवारांचें भजन | ०—६ |
| ५ | नित्यकर्मावलि | ०—१२ |
| ६ | ज्ञानशिखा | १—० |
| ७ | माणिक-प्रभाकर | ०—६ |
| ८ | पंचरत्नगीता | ०—४ |

पत्ताः—श्रीसंस्थानमाणिकनगर

पो.ः—होमिनाबाद